# मर्मभेद

लेखक

गजानन विश्वनाथ केतकर



१५ नोव्हेंबर १९५० ]

[ मूल्य तीन रुपये

# प्रकाशकाचें निवेदन

प्रिय वाचक,

'केसरी'चे भूतपूर्व संपादक माननीय ग. वि. केतकर यांचा प्रस्तुत लेखसंग्रह आपल्या हाती देतांना मला आनंद होत आहे. 'केसरी'च्या संपादकीय स्थानावरून दि. १५ ऑगस्ट १९४७ पासून अगदीं परवांपर्यंत त्यानी जे लेख लिहिले त्यांतील गाजलेले असें निवडक लेख या 'मर्मभेद' मध्ये संग्रहित केले आहेत.

श्री. केतकरांच्या सर्वच लेखांचा संग्रह प्रसिद्ध होणें वस्तुतः आवश्यक आहे. पण तसा संग्रह प्रसिद्ध करायचा तर पृष्ठमर्यादा व मूल्य प्रमाणाबाहेर वाढणार. म्हणून आमच्या व वाचकांच्या आवाक्याला पेलेल अशा रीतीनें या संग्रहाची योजना केली आहे. लेखांची निवड करतांना माझा विलक्षण गोंधळ उडाला. सर्वच लेख पांडित्यपूर्ण, तर्कशुद्ध, साधार, व ज्वलंत स्वरुपाचे असल्याने 'हा घ्यावा की तो घ्यावा' अशा संभ्रमात माझें बरेच दिवस गेले. इतका त्यांतील प्रत्येक लेख महत्त्वपूर्ण आहे.

हा लेखसंग्रह प्रसिद्ध करण्याची अनुज्ञा देऊन श्री. केतकरांनी मला ऋणी केलें आहे. त्यांचे जितके आभार मानावे तितके अल्पच आहेत. श्री. केतकराप्रमाणेच 'केसरी'चे तीनहि विश्वस्त नी विशेषतः माननीय तात्यासाहेब करंदीकर यांचाहि मी अत्यंत आभारी आहे.

प्रस्तुत संग्रह प्रसिद्ध करण्याचें ठरल्यापासून तों अखेरपर्यंत माझे स्नेही श्री म श्री. दीक्षित, श्री. पा. का. गाडगीळ, श्री. केशवराव जायदे, श्री. ना. धों. वैद्य, नि श्री. जयवंतराव नलावडे यानी मला आपुलकीनें साहाय्य केले. त्यांचेहि आभार मानणें माझें कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें 'हिंदुस्थान मुद्रण प्रकाशन'चें व्यवस्थापक श्री. वसंतराव आपटे यांचेही आभार मानावयास पाहिजेत.

वाङ्मयप्रेमी व राजकारणाचें अभ्यासी अशा दोन्ही तऱ्हेच्या वाचकांकडून 'मर्मभेदा'चें स्वागत होईल अशी अपेक्षा आहे.

दिनांक १०-११-१९५०

त्र्यंबक निवास<br>४३७ क नारायण पेठ,<br>पुणें २.

नागेश आठवले

# अनुक्रमणिका

# भग्न मूर्तींचे षोडशोपचार !

आज दिुस्थानांतून ब्रिटिशांची सत्ता आणि सार्वभौमत्व हीं जाणार. आपल्याच पायानें आपण होऊन जाणार, आणि त्यांच्या जागी हिंदुस्थांनातल्याच लोकांच्या संमतीनें बनवलेलीं नि ठरविलेलीं दोन वसाहत-राज्यें, म्हणजें पाकिस्तान संयुक्त राज्य आणि हिंदुस्थान संयुक्त राज्य, हीं आपापल्या सत्तेनें मार्गक्रमण करावयास लागणार. ब्रिटिश सत्तेनें या देशाला ग्रासून त्याचीं नागवणूक नि पिळवणूक गेलीं दीडशें वर्षे चालविली. या पैकी निदान गेलीं शंभर वर्षें तरी हिंदुस्थानांतील विचारी आणि कर्तृत्ववान् अशा लोकांना व्यग्र आणि तीव्रतेनें कार्यतत्पर करणारा हाच एकमेव विषय होता कीं, ही परकी सत्ता येथून हुसकून लावल्यावांचून या देशाचें जीवन कोणत्याच अंगानें सुधारावयाचें नाहीं. पारतंत्र्याची सर्वांगीण कुचंबणा नाहीशीं होण्यासाठीं ब्रिटिश सत्तेला येथून हांकलणें हे लक्ष्य ठेवून या देशांत अनेकशः प्रयत्न झाले. त्यांत हजारोंनीं आपल्या सर्वस्वाचा आणि जीविताचाहि होम केला, हालअपेष्टा सोसल्या, बुद्धिसर्वस्व वेचलें, सुचेल त्या मार्गांनी देशांत या पारतंत्र्याच्या आपत्तीविरुद्ध असंतोष माजवून सारखा

घुमविला आणि हाती येतील त्या साधनांनीं तो प्रभावी केला. त्या सर्वांची आज नांवें आठवून काढीत बसले तरी दिवस संपेल पण ही नामावलि अपुरीच राहील गोविंद कवीच्या गीतांत म्हणल्याप्रमाणें

"किती वीर असे वर्णावे । कितिजणा पवाडे गावे"

"स्मृतिदीपें ओवाळावें । कुणाकुणाला ।।"

असंच यासंबंधांत शेवटीं उद्‌गार काढावे लागतील. देशासाठी आपत्ति भोगलेल्या नि वीसपंचवीस वर्षांपूर्वी अंदमानांतून परत आलेल्या एका महाराष्ट्रियाचें आजच्या घटकेलाच महाराष्ट्रांत आदरानें स्वागत झालें; देशगौरव सुभाषचद्र बोस यांच्या स्वातंत्र्याच्या सैन्यांतील लोक आज कोठेंहि गेले तरी त्यांच्या संबंधी आदरभाव सर्वत्र दिसतो या सर्व गोष्टीचें कारण अशा सर्वांच्या त्यागाच्या, परिश्रमाच्या आणि बलिदानाच्या योगानेंच आजचा सत्तांतराचा दिवस देशाला पाहावयास मिळत आहे.

## खंडित देशाचें शंकित भवितव्य

मग अशा या आनंदाच्या दिवसात करावयाच्या सामुदायिक आनंदप्रदर्शनासंबंधानें अडचण किंवा अवघडपणा कां असावा ? पण ती अडचण आहे आणि ती सामुदायिकपणें व्यक्त होण्याइतकी महत्त्वाची आहे. याचे कारण हा आनंद निर्भेळ नाही. या देशाच्या स्वातंत्र्याच्या सर्व चळवळींत गेल्या शतकांत जे वीर हुतात्मे आणि देशभक्त खपले आणि कामास आले त्यांच्या डोळ्यापुढें जे समग्र भारतमातेचें चित्र होते ते भग्न आणि विदीर्ण झालेलें आहे. देश खंडित झाला आणि आपल्याच देशांतील पुढाऱ्यांना आपल्या हातानें तें विच्छेदन करावें लागलें. तरीही देशांतील हे पुढारी ज्या रक्तपातापुढें नि अत्याचारांपुढें नमले तसले अत्याचार अद्याप ठिकठिकाणीं चालूच आहेत ! अरविंद घोषांसारख्या इतके दिवस ध्यानस्थ बसलेल्या योग्यालाहि आपल्या वक्तव्यांत देशमातेचें देऊळ भंगलेलें आहे आणि तें एकसंध केल्याशिवाय देशाचे भवितव्य कठीण आहे, ही गोष्ट स्पष्ट केल्याशिवाय राहवलें नाहीं. वयोवृद्ध आणि अपक्ष संपादक के. नटराजन् याना आपल्या रुग्णशय्येवरून प्रकटपणें सांगावेसे वाटलें की, आज दि. १५ ला आपल्या हाती जी गोष्ट पडत आहे ती देशाचें तुकडे करण्यास संमति देऊनच आपल्याला मिळ-

वावी लागली आहे, " देशाचें अंतःकरण घायाळ आणि व्यथित असतांना केल्या जाणाऱ्या या बाह्य आनंदोत्सवासंबंधी मी माझा तीव्र निषेध व्यक्त करतों " असेंहि त्यांनी पुढें म्हटलें आहे. आज झालेल्या देशभंगाचें संकट मर्यादित नाहीं. या देशभंगामूळें देशाच्या स्वतंत्रतेला अनेक कलंक आणि संभाव्य संकटें यांनीं ग्रासलें आहे.

## चौदा पाकिस्तानांची निर्मिति

हिंदुस्थान खंडित झालें म्हणूनच निजामसरकारला कोणत्याही संघराज्यांत समाविष्ट न होता स्वतंत्र राहण्याची संधि सांपडली. आणि निजाम सरकार हिंदुस्थानी संघराज्यांत अखेर येईल अशा खोट्या आशा ज्यांनीं केल्या त्या धुळीस मिळाल्या. त्यायोगे वऱ्हाडच्या संबंधात स्वतंत्र निजामाचा आणि हिंदुस्थानी संघराज्याचा संघर्ष होणार हेहि नवे संकट उत्पन्न झालें. इंग्लंड, अमेरिका, रशिया, अफगाणिस्थान इ. परके देश आपले स्वार्थी हितसंबंध या देशावर लादण्यासाठीं या देशभंगाचा भरपूर उपयोग केल्यांवाचून राहणार नाहीत. पाकिस्तान संघराज्यांत कांही मुस्लीम संस्थानें गेली आहेत; त्यांत असलेल्या हिंदु जनतेचें जीवन अधिकच चिंताग्रस्त झालें आहे. पाकिस्तानच्या अनेक प्रवर्तकांनी पाकिस्तान हें आपल्या आकांक्षांचे शेवटचें टोक नसून प्रारंभ किंवा उडी मारण्याचें साधन आहे असे म्हटलें आहे. एका पाकिस्तानाभोंवतीं अनेक पाकिस्तानचे कडे उभें करण्याच्या योजना छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. ज्यांची पूर्वीची भाकितें तंतोतंत खरी ठरली ते स्वातंत्र्यवीर " सावरकर " " यापुढें चौदा पाकिस्तानें उपस्थित होणार " अशी धोक्याची सूचना स्पष्टपणें देत आहेत.

" येवढ्यानेंच भागलें नाहीं, दुष्काळांत धोंडा महिना यावा त्याप्रमाणें पर्जन्याची अवकृपा आणि धान्यसाठ्याची टंचाई यांच्या योगानें " कैसी ही वांचतील जनें । " अशी सार्वत्रिक चिंता उत्पन्न झाली आहे. येत्या कांहीं महिन्यांत हजारो नव्हे तर लाखो लोकहि कदाचित् उपासमारीने मृत्युमुखीं पडणार असें भीषण दृष्य श्री. नटराजन् यांच्यासारखे विचारी लोक रेखाटीत आहेत. लाहोर अमृतसरच्या जाळपोळी अद्याप थांबल्या नाहींत. कलकत्यांतील दंगली चालू आहेत सोलापुरांत नुकतीच एक आठवड्यातवर दंगल

भाजून सैन्य धाडावे लागण्याइतकी स्थिति निर्माण झाली. निजामी राज्यांत सर्व ठिकाणांहून अशांततेच्या वार्ता येत आहेत. ते संस्थान हिंदुस्थान संघराज्यांत समाविष्ट व्हावें असा तेथील बहुसंख्य हिंदु जनतेचा आग्रह आहे. पण यासाठीं तेथील हिंदूंनीं चालविलेली चळवळ दडपून टाकण्यांत येत आहे. पाकिस्तानांतून आणि निजाम संस्थानांतून शेकडो लोक बाहेर पडत आहेत. या परागंदा लोकांची व्यवस्था करतां करतां धान्यनियंत्रणाधिकाऱ्यांची त्रेधा उडत आहे.

## देश खंडन आणि पक्षमंडन

या अनेक संकटांपैकीं देशविच्छेदनाच्या संकटासंबंधानें सार्वत्रिक लोकक्षोभ दि. ३ जुलैच्या हरताळाच्या निमित्तानें प्रकट झाला. देशभंगाचें पाप ज्या काँग्रेस संस्थेच्या पुढाऱ्यांचे हातून झालें त्या संस्थेच्या शाखोपशाखांनीं हा हरताळ पाळला जाऊं नये असे प्रयत्न केले; पण एरवी त्यांचे पुढारीपण मानणारी जनता या वेळीं त्यांच्या उलट गेली. आपल्या मनाविरुद्ध पडलेल्या या हरताळाचें आणि त्या वेळच्या प्रचंड निदर्शनाचें पक्षनिष्ठ काँग्रेसवादी लोकांना मोठें वैषम्य वाटलें. ती गोष्ट त्यांच्या मनांत डांचत राहिली आणि दि. १५ च्या आनंदप्रदर्शनांत त्या मागल्या वैषम्याचें परिमार्जन सव्याज करण्याची ईर्षा त्या दिनाच्या कार्यक्रमाच्या सिद्धतेंत दिसून आली. जेवणावळीवरील निर्बंध उठवणे, खादी भांडारांतील खादी संपवून त्यांच्या दुपटीनें साधें कापडहि वेचून जेवणावळींतल्या पंक्तीसारखी ध्वजावळी फडकवण्याची अहमहमिका दिसली. जेवणावळीला मोकळीक पण अधिक शिधा मिळण्याची व्यवस्था नाहीं याचा अर्थ काळ्याबाजारांतून धान्य आणा असाहि होऊ शकेल दुकानें बंद ठेवतांना कांही धरबंद ठेवा, खाण्याची दुकानें बंद ठेवूं नका आणि एकंदरीनें "तारतम्य पाळा" असें सांगण्याची शेवटीं कांहीं काँग्रेस प्रमुखांना पाळी आली. या अतिरेकानें चिडून एका मुंबईच्या काँग्रेसप्रेमी वृत्तपत्रानें म्हटलें कीं, दारूचीं दुकानें मुक्तद्वार उघडा. तें जेवणावळीपेक्षां बरें, कारण पुढील उपासमारीत तरी त्यांयोगें भर पडणार नाहीं ! संस्थानिकांच्या मध्ययुगीन बडेजावाची थट्टा करणाऱ्या लोकांनीं, संस्थानिकाला नवसानें पुत्रप्राप्ति झालीं असतां होणाऱ्या उत्सवाची प्रतिकृति कांहीं अंशी तरी सजविली. त्यामुळेंच लोकवार्ता पसरली की हत्ती-

वरून खेर पाटिलांच्या मुंबईत मिरवणुकी निघणार ! पण अधिकृतरीत्या या वार्तांचा निरास करणें प्राप्त झालें.

## जनमंगलासाठीं सावधान

या गोष्टींत स्वातंत्र्य प्रेमाच्या अडोशाने संकुचित पक्षनिष्ठा डोकावत होती, आणि सत्तेच्या प्रथमावेशाचा झटकाहि त्यांत होताच होता, मग क्रियेला प्रतिक्रिया म्हणून कोणी उलट याला ' सुतकदिन ' म्हटलें, कोणी ' निषेध दिन ' म्हटलें, कोणी " काळी निशाणें " दाखवा म्हणून म्हटलें, कोणी बहिष्कार घाला म्हणूनच सांगितलें; पण ही स्वाभाविक तत्कालिक प्रतिक्रिया संपल्यावर दिल्ली येथें अ. भा. हिंदुमहासभेच्या कार्यकारिणाने या नाजूक परिस्थितींत आपलीं तत्त्वनिष्ठा राखण्याचा जो काटेकोर विचारी मार्ग सांगितला तोच अखंड हिंदुस्थानवादी हिंदुत्वनिष्ठांनीं गंभीरपणें, शांततेनें आणि संयमानें या वेळी अनुसरावा. अ. भा. हिंदुसभेच्या कार्यकारिणीनें वरील सर्व तात्कालिक संघर्षांचे शब्द–प्रतिशब्द अनुल्लेखानें संपवले; आणि एवढेंच केवळ–नमूद केले कीं, हिंदुसभावाद्यांच्या विशेष ध्येयवादी मनःस्थितीमुळें ते या आनंदोत्सवांत सहभागी होऊं शकत नाहींत. त्यांनीं घरोघर भगवे ध्वज लावावे आणि स्वतंत्र सभांमधून अखंड हिंदुस्थान पुनः प्रस्थापित करण्याचा आणि पाकिस्तानांत सांपडलेल्या हिंदूंच्या रक्षणासाठीं प्रयत्न करण्याचा निश्चय प्रकट करावा. याबरोबरच कोणत्याहि राज्याच्या अगर पक्षाच्या ध्वजांचा अपमान हिंदुसभेला करावयाचा नाहीं ही गोष्टहि स्पष्ट केलेली आहे. या मर्यादित रेखीव ठरावाचे पालन करण्यांतही जर कोणी संघर्ष उत्पन्न केला तर त्याचा दोष हिंदुसभेवर लादतां येणार नाही.

हिंदुसभेची भावना सुदैवाने निराळ्या प्रसंगाने व निराळ्या संदर्भात काँग्रेसच्या अध्यक्षांकडूनच व्यक्त झाली आहे. पाकिस्तानांतील हिंदूंनी दिनांक १५ ला काय करावें यासंबंधांत त्यांनी प्रकटपणें म्हटलें आहे कीं, ' ज्यांना " पाकिस्तानासंबंधीं उत्साह नाहीं आणि ज्यांना देशाच्या फाळणीनें स्वस्थता वाटत नाहीं, त्यांनीं या समारंभांत भाग घेणें हें निव्वळ व्यक्तिस्वार्थानें केलेलें ढोंगीपणाचें कृत्य होईल. या ढोंगीपणाने सरकारचा आणि या लोकांचाहि कोणताच लाभ होणार नाहीं. "

पाकिस्तानांतील हिंदु आणि हिंदुस्थानांतील हिंदु वेगळे नाहींत. एकाचें दुःख तें दुसऱ्याला सुख कसें वाटेल ? पाकिस्तानातील हिंदूंच्या या भावना लक्षांत न घेतां शेष हिंदुस्थानांतील हिंदूंनीं आनंदोत्सव करणें म्हणजे जात्यांतले रडत असतांना सुपांतल्यांनी हसत बसण्यासारखे आहे. हा काँग्रेसच्या अध्यक्षांच्या वचनांच्या आधारेच निष्कर्ष निघत नाही काय ?

कृपलानींनी असेंहि म्हटलें आहे कीं, "काँग्रेसनें सर्व हिंदुस्थान एक करण्याचें ध्येय सोडलेलें नाहीं आणि भंगलेला हिंदुस्थान एक झाल्याशिवाय देशांत शांतता व प्रगति नांदावयाची नाही." सरदार पटेल यांनी अगदीं अलीकडील एका भाषणांत सांगितलें की, देशभंग आम्ही पत्करला तो भंगाच्या द्वाराच पुढें ऐक्य प्रस्थापित होईल म्हणून पत्करला ! एक होण्यासाठीं विभक्त होण्याची असंभाव्य कल्पना प्रथम राजगोपाळाचारी यांनी सांगितली, तेव्हां गांधीजीपासून सर्वांनीच ती हास्यास्पद मानली. आणि आतां ती कल्पना पटेल यांनी पुढें आणली आहे ती देखील प्रसंग सावरण्याच्या तात्कालिक उपयोगापुरतीच आहे. मग याच अखंड हिंदुस्थानाच्या जाणिवेनें स्वातंत्र्योत्सवांत भाग न घेणाऱ्या लोकासंबंधी विचारी काँग्रेसवाल्यांनी तरी वैषम्य कां मानावें ? पण त्याचेमधील काही अविचारी लोकात सक्तीचा विचार उत्पन्न झाला आणि तो आवरण्याऐवजी उलट हिंदुसभेच्या सभांवरच नसतें नियंत्रण केवळ मुंबईच्या सरकारनें अविचारी बंदी आज्ञेने घातलें आहे. निजामीमध्यें देवळाचे कळस मशिदींच्यापेक्षां अधिक उंच केल्यास मशिदींचा अपमान होतो म्हणून ते तसें उंच करूं दिले जात नाहींत; तशाच अर्थाची ही बंदी आज्ञा आहे. नव्या चक्रांकित तिरंगी ध्वजाव्यतिरिक्त इतर ध्वज सभांतून आणि मिरवणुकांतून फडकविल्यास तो नव्या ध्वजाचा अपमान होतो आणि त्यायोगे दंगल होण्याचा संभव म्हणून अशा ध्वजासकट मिरवणुकी आणि सभा करण्यास बंदी करण्यांत आली आहे ! या बंदीच्या आज्ञापत्रकांत सर्वपक्षांना हा तिरंगी ध्वज मान्य असल्यानें इतर ध्वजांवरून सर्वपक्षीय क्षोभ होईल असें म्हटलें आहे. तसेंच कांहीं गुंड लोकांचे हुल्लड करण्य चे विचार नि संकेत चाल असल्याचें सरकारला समजले असल्याचाहि उल्लेख आहे.

## गंभीर प्रश्न नि उथळ आचार

जुन्या बुरसटलेल्या नोकरशाहीच्या राजवटीत मुसलमानांचा क्षोभ होईल म्हणून वाटेल तसली नियंत्रणें हिदूवर घातली जात, तशाच स्वरुपाचें हें नियंत्रण आहे. तुमचा अवमान करण्याचा हेतु नसेल पण मशीदीवरून हिंदूची धार्मिक मिरवणूक जाणें हाच मुळीं अवमान आहे, असें मुसलमान म्हणत आणि पूर्वीची आगलावी नोकरशाही एकदम त्या गोष्टींचा बाऊ करी; तसलीच ही ध्वजबंदी आहे. घरोघर कोणताही ध्वज उभारण्यास मोकळीक आहे हें या आज्ञेंत सांगावे लागले, यावरूनच ती कोठल्या मर्यादे-पर्यंत गेली आहे हें उघड होतें. सर्वपक्षीय मान्यतेचें बुजगावणें या आज्ञेचें समर्थन करूं शकत नाहीं. संयमानें कांटेकोर मर्यादा पाळणाऱ्या हिंदुसभेला केवळ सत्तेच्या उन्मादानें हें डिवचणें आहे घरोघरच्या ध्वजाच्या उल्लेखा-वरून पाहतां सर्वच आज्ञा 'भगव्या ध्वजा'च्या रोखानें लिहिलेली आहे हें उघड आहे. तिरंगी बुद्धचक्रांकित ध्वजासंबंधानें वीर सावरकरानी आदरच व्यक्त केला होता. मुंबई सरकाराने या ध्वजाला "सर्वपक्षीय" म्हणून कितीहि म्हटलें तरी ते पक्ष शेष हिंदुस्थानांतलेच ना? सायगांव येथें हिंदु-मुसलमानांनी दि ५ चा दिन तिरंगी चक्रयुक्त नि हिरवा चादतारायुक्त असें दोन्ही ध्वज लावून करण्याचें ठरविलें आहे. आफ्रिका लंडन इ. स्थानीं अशीच दुहेरी ध्वजांची आज जोड लागेल. हेहि अनुमान सहज करतां येईल.

हिंदुस्थानांतल्या कांही संस्थानांत काय होईल हें सांगतां येत नाहीं. सांगलीमध्यें दि. १५ ला भगवा आणि तिरंगी असे दोन्ही ध्वज उभारण्याचें ठरलें आहे आणि प्रकट झालें आहे. रत्नागिरीस कॉंग्रेस महासभा यांनी मिरवणुकींत दोन्ही ध्वज घेण्याचें सयुक्तपणें ठरविले आहे असें समजतें. पूर्वीचा चरखायुक्त ध्वज हाहि राष्ट्रध्वज म्हणून कॉंग्रेसवाले मानीत होते. मग त्यावेळी त्या ध्वजासह हिरवा आणि भगवा अशा दोन्ही ध्वजांच्या मिरवणुका मुंबई प्रांतांत निघालेल्या आहेत. अखंड हिंदुस्थानाचा भगवा-ध्वज हा ज्या ध्येयाचे प्रतीक म्हणून हिंदुसभेनें आजच्या प्रसंगी तरी मानला आहे तें अखंड हिंदुस्थानाचें ध्येयहि कॉंग्रेस प्रमुखांना मान्य आहे त्यासाठीं त्यांच्या पद्धतीनें प्रयत्नशील राहण्याचा उद्देशहि त्यानी प्रकट केलेला आहे. इतर कोणत्याहि 'ध्वजानें' सभा होऊं नये या सरकारी आज्ञेत दोन्ही

ध्वजांसह होणाऱ्या सभाहि आक्षिप्त ठरणार कीं काय हा संदेह आहे! कांहीं लोक गुंडगिरीचा संकेत करीत आहेत, हें सरकारला दिसले आहे तर त्यांना समज देऊन नियंत्रणांत ठेवणें मुंबई सरकारला अशक्य झालें आहे काय? त्यांच्यासाठीं इतरांवर अन्याय्य नियंत्रण लादणें आणि साऱ्या नागरिक स्वातंत्र्याची गळचेपी या स्वातंत्र्याच्या नांवानेच केल्या जाणाऱ्या उत्सवप्रसंगी करून आमचें गृहमंत्री भयंकर अविचार करीत आहेत. सत्ताधुंदीचा हा उच्चांकच आहे!

## उत्सवाचे विडंबन

हिंदुसभेनें भगव्या ध्वजाच्या मिरवणुकी काढण्याचा आदेशच दिलेला नाही. केवळ घरोघर भगवा ध्वज उभारण्यास सांगितलें आहे घरोघरच्या ध्वजांना बंदीतून वगळण्याचे महदुपकार मुंबई सरकारनें केलेले आहेत. अखंड हिदुस्थानाच्या आणि पाकिस्तानातील हिंदूंच्या रक्षणासाठीं जागरूक राहण्याच्या प्रतिज्ञा या सभांतून करावयाच्या आहेत. त्यांत अवैध असें कांहीं नाहींच. हिंदु सभेच्या प्रकट सभा "ध्वजाखालीं" अशा भरत नाहींत, पण बऱ्याच ठिकाणी टेबलापाशीं काठी बांधून भगवा ध्वज लावण्यांत येतो. 'स्वातंत्र्य' आल्यावर या नित्याच्या परिपाठालाही तीन दिवसांची बंदी असणें हें त्या स्वातंत्र्योत्सवाचें विडंबनच करण्यासारखें नाहीं काय? या सभांतून संघर्ष उत्पन्न झाला तर कोण करणार? चक्रांकित ध्वजाचे अतिरेकी अभिमानी हेंच ना? मग त्यांना, आपल्याच अनुयायांना आवरून धरणें कॉंग्रेस सरकारला अशक्य आहे. काय? असला दुबळेपण त्यांनाच पुढें जाचक झाल्याविना राहणार नाहीं. निदान सभांपुरती ही आज्ञा बदलावी असें आम्ही मुंबई सरकारला सांगतो. कारण हा निष्कारण असंतोष नि कदाचित् संघर्ष उकरून काढण्याचा प्रकार आहे.

१५ ऑगस्टच्या दिनानिमित्त स्थानबद्ध नि राजबंदी सोडणें, इतर बंदीही पुष्कळांशीं शिक्षा भोगलेले असतील ते सोडणें, वर्तमानपत्रांचीं तारणें (जामिनक्या) चालू आणि जप्त देखील परत करणें, कामकऱ्यांना आणि नोकरांना बोनस देणें, दंगलीचे आणि तद्विषयक अभियोग (खटले) काढून घेणें इत्यादि जे योग्य प्रकार या प्रसंगीं सरकार करीत आलें त्यांचें हिंदुत्व-

निष्ठ स्वागतच करीत आहेत; इतकेंच नव्हें तर असे कांहीं चांगले प्रकार आणखीही सुचवीत आहेत. यावरून त्यांची असहकारिता विवेचक आहे, आंधळी नाहीं हें दिसून येईल. पण कमानी उभारणें, गुड्या–तोरणें लावणें, दिव्यांची आरास करणें, जेवणावळी करणें विशिष्ट पोस्टाचे शिक्के मारणें, तिकिटें छापणें, शिट्या घालीत इंजिनें धाववणें, चक्रांकित ध्वजाचा सुकाळ, शेवटी टोप्या नि पताकाहि त्या छापांनी अंकित करण्यापर्यंत करणें हे प्रकार दिखाऊ उथळ नि आंबरेकी आहेत. त्यांच्यापासून मात्र हिंदुत्वनिष्ठ अलिप्त राहणार आणि तेवढा नागरिकाधिकार कोणालाहि त्याच्यापासून हिरावून घेतां येणार नाही. पूर्वीच्या सत्ताधारी परकीयांनीहि घेतला नसता आणि आतां स्वकीय सत्ताधारीच घेतील तर त्यांचेंच तोंड काळें होईल.

## अप्रिय पण पथ्यकर

स्वायत्तता प्राप्तीच्या उत्सवाचा केवढा गंभीर प्रसंग आणि कसल्या किरकोळ गोष्टीची ही विवंचना या वेळीं करावी लागत आहे ! हा दिन आक्रमक पक्षांध वृत्तीने उगवून घेण्याचा दिन कोणी समजू नये तसेंच विरोधी प्रदर्शनानें कोणी कोणास डिवचण्याचाहि समजूं नये. हिंदुमहासभेने ' बहिष्कार, ' ' सुतक, ' काळीं निशाणें इ. सर्व संघर्ष–शब्द आणि अर्थ टाकून अत्यंत संयमानें आपल्या तत्त्वनिष्ठेनें वागण्याचा ठराव केलेला आहे हे सर्वांनी लक्षांत ठेवावे. सत्ताधारी लोकांनी आणि त्यांच्या अनुयायांनी जेवणावळीं आणि रोषणाई यांत शक्यतों मर्यादा राखावी. या सत्तांतरांतून पुढे काय करावयाचें याचेच गंभीर विचार सरदार पटेल. कृपलानी, पंडित नेहरू, टंडन इत्यादि अनेक कॉंग्रेस प्रमुखांच्या मनांत या १५ ऑगस्ट दिवशी असणार. तेच कॉंग्रेसच्या देखील सभांतून प्रामुख्याने प्रकट व्हावेत. राष्ट्राचें पाऊल आतां पुढे पडत राहावे आणि कोणत्याहि धमकावणीने राष्ट्राला कमीपणा आणणाऱ्या गोष्टी यापुढे करण्याचा कटु प्रसंग येऊं नये, असाच निश्चय सर्वांनी करावा. शांततेच्या सविनय असहकाराचा नागरिकाधिकार गांधीजीनीच १९२० पासून पुरस्कारला तोच पुढील सर्व चळवळींचा आधार मानला आणि त्यांचेच अनुयायी अराष्ट्रीय अत्याचारापुढे वाटेल तसे नुकतेच वांकले. पण शांततेनें आपल्या राष्ट्रीय

भावना व्यक्त करणाऱ्या हिंदुत्वनिष्टांपुढे मात्र त्यांनी सत्ताबळाच्या निद्य प्रदर्शनाला सिद्ध व्हावे, हे या प्रसंगाला उचित नाही, त्याने या प्रसंगाला निष्कारण गालबोट लागेल. या सुखदुःखमिश्रित दिवशी देखील भावी कालाकडे दृष्टि ठेवून " सुख जवापाडे दुःख पर्वताएवढे " असे हिंदुत्वनिष्ठांना म्हणावेसे वाटते. अखंड हिंदुस्थानाची मूर्ति भंगली आहे. ती षोडशोपचारानीहि ' साजरी ' होणार नाही. ती पुनः एकजीव केल्यानेच तिच्यात जिवंत राष्ट्राची प्राणप्रतिष्ठा होणार आहे. हीच सर्व हिंदुत्वनिष्ठाची भावना आहे ती कोणाला अपशकून करण्यासाठी म्हणून व्यक्त करावयाची नसून राष्ट्रीय हितबुद्धीनेच प्रकट करावयाची आहे. अशी अनेक अप्रिय कर्तव्ये यापूर्वीहि हिंदुत्वनिष्ठानी केली. त्याचे महत्त्व त्यावेळी नाही तरी पुढे यथाकाल प्रवाहपतित लोकाना उमगले. तसेच याहि प्रसंगाने होईल असा आम्हाला विश्वास आहे.

(केसरी–१५ ऑगस्ट १९४७)

---

# कूटयुद्धास कौटिल्यच पाहिजे.

**व्रजन्ति ते मूढधियः पराभवम् ।**
**भवन्ति मायाविषु ये न मायिनः ॥**

एक पाकिस्तान तुम्ही दिले, पण तेवढ्याने संपले नाही, अशीं चौदा पाकिस्तानें होणार आहेत, असे स्वातन्त्र्यवीर सावरकर यांनी जेव्हा बजावलें, तेव्हा पुष्कळांना ती गोष्ट असंभाव्य वाटली पण आज ह्या देशात तीन-चार ठिकाणी पाकिस्तान-निर्मितीचे पद्धतशीर प्रयत्न दिसत आहेत; आणि ही पाकिस्तानें सिद्ध झाली तर, बाकीची त्यांच्याच अनुषंगानें क्रमशः पुढे येण्याचा संभव आहे.

हिंदुस्थान आणि पाकिस्तान ही दोन संघराज्यें सध्यां ब्रिटिश साम्राज्याच्या अंतर्गत असल्यामुळे त्याच्यांत उघड युद्ध संभवनीय नाही, असें तात्त्विक दृष्ट्या म्हणून लोकांना निश्चित करण्याचा प्रयत्न तुरळक होत असतो. पण अघोषित असे युद्धहि होऊ शकते, आणि घोषित युद्धांपेक्षाहि तें अधिक जाचक होते. कारण त्याला मायावी कूटयुद्धाचें स्वरूप येतें. त्यामध्यें गुप्तपणा, छद्म, भूमिगत कारस्थान आणि लपवाछपवी हे प्रकार अपरिहार्यतः होतात. तोडानें 'युद्ध' म्हणून म्हणावयाचे नाही, तसे अगाऊ दिसूं द्यावयाचें

नाहीं, पण कृति मात्र युद्धासारखी व्हावयाची, हाच अघोषित युद्धाचा सरळ अर्थ आहे. असल्या युद्धांत एका बाजूला 'वास्तववादी कर्ता पक्ष' आणि दुसऱ्या बाजूला 'तत्त्वधुंद वक्ता पक्ष' असे आज उभे राहिलेले दिसतात. यांत कोणता जिंकणार व कोणता हरणार, हें न सांगताहि समजण्यासारखें आहे.

## युद्धाचें विस्तृत क्षेत्र

सोलापूर येथें समाजवादी भाई गोरे यांचें नुकतेंच एक प्रकट भाषण अनपेक्षितपणें स्पष्टोक्तीचें झालें. त्यांत त्यांनीं, हिंदुस्थान-पाकिस्तान सीमेवर युद्ध चालू आहे, असें म्हटलें आहे. पण त्या अघोषित युद्धाची मर्यादा केवळ सीमेपुरतीच नाहीं, त्या युद्धाला सीमेच्या अलीकडेहि अनेक ठिकाणीं फांटे फुटत आहेत. अंतर्गत यादवी आणि अघोषित युद्ध, ह्या दोहोंचा यांत संकर होऊन त्याला व्यापक स्वरूप प्राप्त झालेलें आहे. 'जातीय दंगल, किंवा अशांतता' हे शब्द पारतंत्र्याच्या काळांत कॉंग्रेसवादी वक्त्यांच्या तोंडीं होते. आजही पोपटाप्रमाणें त्यांचाच उच्चार ते करतात; पण ते आज अर्थशून्य ठरले आहेत. आज त्यांना अघोषित यादवी युद्धाचें 'धुमसणारे उद्रेक' असें स्वरूप आलेलें आहे.

ह्या युद्धांमध्यें एका अंगाला 'स्थिरबुद्धीचा पूर्वनियोजितपणा' आणि दुसऱ्या अंगाला, 'चालढकलीची थोपवाथोपवी' अशी विभागणी स्पष्ट दिसत आहे. पाकिस्तानानंतर लोकसंख्येची अदलाबदल ही अटळ होय, हें ह्या विषयावरील अनेक लेखकांनी पूर्वीपासून स्पष्ट करून ठेवलेलें होतें. डॉ. आंबेडकर आपल्या पुस्तकांत म्हणतात "अल्पसंख्यांचें स्थलांतर करणें हाच निःसंशयपणें जातीय शांततेचा एकमेव स्थायी उपाय आहे. हिंदुस्थान एकजिनसी करण्याचा एकच उपाय आहे, आणि तो म्हणजे लोकसंख्येच्या अदलाबदलीची व्यवस्था करणें. ही अदलाबदल झाल्याविना पाकिस्ताननिर्मितीनंतरहि हिंदुस्थानांत 'बहुसंख्य विरुद्ध अल्पसंख्य' हा प्रश्न पूर्वींप्रमाणेंच राहणार आणि हिंदुस्थानच्या राष्ट्रदेहामध्यें विसंवाद उत्पन्न करीत राहणार."

(पहिली आवृत्ति पृष्ठ ११०-११)

## मुसलमानांच्या योजना

डॉ. आंबेडकरांचें पुस्तक १९४१ मध्यें प्रसिद्ध झालें; पण तत्पूर्वी १९४० मध्यें डॉ. सय्यद अबदुल लतीफ यांचा पं. नेहरूंशी जो पत्रव्यवहार झाला, त्यांत लतीफ यांनीं पुढील गोष्टी स्पष्ट केल्या आहेत. ' काश्मीरच्या पश्चिम भागांत **मुस्लिम** लोकसंख्या मोठी असल्यामुळें, तो पंजाबास जोडावा आणि त्याच्या मोबदल्यांत जम्मूला जोडून असलेला कांग्रा विभाग हा काश्मीरच्या महाराजांकडे देण्यांत यावा. ह्या अदलाबदलीच्या समीकरणाला न्यून पडल्यास ते द्रव्यानें भरून काढावें. गुजराथ आणि राजस्थान येथील मुस्लिम लोकसंख्या हलविल्यास त्या ठिकाणी सिंधी हिंदु मावतील. दिल्ली लखनौ विभागांत रामपूर, दिल्ली, आग्रा, कानपूर आणि लखनौ एवढा सलग प्रदेश येईल आणि त्यामध्यें युक्त प्रांत, बिहार आणि मध्य हिंदुस्थानांतील संस्थाने यांतील मुसलमान आणून भरतां येईल. दक्षिण विभागांत मुसलमान एकत्र करण्याच्या प्रदेशाच्या मर्यादा, निजाम आणि भोंवतालचे प्रदेश यांच्या वाटाघाटीनें ठरविण्यांत याव्या." निर्वासितांनीं बरोबर कोणता माल घ्यावा, त्यांच्या प्रवासव्ययाची व्यवस्था कशी करावी, इत्यादि गोष्टींचीहि चर्चा या पत्रात डॉ. लतीफ यानी केली आहे; आणि शेवटीं असें म्हटलें आहे कीं, " शिक्षण, व्यापार आणि अशा प्रकारचे इतर उद्देश यांच्यासाठी हिंदु किंवा मुसलमान यांना कोठल्याहि विभागांत जाऊन वास्तव्य करता येईल, पण त्या ठिकाणी ते आपल्या मूळ विभागातच राष्ट्रीय घटक म्हणून राहतील."

(डॉ. लतीफकृत ' पाकिस्तानचा प्रश्न ' पृष्ठ ३०–३४)

## जागतिक तत्त्वांची भुरळ

ह्या पत्राला पंडित नेहरूंनी पाठविलेले उत्तरहि वरील पुस्तकांत छापलें आहे. त्यांत ते म्हणतात, ' हिंदु मुस्लीम प्रश्नाकडे पाहण्याची तुमची–आमची दृष्टीच पूर्णपणें वेगळी आहे, म्हणून तुमच्या या योजनांच्या मागें कांहीं वास्तवतेचा आधार मला दिसणें दुरापास्त आहे. यासाठीं त्यांची व्यर्थ चर्चा करीत बसणें ही गोष्ट मला कठीण वाटते. जागतिक प्रवृत्ति पाहिली तर शास्त्रीय, अर्थशास्त्रीय, व्यापारी, कलात्मक आणि सांस्कृतिक दृष्टीनें सुद्धां

ती आज परस्परावलंबित्वाची आहे. तुमच्या योजना या जागतिक प्रवृत्तीच्या विरोधी अशा मला भासतात आणि म्हणून त्या प्रतिगामी स्वरूपाच्या आहेत. अभिनव वेगवान् कालाच्या ओघाशीं अत्यंत विसदृश अशा, अत्यंत स्थैर्यवादी कल्पनेमधून ह्या तुमच्या योजना निघालेल्या आहेत.'
( पृ. ३७-३८)

आज पुरोगामी नेहरू लटके पडले आहेत आणि डॉ. लतीफांची बत्तिशी उमटलीं आहे, म्हणजे त्यांची कल्पना सत्यसृष्टींत आली आहे. मुसलमानांच्या योजना अशा पूर्वीपासून ठरलेल्या आहेत. योजकांनी त्या दहा दहा वर्षे मुस्लीम जनतेंत प्रसृत केलेल्या आहेत. हिंदु लोक स्वराज्याच्या चळवळींत व्यग्र होते तेव्हां मुसलमानांचें हे उद्योग अविरत चालू होते. त्यांत नैसर्गिक प्रवृत्ति, इस्लामी इतिहास, कडवें तत्त्वज्ञान आणि ब्रिटिशांचें उत्तेजन यांची अनुकूलताच होती. हा योजलेला आणि सिद्ध केलेला व्यूह अचानकपणें ज्यांच्या अंगावर आला आहे ते सत्ताधारी हिंदु पुढारी मात्र पूर्णपणें बेसावध, गूढगुंजक आणि भोंगळमुती आहेत.

## घसरलेला डाव

बुद्धिबळामध्यें डाव अंगावर आला म्हणजे आक्रमक बाजूच्या चढाईच्या चाली निश्चितपणें झटपट होतात, तर घसरलेल्या बाजूच्या खेळी या दीर्घसूत्रीपणानें, आणि आलेला शह कसबसा चुकवावयाचा एवढ्यापुरत्याच, होतात. चढत्या बाजूला शीघ्र उपक्रमपटुत्त्व दिमते तर पडत्या बाजूला अनपेक्षित आपत्तीचा तात्पुरता निर्वाह करून वेळ मारून न्यावी लागते. लतीफ यांना पाठविलेल्या उत्तरात जी जागतिक तत्त्वांची धूम्रवलयें नेहरूंच्या डोक्यांत तरंगत होती, ती अद्यापि तशीच आहेत; आणि त्यांना गांधीजीच्या पराकोटीच्या नैतिक आदर्शवादाची जोड मिळाली आहे. हिंदुस्थानांत ज्या मुसलमानांना अलीकडेच 'हिंदीराज्य-निष्ठे'चा आश्चर्यकारक पान्हा फुटला आहे. ते नेमके ह्याच दोघा पुढाऱ्यांकडे बोट दाखवून, 'हे दोघे (गांधी नेहरू) आहेत म्हणूनच आम्ही निश्चित आहोत," असें उद्गार काढीत आहेत ! त्यांतील स्वारस्य जाणत्यांना उमगण्यासारखे आहे.

निर्वासित लोकांच्या हालचाली, अंतिमोत्तरें, वाहतुकीला बंदी, सैन्याच्या हालचाली, एकमेकांच्या सैन्यासंबधानें खरेखोटे अंदाज ह्या सर्व

गोष्टी युद्धाच्या अनुषंगानेच होतात. आज वृत्तपत्रांतून येणाऱ्या वार्तांमधून त्याच सर्वत्र विखुरलेल्या आढळतात. यालाच अनुषंगिक अशा 'पंचमस्तंभी दल' ह्या घटनेचें हे अस्पष्ट दर्शन कित्येक वार्तांतून होत आहे उदाहरणार्थ जबलपूर येथील महंमद इस्माइल या कापड व्यापाऱ्याच्या गोदामांत ४५ पोती काडतुसे, ८ मण छरे आणि कित्येक पौंड बंदुकीची दारू सांपडली. हे सद्गृहस्थ शांतता समितीचे सभासद आहेत ! वऱ्हाडातील प्रादेशिक वाहतुक खात्याच्या कार्यालयातून अप्रमाण पेट्रोलची कुपनें जात आहेत, असें आढळून आल्यावर चौकशी झाली आणि त्याचा सुगावा लागतांच ज्या मुस्लिम अधिकाऱ्याचा ह्यात संबंध होता ते किरकोळ रजा घेऊन हैद्राबादेत पसार झाले, अशी एक अनधिकृत वार्ता वऱ्हाडातील वृत्तपत्रांत आली आहे. एक लक्ष मुसलमान भोपाळमध्ये भोंवतालच्या प्रदेशातून एकत्रित झाले, आणि तेथून ते निजाम राज्याकडे जाणार होते, पण हिंदुस्थान सरकारने त्यांच्या या प्रवासाची सोय करण्याचें नाकारलें. सध्या पाकिस्तानचे गव्हर्नर–जनरल आणि भोपाळचे नबाब ह्यांची बोलणी चालू आहेत. भोपाळ हें एक संभाव्य पाकिस्तान होतें. जुनागड, हैद्राबाद आणि काश्मीर ह्या ठिकाणी घडणाऱ्या घडामोडींवरून नबाबाना आपण हिंदी संघराज्यात सामील झाल्याची चूक कशी सुधारावी, ह्या संबंधी चिंता लागून राहिल्याचें दिसतें.

## काश्मीराविरुद्ध कोंडी

पाकिस्तानचे वाहतूक मंत्री गुपचूप जुनागडला जाऊन आले आणि जुनागडला आठशे मुसलमान दाखल झालें असून त्यांना संस्थानाने शस्त्रास्त्रेहि दिली आहेत, अशीहि वार्ता आहे. मंगरोळच्या 'शेख' ने हिंदी राज्यांत येण्याचा करार केला होता, पण जुनागड सैन्याने त्यांच्यावर बंदुका रोखून पाकिस्तानांत सामील होण्याची मान्यता घेतली अशीं माहिती उजेडांत आली आहे. काश्मीर सरकार आणि पाकिस्तान सरकार यांची एकमेकांवर उघड आरोप करणारी पत्रके निघत आहेत. काश्मीर दरबारचें पत्रक म्हणतें की, 'पश्चिम पंजाबांतून काश्मीरकडे येणाऱ्या आवश्यक मालाच्या वाहतुकीत अडथळे येत आहेत, इतकेंच नव्हे तर, टपालाच्या व्यव-

हारांतहि आडकाठी होत आहे. सियालकोट ते जम्मू ही वाहतूक थांबली आहे. पाकिस्तान नभोवाणीमधून काश्मीरविरुद्ध सतत खोटा प्रचार केला जात आहे. हें सर्व पाकिस्तान सरकारच्या डोळयादेखत चालले असल्यानें ही कृत्यें शत्रुत्वाची अशीं म्हटली नाहींत तरी, आत्यंतिक अमित्रत्वाची आहेत असें म्हटलें पाहिजे. ही कृत्यें थांबली नाहीत तर काश्मीरला आपल्या बचावासाठीं इतरांकडून साह्य मागावें लागेल, असेहि ह्या पत्रकांत काश्मीर राज्याने ध्वनित केलें आहे. हें सर्व प्रकार चालले असतांना दिल्लींत बसून गांधीजी, दिल्ली निर्मुसलमान झाली म्हणून शोकगीते गात आहेत, आणि पंडित नेहरूंनी युक्तप्रांतात लोकाना शांतता राखण्यासाठी लखनौ येथें उपदेश केला आहे. निजामाशीं चाललेल्या दिल्लीतील वाटाघाटीना अखेरचा श्वास लागल्यामुळें शेवटचा उपाय किंवा अंत्यविधी करण्यासाठीं नेहरू परत' दिल्लीस आले. आता ' एक वर्षापुरती आहे तीच स्थिति चालू ठेवावयाची असा कांहींतरी ' निजाम व हिंदुस्थान ' करार बाहेर पडण्याचीं चिन्हें दिसत आहेत.

## निजामी प्रजेची उकडहंडी

इकडे निजामींमध्यें शिकंदराबाद व बोलाराम येथें असलेलें हिंदी संघराज्याचे सैन्य काढून न्यावें अशी इत्तेहादउल् मुसलमीन ही सुत्रधारक संस्था ओरड करीत आहे. ' आम्ही सैन्य वाढविलें नाहीं, सैन्याला नवीन शस्त्रास्त्रें दिली नाहींतच निर्वासितांना सैन्यांत घेतलेलें नाहीं असें तीन नकार निजाम सरकारने प्रसिद्ध केले आहेत. निजामीमध्यें ४२ च्या चळवळीतील सातारच्या ग्रामराज्याप्रमाणें ग्रामराज्यें सुरूं झाल्याची वार्ता आहे. तेथें गेलेल्या मुसलमान निर्वासितासाठीं हिंदुंकडून सक्तीने द्रव्य घेण्यांत येत आहे. सर्व बाजूंनीं पंचवीस-तीस हजार मुसलमान निजामीत प्रविष्ट झाले असून मनमाड ते औरंगाबाद खास गाड्या भरून आणखी दहा पंधरा हजार मुसलमान येत आहेत.

भाई गोरे आणि प्राध्यापक धनंजयराव गाडगीळ या दोघांनीहि आपापल्या दृष्टींनी सध्याच्या स्टेट कॉंग्रेसच्या लढ्याची अयुक्तता दाखविली आहे. आजचें देशव्यापी अघोषित युद्धाचें एक क्षेत्र निजामी राज्य हें

असल्यामुळें येथे ' सविनय निर्बंधभंगा ' सारखे मर्यादशील लाड झगडे निरर्थक ठरतात. हैद्राबादशी आणि जुनागडशी काय करावे यासंबंधी सध्याच्या सरकारला पेचच पडल्या सारखा दिसतो. याचे कारण जनतेचा सविनय लढा, आत्मिक बल, जागतिक लोकमनाचा नैतिक पाठिंबा आणि हृदय परिवर्तन इत्यादि शब्द आज थुंकून टाकलेल्या उसाच्या चोयटयाप्रमाणें झाले आहेत. हैद्राबादच्या हिंदु प्रजेने जुन्या काळांतील सत्याग्रही लढा आरंभला आहे. पण तो आजच्या भीषण कालाशीं अगदी विसदृश दिसतो. त्या लढयाला बाहेरच्या कॉंग्रेस संघटनेचा अधिकृत पाठिंबा मुक्तकंठानें मिळालेला नाहीं. स्टेट कॉंग्रेसच्या लोकाची निष्ठा, चिकाटी, त्याग, जूट ही आदरणीय वाटली तरी ते सध्याच्या सर्वतंत्र स्वतंत्र निजामाशीं सामना देण्यास कितपत पुरे पडणार ? सविनय प्रतिकार हा मर्यादशील संस्कृतीच्या इंग्रजांपुढे चालला. पण ' आज ' तो चालणार नाही. असें राष्ट्रसभापति म्हणाले. या ' आज ' मधील गर्भित अर्थ सहज कळण्यासारखा आहे.

## निश्चित धोरण चालवा

इतक्या दिवसांनंतर आता ' पश्चिम पंजाबांत ' काय काय झाले, यासाठी एक ' वस्तुस्थिति संशोधक समिति ' हिंदुस्थान सरकारने नियुक्त केली आहे ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे सेक्रेटरी, सादीकअल्ली यानी, खालपर्यंतच्या सर्व कॉंग्रेस समित्याना व सभासदांना देशांत शांतता राखण्याचे आटोकाट प्रयत्न करण्याची विनति केली आहे. लोकनियुक्त सरकार असताना, लोकांना शांतता राखण्याच्या कामीं विनंत्या करण्याची पाळीं कां येत आहे याचा विचार करावयास पाहिजे. निर्वासितांच्या साहाय्यासाठीं सरकार जे यत्न करीत आहे, त्यांचे स्वागत करून, लोक स्वयंस्फूर्तीने त्यास साहाय्यांत भर टाकीत आहेत. अर्थात् लोकांमध्ये सरकारला साहाय्यकारी होण्याची भरपूर बुद्धि आहे हे निःसंशय. पण आज पाकिस्तानचे गुप्त हात जागोजाग जे संघर्ष निर्माण करीत आहेत त्यांच्या विरुद्ध योजनापूर्वक निश्चित असें धोरण जनतेला दिसत नाही. म्हणून ती गोंधळल्यासारखी वागत आहे. तें स्पष्ट दिसलें तर सरकारच्या मार्गात अडथळा येण्यासारखें वर्तन जनता मुळीच करणार नाही. पाकिस्तान सरकार आणि पाकिस्तानी

जनता यांच्यामध्ये जी एकतानता दिसते ती दुर्दैवानें हिंदुस्थानांतील सत्ताधारी आणि लोक यांच्यांत दिसत नाही. सत्ताधारी व्यक्ती या दोन तोंडांनी कांही निरनिराळे बोलत आहेत असें जनतेला भासमान होते. म्हणूनच नेहरूंना त्यांच्याच पुढारीपणाखाली नोंदलेल्या युक्तप्रांतांत जाऊन लोकांना शांतता राखण्यासाठी धमकावण्या द्याव्या लागत आहेत. सत्ताधाऱ्यांचें एखमुखी व समर्पक धोरण सार्वत्रिक दिसतें तर, जनताहि त्यांच्या आळवणीची वाट न पाहतां, त्यांचा पाठपुरावा करील, आणि योग्य तो त्याग व संयमहि दाखवील; पण हें घडेल तेव्हा खरें.

## पटेलांना सर्वाधिकारी नेमा

गेलें महायुद्ध इंग्रजांच्या अंगावर आलें होतें. त्यांची युद्ध सिद्धता केविलवाणी होती. पण दोन वर्षे युद्ध अंगाशीं येऊं न देतां सिद्धता करावयाची असें चर्चिलने ठरविलें आणि इंग्लंडने त्याचा पाठपुरावा केला. आजहि युद्धपरिस्थितीप्रमाणें महागाई, अन्नटंचाई, वटहुकमी कारभार इत्यादि गोष्टी हिंदुस्थानांत चालू आहेत. तात्पुरता सर्वाधिकारी नेमणे ही त्यापैकीच गोष्ट आहे. सरदार पटेलांना एक प्रकारें सर्वाधिकार देऊन सध्याच्या अघोषित युद्धाची तड पोचविण्याचे सरकारने ठरविलें तर घसरलेली बाजू सावरली जाईल. सरदार पटेल हे मितभाषणी पण कृतिप्रवण आहेत. " अशी लवे तशी लवे " याप्रमाणे कर्दळीसारखे वाग्विक्षेप चालवणाऱ्या कांहीं पुढाऱ्यांच्या घोळक्यांत ते एक स्थिर स्तंभाप्रमाणे भासतात. त्यांनी आपल्या मनाप्रमाणें इतर माणसें घ्यावीं. आर्य चाणक्याप्रमाणे तें कणखर आहेत त्यांच्या सूत्रचालनेनुसार सर्वांनी चंद्रगुप्ताप्रमाणे वागावें. असें झालें तर जनता सर्व कष्ट सोसून राज्ययंत्राशीं समरसतेने आवश्यक ते सर्व व्यवहार बिनबोभाट करील असे आम्हांस वाटतें. गांधी नेहरू यांना आता विश्रांतिसुखाचा लाभ घेऊं द्या असें आदरपूर्वक म्हणून पटेलांच्या हातीं सूत्रें असें द्या म्हणण्यातहि जर कांहीं 'पाप' होतें असें वाटत असेल तर मग ही 'लोकसत्ता 'च नव्हे. एकप्रकारे अंधसत्ता चालू आहे असे म्हणावें लागेल.

(केसरी-१७ ऑक्टोबर १९४७)

------

## धर्मवेड्यांचें त्रिखंड साम्राज्य

ईदनिमित्त पाकिस्तानचे गव्हर्नर जनरल जिना, यांनी जो संदेश दिला आहे तो केवळ पाकिस्तानापुरता नसून, 'पाकिस्तान आणि मुस्लीम जगत्' यांना उद्देशून आहे. हिंदुस्थानांतील मुसलमानांची गांजणूक व छळणूक होत आहे, अशी त्यांनी ओरड केली असून, त्याचें कारण पाकिस्तानाच्या स्थापनेला त्यांनी साहाय्य केलें, एवढेंच आहे असें ते म्हणतात. तसेंच, पाकिस्तानचें ध्येय, म्हणजे इस्लामच्या विशिष्ट कल्पनेप्रमाणें तें राज्य बनविणें असें त्यांनीं दिग्दर्शित केलें आहे. हिंदुस्थानमध्यें हिंदु-धर्माधिष्टित राज्य करण्याची कोणाचीहि कल्पना नसतांना, त्यावर आपला राग. फुकट घालविणाऱ्या नेहरूंनीं, त्याचा निदान कांहीं अंश ह्या शेजारीच स्थापन होणाऱ्या उघडपणें धर्माधिष्टित अशा राज्याकडे वळवावा.

हिंदुस्थानांत 'हिंदु धार्मिक राज्य' होण्यापेक्षां पाकिस्तानांत 'इस्लामी धार्मिक राज्य' होणें हें शंभरपटीने अधिक हानिकारक आहे; कारण पाकिस्तानांतून ही कल्पना जगांतील दहा वीस इस्लामी राजवटीत पसरणार आहे. नेहरू नेहमी म्हणतात की, केवळ हिंदुस्थानापुरतें पाहून उपयोग नाहीं; जगांत काय चालले आहे तें पाहावें. त्या दृष्टीनें

पाकिस्तानांत इस्लामी राज्य होणें ही फार मोठी जागतिक महत्त्वाची गोष्ट आहे. जिनांनी आपल्या ईदच्या संदेशांत शेवटीं जगांतील सर्व मुसलमानांची सहानुभूती पाकिस्तानाला मागितली आहे; आणि जिना हे नुसतें तत्त्वप्रवचनांत गुंग होणारे नाहीत, त्यांनी त्या दृष्टीनें कृतीहि सुरू केली आहे.

## इस्लामी राज्यांची सांखळी

दि. २० ला जिनांचे खास प्रतिनिधि सैदुल्लाखान यांनी काबूलला जाऊन अफगाणिस्थानच्या राजाची भेट घेतली. मुंबईच्या ' नॅशनल स्टॅंडर्ड ' चा वार्ताहर दि. १९ ला दिल्लीहून पाठविलेल्या वार्तेत म्हणतो की, कायदे अझम जिना हे बऱ्याच परराष्ट्रीय वार्ताहरांना अलीकडे मुलाखती देत आहेत. ' मलिक फिरोजखान नून यांना परराष्ट्रीय प्रतिनिधित्वाची स्थानमान्यता देऊन दोन महिन्यांच्या अवधींत इराक, इराण, तुर्कस्तान, सीरिया, लेबॅनान, सौदी अरबस्तान नि ईजिप्त इतक्या देशांना भेटी देण्यासाठी जिनांनी पाठविलें आहे. दि. २३ ला कराचीहून प्रस्थान ठेवतांना नून म्हणाले कीं, या देशांशीं सांस्कृतिक आर्थिक नि ' इतर ' लागेबांधे सुदृढ करण्याच्या उपायांचें संशोधन मी करणार आहे. आजच्या स्थितींत जगातील मुस्लीम राष्ट्रांनीं एकत्र येऊन 'एकमेका साहाय्य करूं' या धोरणानें चाललें पाहिजे आणि जगांतील मुसलमानासंबंधीच्या सर्व कामांत एकविचारे सहकारिता दृढ केली पाहिजे, असेहि नून म्हणाले.

## धर्मयुद्धाची धमकी

याच दिवशीं कराचीहून काढलेल्या पत्रकांत जिना म्हणाले की, पॅलेस्टाइनची फाळणी योजना मागे घेण्यात आली नाही तर फाळणी करणाऱ्यांविरुद्ध सर्व '' इस्लामी जगत् ' उठावणी करील व फाळणी हाणून पाडील. पॅलेस्टाइनच्या फाळणीसबंधाने एकदां ' यूनो ' च्या कमिटीनें निर्णय केला असतांना देखील, इराक, सिरीया, ईजिप्त इत्यादि भोवतालच्या मुसलमान राष्ट्रांनी सशस्त्र आणि ससैन्य आक्रमण करण्याचा धाक घातला, तेव्हां ' यूनो ' या संयुक्त राष्ट्रसंघाच्या समितीला एकदां घेतलेला पॅलेस्टाईनच्या फाळणीचा निर्णय पुन: भिजत घोंगड्यासारखा

नव्या वाटाघाटींत बुडवावा लागला आहे. पॅलेस्टाईनची फाळणी झाली तर इराकचें सैन्य ताबडतोब पॅलेस्टाईनमध्यें घुसेल, असें नुकतेंच इराकी प्रधानांनी भाषण केलें. त्यांत त्यांनीं म्हटलें की, पॅलेस्टाईनला वांचविण्याला जिहादची (धर्मयुद्धाची) आवश्यकता आहे. पॅलेस्टाईनची विभागणी करून तेथें एक ज्यू राष्ट्र निर्माण होऊं देण्यापेक्षां सर्व अरबांनीं मरण पत्करलेलें बरें असें त्यांनीं निर्वाणीचे उद्गार काढले !

बगदाद येथें एक हजार अरब आणि कुर्द प्रमुखांची सभा भरून तींत ठराव झाला की, " प्रत्येक माणसानें पॅलेस्टाईनच्या रक्षणासाठीं धर्मयुद्ध करण्यास सिद्ध असलें पाहिजे." म्हणजे हा लढा आर्थिक नाहीं, साम्राज्यवादी नाही, तर मुख्यत: धर्मभेदावर आधारलेला आहे. चीनमधील मुसलमानांनीं नुकताच पाकिस्तानला 'इस्लामी धर्मबांधव' म्हणूनच स्नेहाचा संदेश पाठविला होता. निजाम आणि हिंदुस्थान ह्यांच्यांत सुरळीत संबंध प्रस्थापित होण्यास, ज्या महत्त्वाच्या अडचणी आहेत, त्यांपैकी एक अडचण म्हणजे निजामाचा बाहेरच्या राष्ट्राशी स्वतंत्र संबंध ठेवण्याचा आग्रह चालू आहे ही होय. हा **अधिकार निजामाला मिळाला** तर तो प्रथम बाहेर कोणाशीं संबंध ठेवण्यास धावणार, हे सहज समजण्यासारखें आहे. निजामी राज्यांतील सूत्रचालक आणि निजामावरहि छाप ठेवणारी संस्था 'इत्तेहाद–उल–मुस्लमीन' ही आहे. तिच्या प्रत्यक्ष प्रतिकार–समितीचे प्रवर्तक यामीन झुबेरी हे नुकतेच हैद्राबादेहून पाकिस्तानला गेले आहेत यावरून हाच तर्क बळावतो.

## साम्यवाद्यांच्या नंदनवनांत

साम्यवाद्याचें नंदनवन म्हणून संबोधल्या जाणाऱ्या रशियांतील सोव्हिएट राष्ट्रसंघांत 'उझबेकीस्थान' मध्यें ताशकंद ह्या ठिकाणी एक स्वतंत्र नभोवाणी क्षेपक केंद्र सुरूं करण्यांत आले असून, तेयून मध्य आशियांतील देशांना वार्ता प्रसृत केल्या जातात. ह्यांमध्यें गेल्या आठवड्यांत इंडोनेशियांतील व इतर देशांतील मुस्लीमाचें ऐक्य झाल्याबद्दल समाधान व्यक्त करण्यांत आलें, आणि शेवटी असें सांगण्यात आलें कीं, " उझबेकीस्तान, तुर्कोमेनिस्थान आणि ताजिकीस्तानमधील आम्ही मुसलमान इंडोनेशियामधील

मुसलमानांच्या स्वातंत्र्याला पाठिंबा देतो" हीं तिन्हीं 'स्तानें' सोव्हिएट राष्ट्रसंघाचीं घटक असून, त्यांच्या या प्रचाराला '**मुस्लिम सोव्हिएट प्रचार**' असें नांव वृत्तपत्रांतून देण्यांत आलें आहे.

ह्याप्रमाणें मध्य आशियांतील निरनिराळ्या राज्यांचा राष्ट्रवाद हा इस्लामी धार्मिक राष्ट्रवादाचें स्वरूप घेत आहे. युरोपच्या सान्निध्यानें हीं राष्ट्रें धर्महीन व लौकिक ध्येयें पत्करून त्यावर आपला राष्ट्रवाद उभारतील अशी आशा कित्येक भाबडे हिंदु करतात. परंतु ती सिद्ध होण्यास अजून बराच काळ जावयाचा आहे.

## मुस्लिम जगताची प्रगती

१९४० मध्यें पाकिस्तानचा ठराव मुस्लीम लीगनें केल्यानंतर त्या-संबंधानें सांगोपांग चर्चा करणारीं अनेक पुस्तकें निघाली, त्यांमधूनहि हा जागतिक मुस्लीम संगनमताचा ध्येयवाद स्पष्टपणें मांडण्यांत आला आहे. १९४२ मध्यें जिनांच्या प्रस्तावनेसह दिल्लीच्या मुस्लीम लीगनें छापलेलें 'पाकिस्तान' या विषयावर एक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, " मुस्लीम जगत हें वेगानें जागृत होत आहे, आणि हिंदी मुसलमान हे त्या जगताचे अभेद्य अवयव आहेत. हिंदी मुसलमान हे जगां-तील एकंदर मुस्लीम लोकसंख्येच्या चतुर्थांश आहेत आणि इतर मुस्लीम देशांत ज्या राजकीय स्वातंत्र्याच्या चळवळी चाललेल्या आहेत, त्यांच्या-पासून हिंदी मुसलमान अलग राहूं शकणार नाहीत. इतकेंच नव्हे तर, त्यांच्या संख्याबलामुळें आणि राजकीय महत्त्वामुळें ते ह्या मुस्लीम जगाचे पुढारीपण स्वीकारण्यास योग्य आहेत." मुस्लीम लीगच्या १९४० च्या पूर्वीच्या चळवळीमध्यें मुसलमानांच्या प्रसिद्ध चौदा मागण्या पुढें आलेल्या होत्या आणि त्यांतूनच वाढतां वाढतां पाकिस्तान निर्माण झालें. त्याच्यापुढें चौदा पाकिस्तानें हिंदुस्थानांतच आहेत. तसेंच मुसलमानांच्या जागतिक साम्रा-ज्याच्या प्रारंभाच्या मागण्या देखील चौदाच आहेत !

## जागतिक चौदा मागण्या

वर उल्लेखिलेल्या पुस्तकांत 'प्रत्येक मुसलमानापुढे असलेलें राजकीय ध्येय' ह्या मथळ्याखालीं असलेल्या स्वतंत्र प्रकरणांत ह्या चौदा मागण्या

दिलेल्या आहेत. त्या अशा:--"(१) अरबस्तानचे एक संयुक्त राज्य करून त्यामध्यें सौदी अरबस्तानचीं राज्यें, येमेन, ओमान, कुवीट आणि इतर अरबस्तानांतील राज्यें एकत्र करावयाचीं. (२) सिरीयाचे एक पूर्ण स्वतंत्र असें संयुक्त राज्य बनवावयाचें. त्यामध्यें सिरीया, ट्रॅन्सजॉर्डन, पॅलेस्टाईन, लेबेनॉन, लताकिया आणि जेबेली ड्रूस इतऱ्यांचा अंतर्भाव होईल. (३) ईजिप्शियन सुदानचा ईजिप्तमध्यें अंतर्भाव करून, त्याचें एक राज्य करावें. (४) ट्रिपोली, ट्यूनिस आणि अल्जेरिया हीं स्वतंत्र करून त्यांचें एक संयुक्त राज्य बनवावे. (५) मोरोक्काला पूर्ण स्वातंत्र्य देऊन सध्यां स्पेनच्या ताब्यांत असणारा 'रीफ' प्रदेश आणि 'रायो-डी-ओरो' प्रदेश मोरोक्कोंत पुनः समाविष्ट करावा. (६) ॲबिसीनिया, इरिट्रिया आणि सोमालीलॅंड ह्यांचें एक ॲबिसीनियन राज्य स्वतंत्र करून त्यांतच ब्रिटिश आणि फ्रेंच सोमालीलॅंडचे प्रदेश घालावे. (७) रशियन आणि चिनी तुर्कस्तान एकत्र करून मध्य आशियांत त्यांचे स्वतंत्र राज्य बनवावें. (८) अफगाणिस्तानाला समुद्राला जोडणारा प्रदेश देऊन, टोळयांचा प्रदेश त्याच्याकडे द्यावा. (९) काश्मीर, पंजाब, सिंध आणि सीमाप्रांत यांचें स्वतंत्र संयुक्त राज्य बनवावें. (१०) पूर्वबंगाल आणि आसाम ह्यांचे एक स्वतंत्र राज्य करावें. (११) चीनमधील पश्चिम बाजूच्या चार प्रांतांत मुसलमान बहुसंख्य असल्यामुळें, चीन देशापासून स्वतंत्र असें संयुक्त राज्य बनवावें. (१२) जपानच्या ताब्यांतील पूर्वेकडील बेटें, मलाया द्वीपकल्प आणि ब्रिटिश बोर्निओचा प्रदेश मिळून एक स्वतंत्र संयुक्त राज्य करावें. (१३) अल्बानिया, अझरबेजान, दाघस्तान आणि सिकीसिआन प्रदेश यांचीं स्वतंत्र राज्यें बनवावीं. (१४) आफ्रिकेतील महावाळवंटाच्या दक्षिणेकडील पश्चिम आफ्रिकेंत फ्रेंच आणि ब्रिटिश प्रदेश आहेत, त्यांचें एक संयुक्त राज्य बनवावें. त्यामध्यें उत्तर व दक्षिण नायगेरिया, फ्रेंच सुदान, गोल्ड कोस्ट, टोगोलॅंड, सीरालीऑन, फ्रेंचगिनी, आयव्हरी कोस्ट, सेनेगॉल नायगर, मौनिटानिया, लिबेरिया आणि चॅड ह्यांचा अंतर्भाव होईल ! !

## हिंदी मुसलमानांचा अभ्यास

हे पुस्तक मुंबईत मलबार हिलवर असणाऱ्या 'होम स्टडी सर्कल' नें म्हणजे अभ्यास मंडळानें प्रसिद्ध केलें आहे. ह्यामधील हीं प्रकरणें हीं लेख-

रूपानें तत्पूर्वी वर्तमानपत्रांतूनहि प्रसिद्ध झालीं आहेत. हा जागतिक अभ्यास -विषय पाकिस्तानांत राहून अभ्यासिला जात नव्हता. तर हिंदुस्थानांत मुंबईला राहून आणि इकडे १९४२ ची हिंदूची "छोडो हिंदुस्थानची" ची चळवळ चालू असतांना शातपणें चालू होता. ह्या चौदा मागण्या सिद्ध झाल्यानंतर वीस स्वतंत्र मुस्लीम राज्ये सिद्ध होतील, आणि निदान पांच तरी लौकरच पहिल्या प्रतीचीं प्रबळ राष्ट्रें बनतील, असें ह्या पुस्तकांत म्हटलें आहे. चौदा चौकड्यांचें राज्य हें रावणी राज्याच्या कालविस्ताराच्या दृष्टीनें दिलेले नांव आहे. या युगाच्या चौकड्या होत्या. तेंच नांव या जागतिक यावनी राज्याला स्थलविस्ताराच्या दृष्टीनें सोयीसाठी लावता येण्यासारखें आहे. तीन्ही खंडात पसरलेल्या ह्या चौदा चौकड्यांच्या राज्याचे क्षेत्रफळ व लोकसंख्या ह्याची विगतवारी ह्या पुस्तकांत दिली आहे. ते सर्व आंकडे बिचाऱ्या हिंदूपुढे माडून त्यांना त्रास न देतां, त्यांची बेरीज तेवढी येथे दिल्यास पुरेसें होईल. ती अशी:— "एकंदर प्रदेश एक कोटी चाळीस लक्ष सदुसष्ट हजार चौरस मैल आणि साडे अडतीस कोटीची लोकसंख्या." ह्याप्रमाणें इस्लामी जगताची कल्पना देऊन त्याच्यापुढें तीन मुख्य संकटे आहेत. असें या पुस्तकांत म्हटलें आहे तीं संकटें क्रमानें पुढीलप्रमाणे-(१) हिंदुस्थान, चीन आणि रशियामधील अल्पसंख्याकांचा प्रश्न, (२) युरोपियन वसाहती-करणाचा प्रश्न, (३) जपानमधून अलीकडे उत्पन्न होणारे आक्रमणाचे बळ.

जीना हे धुर्त असल्यानें किंचित् सावधपणाने बोलतात; परंतु त्यांच्या कित्येक अनुयायाना इतका संयम रहात नाही. त्यापैकी कांहींनी १९४० मध्येच असें स्पष्ट म्हटलें होतें की, पाकिस्तान ही आमची शेवटची मागणी नसून ती पुढील उत्थानाची केवळ पहिली पायरी आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणातून अनेकवेळा ह्या इस्लामी जागतिक आकांक्षांची ओळख हिंदूना करून दिलेली आहे. 'नेपाळशी स्वतंत्र हिंदु राज्य' या नात्याने येथील हिंदुमध्ये जिव्हाळा निर्माण करण्याचा यत्न स्वातंत्र्यवीरांनी रत्नागिरीच्या अज्ञातवासातच चालू केला. चिनी **इस्लामी** संघाचें प्रतिनिधि ऑथमन बू १९४१ मध्यें हिंदुस्थानात आले असता, सावरकरांनीं त्यांच्या आणि मुस्लीम लीगच्या भेटीगाठीवर विरोधी टीका केली होती. त्या वेळीं नटराजन्सारखे सालस हिंदु संपादक सावरकरांची चिनी

मुसलमानांवरील टीका असभ्यपणाची परिसीमा होय असे म्हणाले होते तर नेपाळास जाऊन आल्यावर येथील मागासलेपणाची चेष्टा करून विद्वान् हिंदु म्हणत होते की, ' हें पहा तुमच्या सावरकरानी उंचावलेल्या स्वतंत्र नेपाळाचें हिडिस चित्र. ' हिंदुमधली ही सदगृहस्थी वृत्ती वीर सावरकरांमध्ये नाही असें नाही. पण ती केवळ समोर सत्प्रवृत्त, मनुष्य असेल तर त्याच्याशीच प्रतियोगी अशी आहे. १९४१ मध्यें मद्रासला मुस्लीम लीगच्या अधिवेशनांत जिनांचें जें भाषण झालें त्याला उत्तर वीर सावरकर यांनी एका पत्रकाने प्रसिद्ध केलें होतें, त्यांत त्यांनी अखिल इस्लामची जागतिक सांखळी झाली, तर उलट हिदु–बौद्ध अशी सांखळी जपान ते जम्मूपर्यंत होण्याचाहि संभव दाखविला होता. त्यांतील स्वारस्य आता तरी हिंदूंच्या ध्यानांत येईल काय?

## हिंदूंचें कुसळ मात्र खुपतें

सावरकर हे ज्या काळांत ' सभ्य ' हिंदूना विचित्र वाटणारे, वरील प्रकारचे यत्न करीत होते, त्यावेळीं हिंदुस्थानांतील राष्ट्रीयत्वाचे १९२० पासून एकमेव ठेकेदार बनलेले लोक काय करीत होते ? खिलाफतच्या जागतिक मुसलमानी ऐक्याच्या केंद्राला वाचविण्यासाठी त्यांनी हिंदूंचें सामर्थ्य पणाला लावले. तुर्कस्तानांतील लढाईत शुश्रूषा पथकाचा निधि जमविणारे अल्ली बंधू' ह्याना त्यांनी डोक्यावर घेतलें. गेल्या युद्धामध्ये मुसलमान सैनिक मुसलमान देशांविरुद्ध पाठवूं नयेत अशी अट सांगणाऱ्या येथील मुसलमान पुढाऱ्यांविरुद्ध त्यांनी 'ब्र' हि काढला नाही. मुसलमानांच्या परराष्ट्रीय मुसलमानांशी असलेल्या या जिव्हाळयाला राष्ट्रीयत्वाच्या हिंदु ठेकेदारानी उलट गौरविलें आहे. इस्लामी राष्ट्रांमध्यें पाकिस्तानाचे दूत विशिष्ट उद्देश ठेऊन जात असतां हिंदुस्थान राज्याच्या परराष्ट्रीय प्रतिनिधींची स्थानें मात्र अधिकांश मुस्लीमांकडेच जात आहेत. असफ अल्ली व सय्यदअल्ली जहीर यांच्या नेमणुका त्या दृष्टीने सूक्ष्म दृष्टीच्या लोकांच्या ध्यानांत आहेंतच. आता मौ. आझाद आणि सय्यद हुसेन यांचीही नांवें ऐकूं येत आहेत. नसलेल्या धर्मनिष्ट हिंदुराज्याच्या कल्पनेवर डाफरणाऱ्या नेहरूंनी जरा डोळे उघडून इस्लामी जगतांतील सध्यांच्या घटनांकडे पाहावें. त्यांना हिंदुस्थानांत हिंदु राज्याचें कुसळ दिमतें पण जगताच्या पटावरील तीन खंडांत पसरलेलें ईस्लामी धर्माधिष्टीत राष्ट्रसंघाचें मुसळ दिसत नाही हे आश्चर्य नव्हे काय?

केसरी दि. २८ ऑक्टो. १९४७

# व्यक्तिपूजेसाठीं राष्ट्रबलिदान

गांधीचा उपास, जणूं कांही पूर्वनियोजित कटाच्या संगनमतानुसार रविवार दि. १८ ला मध्यान्हकाल उलटून गेल्यावर मौ. आझादांच्या हातच्या जीवनरसाच्या एकच प्याल्याने सुटला! या उपासाचे ढोल बडवण्याचा यत्न गांधीनी गुंतवून कच्छपी ठेवलेल्या भाडोत्री प्रचारकांकडून झाला नाही असें नाही. पण तो वठावा तसा या वेळीं वठला नाहीं इतकेच नव्हे तर दिल्लीस एकंदर वातावरण या उपासाच्या विरुद्ध होतें. या विरोधाचें जमावाने प्रदर्शन केले, तें चिडखोर नेहरूंनी मारावयास धावण्या-इतके बोचक झाले. पुढे पंचावन्न कोटि रुपये पाकिस्तानाला न देण्याच्या प्रतिज्ञेवरील शाई वाळण्यापूर्वीच ते पाकिस्तानला देण्याची जी अनाहूत व अप्रस्तुत घोषणा करण्यांत आली त्यायोगे आजवर प्रबळ गांधींभ्रांतीने पछाडलेल्या लोकांच्याहि डोळयापुढे काजवे चमकले आणि डोक्यांतील चक्रें गरगरां फिरूं लागली. पटेलांची लोखंडी काब पाठीच्या कण्याप्रमाणे सध्या-च्या होयबांच्या मंत्रिमंडळामध्ये आहे· गांधीवादाने पुरा राष्ट्रनाश होण्याचे थांबण्याच्या आशेला ही एक लहानशी जागा होती. पण राष्ट्राला ग्रासलेल्या गांधीवादाचा शाप तिच्याहि पाठीमागे हात धुवून लागलाच.

## आजची घोर संक्रांत

बाहेरचीच्या नादीं लागलेला नवरा धर्मपत्नीचे हाल करून संतुष्ट होत नाही; ठेवलेल.चें कोड पुरवूनच त्याची आसुरी लालसा थांबत नाही तर ज्या वेळीं तिला घरांत आणून हिच्या डोक्यावर मिरे वाटावयास तो लावतो त्या वेळीं त्याचा आत्मा थंड होतो. सरदार पटेल ताठ असतील, मानी असतील, पण तो ताठरपणा हवा तर स्वकीय हिंदूंना दटावण्यासाठी चालावा. गांधीप्याऱ्या इस्लामी जमातीपुढे तो क पद.र्थ होय, असें व्यक्तिश: गांधींना वाटतें हें सर्वांस माहीत आहे. व्यक्तीला हवें तें मानण्याचें स्वातंत्र्य आहे. पण हिंदुस्थानी राष्ट्राची मानखंडना करून, या देशावर जी गांधी राजवट चालू आहे तिच्यावरहि ही गोष्ट आपण लादूं शकतो ही आपल्या वैयक्तिक सामर्थ्याची चुणूक गांधीनी दाखविली. अजून राष्ट्राच्या पुरुषर्षभांची वेमण आपण खेचूं शकतो हें गांधीजींना दाखवावयाचे होतें. शके १८६९ च्या संक्रांतीचें वाहन मेष आणि उपवाहन वृषभ आहे. तिची जाति वैश्य असून वयानें ती अतिवंध्या आहे. तिचे वारनाम राक्षसी नि नक्षत्रनाम घोरा असें आहे. राष्ट्रावर संक्रांतीच्या सुमारास आलेली गांधीवादाची संक्रातहि आज मेषपात्र जनता आणि पुरुषर्षभ पुढारी यांच्यावर कुरघोडी करून घोर आणि राक्षसी कृत्यें करणारांना आपल्या पाठीशी घालीत आहे.

## अगणित राष्ट्रहानि

या उपासासाठी पंचावन्न कोटि रुपयांचा जो भूर्दंड राष्ट्राला पडला तेवढा आंकडा पुढे करुन गांधीच्या जीवाचें मूल्य त्याहून अधिक असें सांगण्यांत येतें. पण हा भूर्दंड आरंभीचा नाही. इतर अनेक भूर्दंड दि. १५ ऑगस्टपासून राष्ट्रावर ओढवलेले आहेत. त्या मोठ्या दानावरची ही निव्वळ दक्षणा आहे हें काश्मीरचे युद्ध पाकिस्तानप्रेरीत आहे हें सत्रादा हिंदुस्थान सरकारचे प्रवक्ते बोलून चुकले आहेत प्रत्येक दिवशी काश्मीरच्या लढाईचा खर्च चार लक्ष रुपये येत आहे, हेंहि त्यांच्याच तोंडून निघाले आहे. काश्मीरचें युद्ध नोव्हेंबरच्या प्रारंभीं सुरु झालें; तेव्हापासून अडीच महिन्यांत एकंदर तीन कोटि रुपये खर्च झाले. आणि त्यामध्ये सेन आणि रॉय यांच्यांसारखे पहिल्या प्रतीचे सैनिकी अधिकारी बळी पडले, त्यांचें मूल्य द्रव्याने मोजतां येण्याजोगें नाही. पंजाब--सिंधमधून हिंदूच्या मालमत्तेची

जी हानी झाली आणि जी मालमत्ता तेथे टाकून आश्रयार्थी लोक येथे आले त्या सर्वांचें मूल्य कित्येक कोटि रुपये होईल. इकडून जी हिंदुस्थानातील संपत्ती घेऊन मुसलमान तिकडे सुखाने गेले. ती यांतच जमा धरली पाहिजे, सुरक्षा समितीपुढे हिंदुस्थानची बाजू मांडण्यासाठी पडणारा भूर्दंड यांत जमा धरला पाहिजे. येथे जे लक्षावधि निर्वासित पाकिस्तानांतून येऊन राहिले त्यांच्या खर्चासाठी हिंदुस्थानाला पडलेला भूर्दंड त्यांतच धरला पाहिजे. तसेंच येथे असलेली मुसलमानांचीं रिकामीं घरें अडवून ठेवण्याने झालेलें नुकसान आणि त्यांच्या रिकाम्या इमारतींच्या रक्षणासाठी जे रक्षक ठेवण्यांत आले त्यांचाहि खर्च ह्यांत धरला पाहिजे. पण इतक्या अपरंपार भुर्दंडानें हिंदु राष्ट्राच्या बोकांडीं बसलेल्या गांधीवादाच्या पोटाची खळगी पुरी भरली नाही. म्हणून शेवटीं उपासाचा त्रागा किंवा खरखरमुंडेपणा करून, हें पंचावन्न कोटीचें अवदान किंवा बलिदान या बकासुराला चारण्यांत आलें. ह्या पंचावन्न कोटींतून जे पांच कोटि रुपये कापण्यांत आले ते हिंदुस्थानाने पाकिस्तान-साठी सोसलेल्या खर्चासाठी कापण्यांत आले आहेत. ह्यांपैकी कांहींची मागणी पाकिस्तानने धुडकावून लावली होती. आणि गेल्या पांच महिन्यांत मासिक एक कोटीप्रमाणे हिंदुस्थान सरकार निमूटपण हा भूर्दंड सोशीत होतें हेंहि ह्या प्रकरणीं लक्षांत ठेवलें पाहिजे !

उपासाने होणारें अन्याय्य आणि घातकी दडपण हें. विशेषतः हिंदु समाजाची वृत्ति लक्षांत घेतां, आत्याचारी दडपणापेक्षाहि भयानक आहे. हातांत तलवार घेऊन किंवा बंदुक घेऊन आपल्याकडून कोणतीही गोष्ट धाकाने काढून घेण्यासाठी आलेला मनुष्य पुरवला. पण 'तुझ्या दाराशीं धरणें धरून जीव देतो' असें म्हणणाऱ्या हट्टवाद्याचा छळ हा त्यापेक्षाहि असह्य आणि अप्रतिकार्य असा, निदान सभ्य माणसाला तरी, असतो. बंदुक घेऊन येणाऱ्याची बंदुक हिसकावून घेता येते, किंवा त्याच्याविरुद्ध सांपडेल तें हत्यार उचलता येतें. पण उपासाच्या जाचामध्ये सभ्य माणसाला तीहि मोकळीक उरत नाही, ह्यामुळे नाक – तोंड दाबून व हातपाय बांधून आक्रमण करण्याप्रमाणे उपासाच्या आततायीपणाचा परिणाम हिंदूच्या सारख्या हळव्या मनावर होतो.

## ' दिनेश्वरी ' भविष्य

इंग्रज आणि मुसलमान हे हिंदूंच्या सारखे हळवे नाहीत. ते असल्या उपासाची कधींच पर्वा करीत नाहीत. त्यांच्यापुढे गांधीजींचें हें उपासाचें मोहनास्त्र निरुपयोगी ठरलें आहे. आणि त्यांच्यापुढे गांधीना शिस्तींत माघार घ्यावी लागली आहे. हिंदूंच्या विरुद्ध जेव्हां हे उपास होतात तेव्हां मात्र इंग्रज आणि मुसलमान हे दोघेहि धूर्तपणाने हिंदूंची भूरळ अधिकच वाढविण्याकरिता त्यांचीं सोयीस्कर तोंडदेखली स्तुतिस्तोत्रें गात असतात सध्यांचा उपास हा केवळ मुसलमानांच्या लाभासाठीं असल्यामुळे त्यांनी ह्या उपासाचा प्रथमपासूनच उदोउदो चालविण्यास सुरूवात केली होती. आणि त्यांच्या अपेक्षांना फळ येऊनच हा उपवास सुटला. गांधीची उपास सहन करण्याची शक्ती अधिकांत अधिक एकशें पंचवीस तास आहे हें त्यांच्या वैद्यकीय प्रचारकांनी प्रगट केलें होतें. गांधींचें प्राणांतिक उपास हें खरे प्राणांतिक कसें नसतात ह्या गोष्टीची अनुभवाने खुणगांठ पटल्यामुळे अनेक लोक कुंडलीविज्ञानाविना भविष्यवादी बनले होते. रविवारीं हा उपास संपणार अशी त्यांनीं दिनेश्वरी भाकितेंहि करून ठेवलीं होतीं !

## कटाचे सूत्रचालक

हा उपास हिंदु – मुसलमानांच्या ऐक्याकरिता आहे, आणि निदान दिल्लीमध्ये हिंदु –– मुसलमान शीख समाजाच्या स्वाभाविक प्रेरणेनें झालेल्या हार्दिक ऐक्याचें प्रत्यंतर पटूनच तो सुटणार होता. पण जीव वांचविण्यासाठी राखण्यांत आलेली दिल्लीपुरतो ही संकुचित पळवाट देखील गांधींना लागली नाही. आणि असें कोणत्याच तऱ्हेचे प्रत्यंतर न मिळतांहि दिल्लीच्या हिंदु– शीखावर एकतर्फी अन्याय करून केलेल्या सात शिक्षांच्या कलमाच्या पत्रकावर इकडच्या तिकडच्या स्वाक्षऱ्या घेऊन हें उपासाचें थोत ड ठरीव कटाच्या संकेताप्रमाणे आवरण्यांत आलें. ह्या कटाचे हस्तक म्हणून स्वतः गांधी पुढे आले असले तरी त्याचे सूत्रचालक मौ आझाद हे होते हें आता अगदी उघड झालें आहे; कारण दिल्लींतील हिंदुशिखांना एक पक्षीय पद्धतीने दंडणाऱ्या सात अटींचा मसुदा मौ आझाद यांनीच तयार केला. गांधीनी नुसते 'तथास्तु' म्हटलें. पं नेहरू हे ह्या कपट नाटकामध्ये हेलपाट्यावारी राबणारे हुजरेच केवळ होते. आणि ह्या कपटनाटकाचा अगाऊ सुगावा लागलेले सरदार पटेल, डॉ. मुकर्जी, सर–

दार बलदेव सिंग व गाडगीळ प्रभृती लोक ह्या पापाचे धनी होण्याचे टाळण्यासाठीं कांही ना कांही निमित्ताने दिल्लीतून पाय काढून इतरत्र वेळ काढीत होते!

## सरकारच्या प्रतिष्ठेवर आघात

'सरकारचे हात सबळ करा' अशी खोटी विनवणी जनतेपुढे अलीकडे करण्यांत येत असते. लोकांनी आपलें सर्व सामर्थ्य एकवटून ज्या सरकारच्या ताब्यांत दिलेलें असतें त्यांचे हात लोकांनी आणखी काय सबळ करावयाचे? सरकारी प्रवक्त्यांनी अशा प्रकारची याचना लोकांपुढे करणें म्हणजे एंजिनांत बसलेल्या आगगाडीच्या सारथ्यांनी उतारूंना 'गाडी चालविण्यास मदत करा' असें म्हणण्यासारखेच हास्यास्पद आहे. ह्या म्हणण्यांत एक तथ्यांश असतो तो इतकाच की, सरकारला त्यांचीं धोरणें यशस्वी होण्यास साह्य करा किंवा त्यात अडथळे आणू नका. गांधींच्या उपासानें सरकारचे हात सबळ झाले कां दुर्बळ झाले हा प्रश्न विचारांत घेण्यासारखा आहे. 'पंचावन्न कोटि रुपये देणार नाही' अशा प्रकारची गर्जना करणारा गृहमंत्री या एक–दोन दिवसांतच एकदम अनिच्छेने उलटे बोलूं लागतो ही काय सरकारची प्रतिष्ठा वाढविणारी गोष्ट झाली? आणि हिंदूंवर लादलेल्या दिल्लीपुरत्या सात अटींवरून खुद्द राजधानीच्या नगरामध्ये हे सरकार किती दुर्बळ व असहाय झालें आहे ह्याचेंच नागडें प्रदर्शन होत नाही काय? गांधींच्या लहरीपुढे हे मंत्री म्हणजे निव्वळ बाहुलीं आहेत असें हें मंत्रीप्रदर्शन दिल्लीला झाले, त्या योगें या सरकारची प्रतिष्ठा कितीशी वाढली? इतकी शोभा झाल्यावर तरी सरकारी हस्तकांनी आता सरकारचे हात सबळ करा' हें नित्याच्या रडगाण्याचें पालूपद सोडून दिलेलें बरे.

## जगांतील नाचक्की

गांधीवादाचे व्यावहारिक पराभव होतात ते नेहमीं जगाच्या न्यायासनाकडे बोट दाखवून उजळ करण्यांत येतात. जगांतील खरे प्रभावी लोक परतंत्र आणि आपद्ग्रस्त अशा हिंदुस्थानाची फारशी वास्तपुस्त करीत नाहीत. पण त्या त्या राष्ट्राच्या कारभारांत काडीचाहि हात नसलले अलबते गलबते लेखक, तत्त्वज्ञ किंवा कवि यांची मतें आणि वक्तव्यें हिंदुस्थानांत प्रसंगाप्रसंगानें मिरवून जगाच्या बाजारात आपली पत गांधीवादानें

वाढली असा खोटा बकवा करण्यांत येत असतो. जगाच्या पाठीमागें अंतः कलहाच्या व्याधी इतक्या लागलेल्या आहेत कीं त्यांतील जबाबदार लोकांना हिंदुस्थानांत माजलेल्या एका लोकविलक्षण साधूत्वाचें कौतुक करण्याइतकी उसंत देखील मिळत नाहीं. पण हिंदुस्थानांतील लोकांना मात्र वरील अल-बत्या गलबत्याचे प्रवाद ऐकवून झुलविण्यांत येतें. पंधरा ऑगस्टनंतर हिंदु-स्थानाला आंतरराष्ट्रीय व्यवहारात कांहीं तरी अस्तित्व आलें काश्मीरचा प्रश्न सुरक्षासमितीपुढें मांडून आंतरराष्ट्रीय चावडीवर हिंदुस्थान-पाकिस्तानचे प्रतिनिधि आपापल्या पक्षाचें समर्थन करीत असतां, हिंदुस्थानचा हाडवैरीहि करणार नाहीं अशा प्रकारें आपल्या पक्षाचा पाय ओढण्याचें घातकी कृत्य गांधींच्या उपासानें घडलें आहे. पाकिस्तानाच्या प्रतिनिधींना छाती वर काढून आतां बोलतां येईल आणि हिंदुस्थानाच्या प्रतिनिधीला खालीं मान घालावी लागेल असा प्रसंग आला आहे. पंचावन्न कोटीचा दंड आणि सात अटींची शिक्षा यांच्या योगानें हिंदुस्थानाला येथेंच अपराधी ठरवून त्याची आंतरराष्ट्रीय नाचक्की करण्याचे अपश्रेय गाधीच्या उपासानें निर्माण केलें आहे. गांधींच्या योगे आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा वाढते असा आजवर भ्रम उत्पन्न करणाऱ्या गांधीवाद्यांनीं आता आपल्याच दोन तोडांत मारून घेऊन चुपचाप बसावे हें चागले.

## खाण्याचे दांत वेगळे

हा उपास दिल्लीपुरताच झाला असें समजून भोळ्या हिंदूंनी निर्धास्त होऊं नये, अशी यावेळी त्यास धोक्याची सूचना देणें हें आम्ही आमचे कर्तव्य समजतों. एखाद्या लहानशा क्षेत्रांत प्रयोगासाठी लावलेली रोपें हीं सर्वत्र प्रसार करण्यासाठींच असतात. त्याप्रमाणें दिल्लीच्या प्रयोगक्षेत्रांत हिंदु जातीच्या नाशाची हीं विषबीजें रोवण्यांत आलेली आहेत, आणि त्यांचा प्रसार सर्व गाधी-सरकारे वेठीस धरून ह्यापुढें होणार आहे. मुसलमानांना परत बोलवावयाचें हे दिल्लीस साधलें म्हणजे इतरत्र त्याचे प्रयोग सुरू होतील. भ्रांत गाधीवादी मुरारजीभाई याच्यासारख्यांना सर्वत्र जोर चढून पटेलांसारखे वास्तववादी हें मात्र कोडीत सापडल्यासारखे होतील ह्या उपासाचे दाखविण्याचे दात व खाण्याचे दात वेगळे होते. ह्या छपबिलेल्या दांतांपैकीं एक दांत आतापर्यंत होयबा' असलेले पण आता गांधीवादाचे झालेले दुष्परिणाम पाहून थोडेसे सावध झालेले गांधीजन ह्यांच्यावर उगारलेला आहे. आणि ही लपविलेली बत्तीशी शेवटी काश्मीर आणि हैद्राबाद येथील हिंदूंच्या न्याय्य आकांक्षांचें चंदन उडवीपर्यंत थांबणारी नाहीं. हिंदूंपुढे स्पष्टपणें बोलण्याची ही आताची शेवटची वेळ आहे; कारण यापुढें बोलून-

हि कांहीं होणार नाहीं अशी वेळ येईल. म्हणून आज कोणाचीहि क्षिति न बाळगतां, शक्य तितक्या विदारक रीतीनें वस्तुस्थिति हिंदूपुढे मांडणें प्राप्त झालें आहे. ह्यावेळीं जर आम्ही कोणाच्या दडपणाला अगर औपचारिक सौजन्याला वश होऊन स्पष्ट बोललों नाही तर भावी हिंदु पिढयांचे आम्ही अपराधी ठरूं असें आम्हांस वाटत आहे.

## एकपक्षीय शरणागति

हिंदु-मुसलमानांच्या एकीसाठी म्हणून चालू केलेला हा उपास केवळ हिंदूंनाच जखडून कां संपतो ह्याचें आज कित्येक आश्चर्य मानतात, त्या विसरभोळयांसाठी कांही स्मरणगांठी येथे पुनः सांगणें आवश्यक आहे. १९०९ मध्ये गांधीनी लंडनमध्यें भाषण करून हिंदु-मुसलमानांची एकी साधण्याला हिंदूंनीं अखेरपर्यंत एकतर्फी 'दे-वाण' करीत राहिले पाहिजे आणि हा एकच उपाय हिंदु मुस्लीम ऐक्यासाठी आहे, असें आपलें स्पष्ट मत सांगितले. हिंदुस्थानांत एक प्रसिद्ध मुसलमान त्यावेळीं बोलले होते कीं, 'देवाण-घेवाण' करून हिंदु-मुसलमानांची एकी होईल. त्याचा प्रतिवाद म्हणून गांधींनी वरील दे-वाणाचें तत्व सांगितले. आणि १९४२ मध्ये गांधींनी नामदार बाळासाहेब खेरांशी जो संवाद केला त्यांतही हीच एकेरी शरणागती आपणाला अद्यापि अभिप्रेत आहे असें स्पष्ट सांगितलें. मुसलमान लोक देवनागरी व हिंदी शिकले नाहींत तरीहि हिंदूंनीं उर्दू भाषा व लिपी शिकली पाहिजे, असें त्यावेळीं गांधींनी ह्या एकेरी पद्धतीचे उदाहरण दिले होते. हा संवाद 'हरिजन' मध्यें प्रसिद्धहि झाला.

## हिंदुत्वनिष्ठांचा कर्मयोग

पाकिस्तानांत कांहीं झालें तरी इकडील हिंदूंनीं मुसलमानांना फुलासारखें राखावें व तळहातावरील फोडासारखें जपावे, हेहि ह्याच एकेरीपणाचें अलीकडील उदाहरण आहे. त्याचा उच्चांक आता ह्या उपासानें गांठला आहे; कारण, हिंदुस्थानला मारण्याला दारूगोळा म्हणून उपयोगी पडूं नये म्हणून जे पंचावन्न कोटि रुपये अडवून ठेवले तेहि देऊन टाकणें हा तो उच्चांक होय. आज पंजाब मधील पाकिस्तान-हिंदुस्थान सीमेजवळ पाकिस्तानच्या बाजूनें आक्रमक सिद्धता चाललेली आहे अशा वार्ता ऐकूं येत आहेत. अशा वेळीं ह्या रुपेरी गोळयांचें कोठार गांधींनी प्राण पणाला लावून पाकिस्तानला उघडें करून दिलें! "गांधीवादाचा जन्मच मुळीं हिंदु जातीच्या मुळावर झालेला आहे आणि पुरा सत्यानाश होईपर्यंत ही अंधळी हिंदु जात खोटया व्यक्ति-महात्म्याला बळी पडून त्या गांधीवादाचा पाठ-

पुरावा करणार आहे की काय हे समजत नाहीं. हे भवितव्य टळो वा न टळो, हिंदु जात शुद्धीवर येवो वा न येवो, आम्ही आणि आमच्यासारख्या जागे झालेल्या इतर हिंदूंनी मात्र ह्यापुढें आपल्या शेवटच्या श्वासापर्यंत हिंदु जातीला ह्या भीषण भवितव्याची जाणीव सतत देत राहण्याचा खडतर कर्मयोग आचरला पाहिजे.

## घातक गांधीवाद

गांधीवादाचा अवतार १९२० मध्ये जेव्हा हिंदुस्थानांत आला त्या वेळीं गांधीच्या व्यक्तीमाहात्म्याने राष्ट्राचा नाश होणार हें भवितव्य ओळखून त्याची जाणीव देण्याचे कर्तव्य हिंदुसभेच्या लोकांनी केलें होते. हिंदुसभेचे लोक त्यावेळीं राष्ट्रीय सभेंत होते. आणि गांधी प्रभावळीतील लोकांचा अध्यक्षस्थानाला 'क्यू' लागण्यापूर्वीचे शेवटचे अध्यक्ष हिंदुसभानिष्ठ श्री. विजयराघवाचार्य यांनी नागपूरला १९२० ला भरलेल्या अधिवेशनांत ह्या गोष्टीचा वेळीच इशारा दिला आहे. ते म्हणाले की, "सैनिकी पद्धतीने राष्ट्रांतील मत हें एका सपाटीवर ठोकून आणणें आणि राष्ट्रातील स्वतंत्र विचार करण्याची शक्ती नष्ट करणें ही गोष्ट राष्ट्राच्या स्वातंत्र्याला, सुखाला व प्रगतीला घातक आहे. हें जुन्या व नव्या इतिहासाने सिद्ध केलें आहे." असें सांगून त्यांनी स्पार्टा, अथेन्स जर्मनी इत्यादिकांची उदाहरणें घेतलीं आहेत; आणि शेवटीं बजावले आहे की. 'एक जुलमी शासन नाहीसे करणारे आपण आपल्या हातांनी दुसरे जुलमी शासन निर्माण करूं नये, ह्याबद्दल काळजी घेतली पाहिजे.' व्यक्ती ही कितीहि मोठी असली तरी राष्ट्र हें कोणाहि व्यक्तीहुन श्रेष्ठ आहे राष्ट्रनाश करण्यासाठी जर एखादी व्यक्ती आपलें जीवित घेऊन आडवी पडूं लागली तर राष्ट्रजीवनापुढे त्याची पर्वा बाळगावयाचें कारण नाही ही गोष्ट जर हिंदुजातीला ह्यापुढेहि उमगली नाही, तर तिला वाचविणें ब्रम्हदेवालाहि शक्य नाही. गांधींचा उपास अखेरचा नव्हे. पाकिस्तानाचीं पुढचीं पावलें सिद्ध करण्याच्या पुढच्या पायऱ्यांवर पायघड्या घालण्यासाठीं गांधी हे आपलें जीवित पणाला लावण्याचें दृश्य पुनः पुनः बोटचेप्या हिंदुजातीपुढे उभे करणार आहेत. त्यावेळीं व्यक्ती निष्ठेसाठी राष्ट्रघात होऊं द्यावयाचा नाही असा सार्वत्रिक दृढनिश्चय हिंदु जातीने केला पाहिजे तरच तिला गांधीवादाच्या प्राणघातक विळख्यांतून सुटण्याची आशा आहे

—केसरी दि. २०–१–४८

# ध्रुव आणि त्रिशंकु

सध्याच्या राज्यकर्त्यांची मनःस्थिति कशी अधांत्री आहे हीं गोष्ट पंडित नेहरूंनी गेल्या दि. २२ ला अलीगड विद्यापीठाच्या पदवीदान प्रसंगी केलेल्या भाषणामध्ये चांगल्या रीतीने स्पष्ट झाली आहे. अधांत्री मनःस्थितीचें वर्णन त्यांनी या भाषणाच्या प्रस्तावनेंतच सांगितलें. ते म्हणाले, "तुमची सध्याची मनःस्थिति काय आहे याचें मला आकलन होत नाहीं किंबहुना आज सर्वांचीच मनःस्थिति काय आहे हें सांगतां येत नाहीं. कारण आपल्या मनात प्रचंड खळबळ आणि हृदयविदारण झालेले आहे. असंख्य लोकांचीं मनें संशयाकुल आणि उद्विग्न झाली आहेत. वर्तमान-काल अनिश्चित असून भविष्यकाल त्याहूनहि गडद अंधाराचा आहे." या प्रमाणे प्रस्तावना करून पंडितजींनी असे आत्मनिवेदन केलें की, अलीकडील घटनांनी आपलीं. जुनी स्वप्नें भंगून गेलीं आहेत.

### खऱ्या वस्तुस्थितीचा ठाव घ्या

व्याख्यानाच्या प्रारंभीच पंडितजींनी या विद्यार्थ्यांना प्रश्न टाकला की "माझ्याप्रमाणेच तुम्हालाहि आपल्या हिंदुस्थानच्या प्राचीन पूर्वजांकडून चालत आलेल्या महान् सांस्कृतिक ठेव्याबद्दल अभिमान आणि जिव्हाळा वाटतो काय? किंवा तुम्हाला त्या संबंधाने उदासीनता आणि परकेपणाच

वाटतो ?" हा प्रश्न विचारण्याचें कारण, अलीकडे लोकांची मने भलत्याच दिशेने वाहवत चालली आहेत, असें पंडितजींनी सांगितलें. पुढे ते म्हणाले की, "तुम्ही मुसलमान आहांत आणि मी हिंदु आहें" आणि नंतर त्यांनी केविलवाण्या रीतीने विचारलें की, "तुम्ही आम्ही मागे एकरूपच होतों, तसे पुढे कां राहूं नये?" याचा अर्थ असा की स्वप्नें विरलीं. पण अजून डोळे मिटन पुन्हा डुलकी घेऊन त्याचा अनुभव घ्यावा अशी पंडितजींची लालसा आहे ! या प्रश्नांवर सर्व मुसलमान विद्यार्थ्यांची खरी प्रामाणिक उत्तरें नेहरूंनी खाजगी रीत्या गुप्त हेरांकडून घ्यावीत. कारण उघड मतें आज घेतली तर ती लबाडीने मांडली जाण्याचा संभव आहे. असे कांही प्रामाणिक सत्यशोधन पंडितजींनी केलें तरच सध्याची त्यांची अनिश्चित मानसिक अवस्थेमधली ओढाताण कांहीशी थांबण्याचा संभव आहे. १९४६ च्या मार्चमध्ये अलीगडला मुस्लीम विद्यार्थ्यांनी भयंकर दंगा केला. आणि मुस्लीम गुंडाशी संगनमत करून कल्याणगंजमधील बाजार जाळून पन्नास लाखांचें नुकसान केलें. त्यानंतर या विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांनी मुस्लीम विद्यार्थ्यांना पाठीशी घालून त्यांच्यावर पडणारा दंड विद्यापीठावर घेतला. त्या नंतरही त्यांची प्रवृत्ति बदलली आहे, असें मानण्याला कांही पुरावा नाही; तरी अजूनहि त्यांच्याशी सांस्कृतिक एकरूपतेचें नातें जोडतां येईल अशी आशा पंडितजी धरतात हीच गोष्ट त्यांच्या अनिश्चित मनःस्थितीची द्योतक आहे.

## एक निश्चित गोष्ट

अलीगडच्या विद्यार्थ्यांची मनःस्थिति आपल्यासारखीच अनिश्चित असेल हें जरी पंडित नेहरू औपचारिकपणे बोलले तरी या विद्यार्थ्यांच्या मनासंबंधाने एक निश्चित गोष्ट पंडितजींना माहीत होती. कारण ते पाकिस्तान विषयक पुष्कळ गोष्टी बोलले आणि म्हणाले की, "मी पाकिस्तानसंबंधानें बोललों याचें कारण तो विषय तुमच्या मनामध्ये असेल आणि त्यासबंधी आमचें धोरण काय आहे हे ऐकण्याची तुमची इच्छा असेल." ही गोष्ट आजच्या सार्वत्रिक अनिश्चित स्थितीमध्ये निश्चितपणे पंडितजींना माहीत आहे तर! ती अशी की, अलीगडचे विद्यार्थी आजहि पाकिस्तानाचें चिंतन करीत असणार आणि सध्याच्या कॉंग्रेस राज्याचें, म्हणजे मुख्यतः

हिंदूंचें, धोरण पाकिस्तानासंबंधाने काय आहे हें जाणण्याची इच्छा करणार. अलीगडचे तरुण मुस्लीम विद्यार्थी म्हणजे कोणी बुद्रक जीर्णवादी नव्हेत; कोणी जमीनदार-- सावकार भांडवलवाले नव्हेत; तर अद्ययावत् गोष्टींचे छाप घेण्यास स्वच्छ मनें असलेले नवे उमेदीचे सुशिक्षित तरुण आहेत. हे जर हिंदी राष्ट्रांत राहून नित्य चिंता पाकिस्तानाची करीत असतील तर त्यांचा खडसावून निषेधच "राष्ट्रीय"तेचा वेळीं अवेळी टेंभा मिरवणाऱ्या पंडितांनें करावयास नको होता काय ? पण तसें झालें नाहीं !

## या काय राष्ट्रीय अपेक्षा ?

आज हिंदुस्थानाचा पंतप्रधान पुढे आला असता कोणताहि उदयोन्मुख व खरा राष्ट्रीय तरुण नागरिक त्याच्याकडून काय अपेक्षा करील? या पंतप्रधानाकडून काय ऐकावेसें त्याला वाटेल? तर हें की, आमच्या राष्ट्राची आर्थिक, औद्योगिक, शारीरिक उन्नति करण्याच्या काय-योजना सरकार करीत आहे; राष्ट्रातील आर्थिक विषमता दूर करण्यास सरकार काय करणार आहे, राष्ट्रावर आज काश्मीरकडून येणारें संकट कसें दूर होणार, हैद्राबाद संस्थानांतील संघर्ष संपून तें हिंदी-राज्यांत कसें येणार इत्यादि; पण अलीगडच्या विद्यार्थ्यांना या कांहीं शंका असतील असें पंडीतजींना चुकून देखील वाटले नाही ! मात्र त्यांना आवर्जून नि घोळून हें सांगावेसें वाटलें की, "पाकिस्तानाची कोंडी करुन त्याला हिंदुस्थानांत सामील करण्याची आमची किंचित् देखील इच्छा नाही. तसेंच पाकिस्तानाचे फोडून तुकडे करण्याचीहि आमची इच्छा नाही." राष्ट्राच्या पंतप्रधानाना हिंदी 'राष्ट्रीय' विद्यार्थ्यापुढे राष्ट्रावरील प्रत्यक्ष संकटाचा विचार न करता एका परराष्ट्रावरील काल्पनिक संकटाचा निरास करावा लागतो हे दृश्य स्वाभाविक आहे काय ? समजा ब्रिटनचा पतप्रधान एखाद्या तद्देशीय विद्यापीठापुढे बोलत आहे. अशा वेळीं तो शेजारच्या आयर्लंडविरुद्ध ब्रिटनचे दुष्ट हेतु काही नाहीत हें आवर्जून सांगण्याचा मुख्य विषय आपल्या भाषणांत कधी घेईल काय ? पं. नेहरुंचें अलीगडचे भाषण हें कांही विशिष्ट विषयाच्या विद्यार्थ्यापुढे नव्हतें. तें पदवीदानाच्या वेळच्या सर्व विद्यार्थ्यांच्या समूहापुढचें भाषण होतें हें लक्षांत घेतलें पाहिजे.

## हे काय राष्ट्रीय विद्यार्थी ?

हिंदुस्थानचा दुष्ट हेतु पाकिस्तान फोडण्याचा किंवा खाऊन टाकण्याचा आहे ही शंका अलीगडच्या 'राष्ट्रीय' विद्यार्थ्यांच्या मनांत कोठून आली? हिंदुस्थानांत ती कोणी चुकून काढली होती काय? हिंदुस्थानांतल्या कोठल्याहि राष्ट्रीय विद्यार्थी सभेच्या ठरावांतून वा भाषणांतून पाकिस्तान खाऊन टाकण्याच्या हिंदुस्थानाच्या दुष्ट हेतुविषयी वाच्यता झाली होती काय? मुळीच नाही. पण तिकडे पाकिस्तानाचे प्रवक्ते मात्र गरजले होते की, पाकिस्तानाला खाऊन पचवून टाकण्याची हिंदुस्थानची मनीषा आहे! तशी गर्जना पाकिस्तानांत झाली की इकडे अलिगडसारख्या स्थानी ती अनेक मनांची पकड घेणार. म्हणून अर्थात् त्याचें निराकरण करणें अलीगडच्या व्यासपीठावर अतिशय निकडीचे आहे ही पंडीत नेहरूंची पुरेपुर निश्चितीच असली पाहिजे. म्हणजे अनेक कल्पनाचे पंडितजीच्या मनातील डोलारे ढांसळले असले तरी अलीगडच्या हिंदी 'राष्ट्रीय' विद्यार्थीगणाच्या मन.स्थितीसंबंधाने वरील कल्पना मात्र पक्की होती. पंडिनाच्या अनेक कल्पना त्रिशंकूसारख्या अंतराळी हेलकावत असता एक ध्रुव ताऱ्यासारखी अचल समजूत पंडीतजींच्या मानसिक अंतरिक्षांत ठाम होती. ती अशी :– १९४८ च्या जानेवारीत म्हणजे उत्साह उतू जाणारे स्वातंत्र्यप्राप्तीचे महोत्सव होऊन पांच महिने लोटले तरी अलीगडचे "हिंदी राष्ट्रीय" विद्यार्थी हे स्वतंत्र हिंदुस्थानाच्या पंतप्रधानाकडून प्रथम काय ऐकूं इच्छितात? ते राष्ट्रावरील संकटा संबंधी चितातुर नाहीत, निर्वासितांची यमपुरी कशी सुधारावी व त्यांची कुतरओढ कशी थांबवावी याविषयी त्यांना कुतूहल नाहीं, राष्ट्राचें झपाट्यानें औद्योगीकरण कसें व्हावें या प्रश्नाचा त्याना ध्यास लागलेला नाहीं. त्यांना एकमेव सर्वोच्च ध्यास आहे तो हा की, "हिंदुस्थान पाकिस्तानाला खाऊन टाकणार नाहीं ना?" आणि असा हा परमोच्च 'हिंदी राष्ट्रीय' प्रश्न 'हिंदी राष्ट्रीय' विद्यार्थ्यांना अस्वस्थ करीत असतां त्याचीं मनें शांत करण्यासाठी "हिंदी राष्ट्रीय" पंतप्रधानाना तातडीने धांवणे प्राप्तच झालें !!

## नसता आरोप

आणि या तरुण 'राष्ट्रीय' लोकांपुढें पंडितजीनी आणखी एक 'विचित्र'

प्रश्न मांडला, तो असा : –"आपला विश्वास मूलत: ऐहिक राज्यावर आहे कां धार्मिक राज्यावर आहे ? म्हणजे ज्या राष्ट्रीय राज्यांत अनेक धर्मांचे लोक राहू शकतात असें राज्य आपणास हवे आहे, कां ज्यामध्ये इतर धर्मांचे लोक हे परके व राष्ट्रबाह्य समजले जातात असे राज्य पाहिजे आहे ?" धर्माधिष्ठित राज्याची कल्पना सर्व जगांत मागे पडली असतां हा प्रश्न करणें जरा विचित्र होय; हें मान्य करून तसा प्रश्न करण्याचे कारण पंडितानी सांगितलें की " आपणापैकी पुष्कळ लोकानी भूतकाळात उडी घेण्याचा प्रयत्न केला आहे. " असा भूतकाळात उडी घेण्याचा प्रयत्न कोण करीत आहे याचा पंडितजीनी उलगडा केला नाही. पण हिंदुसभेला 'थिऑक्रॅटिक' म्हणजे धर्माधिष्ठित राज्य पाहिजे असे पंडितजी आणि इतर अनेक कॉंग्रेस पुढारी म्हणत असतात. हिंदुधर्माधिष्ठित असे राज्य हिंदुसभेने कधीहि पुरस्कारिलेले नाही, असे अनेक आधार देऊन आजवर पुन: पुन: हिंदुसभेचे प्रवक्ते म्हणत असतां, हिंदुसभेवर तोच तो खोटा आरोप करीत राहण्याचा उपक्रम बुद्धयाच कांही धूर्तपणाच्या स्वार्थाने कॉंग्रेसवाल्यानी चालू ठेविला आहे असे दिसते.

## हे पहा खरे आरोपी !

उलट पंडितजीच्या भाषणानंतर दोनच दिवसांनी कराचीला वकील मंडळीपुढे जीनांनी जे भाषण केले ते सर्वच लहान–मोठ्या कॉंग्रेसवाल्यानी ध्यानांत ठेवण्यासारखे आहे. जिना म्हणाले, " पाकिस्तानाची घटना ही इस्लामी शरीयतच्या पायावर आधारली जाणार नाही असा प्रचार मुद्दाम खोडसाळपणाने काही लोकानी चालविला आहे त्याचा मला अर्थ समजत नाहीं. पाकिस्तानची भावी घटना शरीयत कायद्याला विरोधी होईल अशीं चिंता आणि भीति का उत्पन्न केली जात आहे कळत नाही. इस्लामी तत्त्वे अनुपम आहेत आणि तेराशे वर्षापूर्वी ती जितकी व्यवहार्य होती तितकीच आजहि आहेत." हे भाषण पैगंबरजयंतिनिमित्त झाले. पुढे अर्थातच इस्लाम म्हणजे समता आणि लोकशाही असल्यामुळे बिगर मुसलमानाना भिण्याचे कारण नाही असेहि जीना नेहमी प्रमाणें म्हणाले. पंडित नेहरूना असें विचारावयाचें की, हिंदुस्थानची घटनासमिति हिंदुधर्मास विरोधी अशी घटना करील अशी भीति त्याना हिंदुस्थानात कोठे तरी दिसली काय? पण नसत्या गोष्टीचा निषेध करण्यात एक धूर्त आणि दुष्ट हेतू असतो तो असा की, कोणाला तरी त्या गोष्टी अकारण चिकटवणे.

## अज्ञान कीं पक्षस्वार्थ ?

धर्माधिष्ठित राज्यासंबधीच्या खोटया आरोपाप्रमाणेंच दुसराहि एक आरोप हिंदुसभेवर हेतुपूर्वक दुष्टपणानें गांधीजीमंकट सर्व काँग्रेसधुरीण करतात. अलीगडलाच केलेल्या दुसऱ्या एका प्रकट सभेंतील भाषणांत पं. नेहरू म्हणालें, " या देशात हिंदूंची प्रचंड बहुसंख्या असल्यानें देशांतील जीवनाच्या अनेक अंगावर त्यांचा प्रभाव पडणारच; पण त्यांना जादा अधिकार देतां येणार नाही व इतरांचे अधिकार केवळ ते दुसऱ्या जमातीचें आहेत म्हणूनच काढून घेतले जाणार नाहीत." पण हिंदूंनी केव्हां आणि कोठें असें विशेष अधिकार हिंदू म्हणून मागितले हे नेहरूंनी सांगावे. हिंदुसाठीं असे जादा अधिकार हिंदूसभा मागत नाही हे राजा रामपालसिंग (१९१८) ते डॉ. शामाप्रसाद मुकर्जी (१९४३) यांच्या पर्यंतच्या अनेक हिंदुसभाध्यक्षांनी पुनः पुन. स्पष्ट केले आहे. खऱ्या व शुद्ध राष्ट्रीय भूमिकेवर हिंदुसभा ध्रुवाप्रमाणें आजवर अचल आहे. तरीहि गांधीजी १९४२ मध्यें म्हणाले की, ' मुस्लीम लीग ही मुसलमानांसाठी जादा अधिकार मागते आणि तसेच जादा अधिकार उलट हिंदुसभा हिंदूंसाठी मागते अशी माझी समजूत आहे ! " धर्माधिष्ठित राज्य आणि हिंदूंना हिंदू म्हणून जादा अधिकार याचा हिंदुसभेनें कधीहि पुरस्कार केला नसता एक प्रकारच्या कोडगेपणाने काँग्रेसनिष्ठांकडून हे आरोप पुनः पुन. हिंदुसभेवर करण्यांत येतात. गेल्या १५ ऑगस्ट नंतर या आरोपाना विशेषच भर आला आहे. त्याचे कारण अज्ञान हे नसून पक्षस्वार्थ हे असले पाहिजे असें आता वाटू लागले आहे.

## हिंदूसभेची स्वच्छ भूमिका

या देशात हिंदु बहुसंख्य आहेत हा काही त्यांचा अपराध नव्हे. उलट शतकानशतकें अनेक आक्रमणें अंगावर घेऊन उलथवीत उलथवींत आपल्या चिवटपणाच्या गुणामुळे ते सर्वांना पुरून उरले आहेत. हिंदूच्या या बहुसंख्येचा प्रभाव अद्ययावत् व संपूर्ण लोकशाहीच्या तंत्रामध्येहि दिसणे अपरिहार्य आहे हे नेहरूंनी अलीगडच्या दुसऱ्या भाषणात वर दिल्याप्रमाणें मान्य केलेच आहे. हाच स्वाभाविक व सरळ लोकशाहीचा व्यवहार हिंदुस्थानांत चालावा असें हिंदुसभेचें म्हणणें आहे उलट या खऱ्या राष्ट्रीय आणि

लोकशाहीच्या तत्त्वापासून काँग्रेस चळली म्हणून तिची घसरगुंडी झाली. पाकिस्तान आपल्या हातानें निर्माण करून त्याचे सार्वत्रिक भय आणि उपद्रव याच्या योगानें हिंदुस्थान सतत त्रस्त आणि भीतिग्रस्त राहण्याची अवस्था याच घसरगुंडीनें निर्माण झाली. काँग्रेसचें हें पाप हिंदूसभेचे लोक जनतेपुढें विदारकरीत्या मांडतात हाच काय तो हिंदुसभेचा अपराध काँग्रेस-निष्ठांच्या पोटांत डांचत असतो. पण हिंदुसभेचा उद्देश लोकांना जागे करून भावी आपत्ति टाळण्याच्या कामीं त्यांस प्रवृत्त करावें एवढाच असतो. काँग्रेस-धुरीण सावध होऊन जर योग्य गोष्टी करूं लागले असते तर हिंदुसभेने त्यांना निरपवाद पाठिंबाच दिला असता, पण तसें झालें नाहीं.

## अलिगडचे विद्यार्थी

कारण काँग्रेसधुराणाची गेल्या पांचसहा महिन्यांच्या धक्क्यांनीं अधांत्री अवस्था झाली आहे त्यांचीं स्वप्नें ढासळली असें त्याची बुद्धि त्यांना सांगते पण स्वप्नाळू मन पुन: पुन: त्या विरलेल्या स्वप्नांतच रमूं लागतें व तीं खरीं धरूनच त्यांचें आचरण घडतें. अलीगडचे विद्यार्थी आणि इतर मुसलमान यांच्यांत मात्र अशी चलबिचल किंवा अधांत्रीपणा मुळीच नाही. आपल्या-सारखेच ते अधांत्री असतील अशी पंडितांनी केलेली कल्पना चुकीची आहे. त्यांचें राष्ट्र इस्लामी जगत् हे आहे. ते हिंदुस्थानांत असोत, ब्रम्हदेशांत असोत वा लंकेंत असोत, त्यांच्यापुढें निश्चित इस्लामी ध्येयें आहेत. उलट आमचे विरलेल्या स्वप्नांत विहार करणारे काँग्रेसपुढारी कोठें आहेत याचा लोकांना पत्ता नाहीं आणि स्वत: त्या पुढाऱ्यांनाहि नाहीं. त्यांना जिकडून थप्पड मिळेल तिकडून तें अंग चोरीत चाललेले दिसतात.

## पडखाऊ अंगविक्षेप

राजाजींनी देशविच्छेदनास लोकांची संमति मिळवतांना म्हटले होतें कीं, आम्ही पुन: एकत्रित होण्यासाठीं विभक्तीकरण करीत आहोंत. तोंच सूर गांधी–नेहरूंनीहि परवापर्यंत ठेवला होता. नेहरू असें म्हणाले होते कीं, हिंदुस्थान-पाकिस्तानाला सामान्य सांस्कृतिक, ऐतिहासिक, भौगोलिक बंधनें इतकी आहेत की, तीं दोन राज्यें केव्हा तरी एक होणारच. हिंदुस्थान–

पाकिस्तान हीं वेगळीं व शत्रूसम होणें अस्वाभाविक होय असेंच त्यांनी वाटतें. हें त्यांचें जुनें स्वप्नरंजन अजून विरलें नाहीं. पण हिंदुस्थानी पुढाऱ्यांच्या सदिच्छेला देखील विकृत स्वरूप देण्याच्या पाकिस्तानी पुढाऱ्यांच्या नेहमीच्या तक्रारखोर स्वभावानुसार त्यांनीं अलीकडे ओरड करण्यास सुरुवात केली की, "पाकिस्तानाला पुन: इंडियामध्यें ओढण्याचा इंडियानी पुढाऱ्यांचा डाव आहे." ही गुरकावणी ऐकल्याबरोबर कॉंग्रेस पुढाऱ्यांनी आपली सदिच्छा गुंडाळून ठेवली. पाकिस्तान–हिंदुस्थानाकडे आलें तरी ही धोंड आपण पत्करणार नाहीं असें उलट बोचकपणानें आतां नेहरू बोलू लागले आहेत! ज्यांना स्वत:ची विचारांची काहीच भूमिका उरली नाहीं त्यांना वारा येईल तशी तशी पाठ फिरवणें एवढेंच अंगविक्षेप कौशल्य उरतें हें यावरून उघड होतें.

## हिंदुसभेचें मागणें

धर्मावर आधारलेलें राज्य हिंदु लोक मागत नाहींत. पण शुद्ध राष्ट्रीयतेचा आणि राष्ट्रीय राज्यव्यवहाराचा तर्कशुद्ध व अनुभवग्राही अवलंब करा असें त्यांचें आजच्या सत्ताधाऱ्यांना सांगणें आहे. विरलेल्या स्वप्नांचा मोह सोडल्यास कॉंग्रेसवाल्यांना हा सरळ मार्ग दिसेल. एरवी ते अंतराळींच लोंबकळत राहणार, आणि जसा हेलकावा मिळेल तसें हलणार. "पाकिस्तान हें अस्वाभाविकपणें जन्माला आलें." असें अद्याप पंडितजी म्हणतात. मोठ्या बहुसंख्येची तशी इच्छा दिसलीं म्हणून आम्ही तीस मान्यता दिली असें आपलें समर्थन करतात. पण ही तीव्र इच्छा कां दिसलीं हें त्यांना उमगत नाहीं. या तीव्र इच्छेला हिंदुस्थानांतील बहुसंख्य मुसलमानांनीं पाठिंबा दिला होता. ते मुसलमान आता एकदम भारतीय राष्ट्रीयत्वांत समरस होऊंच शकणार नाहींत. पण हे शतश: सिद्ध अनुमान पत्करण्यास कॉंग्रेसचीं जुनीं विरलेलीं स्वप्नें आड येत आहेत. खऱ्या राष्ट्रीयत्वाची त्यांना ओळख झालेली नाहीं. झाली असती तर अलीगडची पाकिस्तानी चिंता दूर करण्याची धडपड करण्याऐवजीं अशी चिंता हिंदुस्थानांत राहून करणारे हे या राष्ट्राचे घटकच होऊं शकत नाहीत, हेंच नेहरूंनी प्रथम अलीगड विद्यार्थ्यांना सांगितलें असतें.

## ' अस्वाभाविक ' गोष्टींची मालिका

पाकिस्तान झालें हें अस्वाभाविक, तेथून बिगर मुसलमान लक्षावधि संख्येनें बाहेर पडत आहेत हें अस्वाभाविक, हिंदुस्थानांतून गेलेल्या मुसलमानांनी परत येऊं नये असें येथील लोकांना वाटतें हें अस्वाभाविक, हैद्राबाद स्टेट काँग्रेसला औषधाला देखील प्रमुख मुसलमान मिळत नाहीं हें अस्वाभाविक, हरिजन देखील पाकिस्तानात गांजले जात असतां आपलें हिंदुत्व टाकण्यास तयार होत नाहीत हें अस्वाभाविक, हजारोंनी बाटलेले रजपुत पुनः हिंदु होत आहेत हें अस्वाभाविक, काश्मीरचे मुसलमान मोठ्या संख्येने पाकिस्तानाकडे गेले हे अस्वाभाविक, निजाम पाकिस्तानाला कोटीनें कर्ज देतो हें अस्वाभाविक, सोरटी सोमनाथाच्या देवळाचा जीर्णोद्धार करण्यांत राजांना आणि रंकांना राष्ट्रीय उत्साह वाटतो हे अस्वाभाविक, लखनौची परिषद काश्मीर आक्रमणाचा निषेध करीत नाही हें अस्वाभाविक, गुप्त शस्त्रसाठें करणारे बहुसंख्य मुसलमान आढळतात हें अस्वाभाविक, ही काँग्रेसच्या स्वप्नानुसार अस्वाभाविकांची जंत्री १५ ऑगस्टपासून मारुतीच्या शेपटासारखी इतकी लांबत आहे कीं, शेवटी इतक्या सर्व गोष्टींना ' अस्वाभाविक ठरवणाऱ्या काँग्रेसवाल्यांचा स्वप्नरंजित ध्येयवादच अस्वाभाविक होय. ' असें म्हणणें प्राप्त होतें.

## न संपणारी घसरगुंडी

या अस्वाभाविक स्वप्नसृष्टीत वावरण्यानेच त्यांची त्रिशंकूसारखी स्थिति झाली आहे. गांधीचा उपास म्हणजे ही ढासळलेली स्वप्नसृष्टि पुन थातुरमातुर करून उभवण्याचा अखेरचा अयशस्वी प्रयत्न होय. या स्वप्नाळूपणामुळेंच काँग्रेसवाले पुर्व पंजाबांतून शोधशोधून मुसलमान मुलेंमाणसें पाकिस्तानांत पोचवण्यासाठी जिवाचा आटापीटा करतात, तर तिकडे पाकिस्तानांत दसपट स्त्रिया दडवल्या गेल्या आणि त्यांचा शोध करण्याच्या कामीं पाकिस्तानानें अडथळे आणले तरी चुप बसतात; अनेक ठिकाणीं पाकिस्तानी सैन्यें हिंदुस्थानमध्यें शिरून लुटालूट करीत असतां शाब्दिक खलिते धाडून स्वस्थ बसतात. हिदुस्थानाचे अनेक परराष्ट्रीय प्रतिनिधि मुसलमान आहेत हें मोठें भूषण आंतरराष्ट्रीय चव्हाट्यावर मिरवतात, अपराधी ठरलेलें मुस्लीम अधिकारी पुनः अधिकारपदावर घेतात आणि निजामाशीं जैसे थे

करार करतांना घसरतात व केल्यावरहि घसरतात. काश्मीरचा प्रश्न आंतर-राष्ट्रीय चव्हाटयावर न्यावा लागला हा एका घसरगुंडीचा शोचनीय अंत होता, आतां तेथून दुसरी घसरगुंडी सुरू झाली !

## जनतेला विनंती

विवेकभ्रष्टांचा शंभर द्वारांनी अधःपात होत असतो, असें संस्कृत सुभाषितांत म्हटलें आहे. त्यांचें मूर्तिमंत उदाहरण म्हणून कॉंग्रेसचा पाकिस्तान–निर्मितीचा आणि नंतरच्या शरणागतीचा इतिहास दाखवितां येईल. हा अधःपात ज्यांना दिसत नाहीं त्यांना दाखवणें आणि तो रोखण्याचा तरी निदान यत्न करणें हें प्रत्येक राष्ट्रीय बुद्धीच्या राष्ट्रघटकाचें कर्तव्य आहे. जनतेनें या देशांतील हा अस्वाभाविक, उलटा नि घसराळू व्यवहार थांबवण्याची शिकस्त करावी अशी आमची इच्छा आहे, त्यावाचून या राष्ट्राचे भवितव्य उजळ होणार नाही. इतकें ज्यांना पटलें त्यांनी तें घडवून आणण्यास योग्य वाटेल ती संघटना ' साधन ' म्हणून धरावी. हिंदुसभा हेंच आम्हांस या कामीं योग्य साधन वाटतें म्हणून ती संघटना सबळ करा असें आम्ही लोकांना सांगत आहोंत. पण मुख्य म्हणजें लोकांना सध्याच्या उलटया व्यवहाराची चीड आली पाहिजे व तो व्यवहार सुलटा करण्याची आंच तीव्रतेनें लागून त्या दिशेनें त्यांच्याकडून प्रयत्न झाला पाहिजे. मग तो कोणत्याहि मार्गानें कोणाच्याहि पुढारीपणाने आणि कोणत्याहि संघटनेच्या द्वारा होवो, त्याचें आम्ही स्वागतच करूं.

--केसरी दि ३०-१-१९४८

# धर्मिष्ठ राज्याचें अरिष्ट ?

अगा जें कल्पिलेंचि नाहीं ।
त्याची भीती सांगसी काई ? ॥

पं. जवाहरलाल नेहरू यांनी कांही दिवसांपूर्वी नैनिताल येथे केलेल्या प्रकट भाषणांत पुन: एकदा जातीयता-विरोधाच्या आपल्या विशिष्ट कल्पनांना उजळा दिला. या विशिष्ट कल्पना अर्थात् एकट्या नेहरूंच्या नाहीत. कॉंग्रेसमधील आणि बाहेरील अनेक लोकांच्या मनोवृत्तीचें प्रतिबिंब त्यांच्या या विचारांत दिसून येतें. या अनेक लोकांचे प्रवक्ते म्हणूनच पं. नेहरूंच्या या वक्तव्याचा विचार करणें प्राप्त होतें.

प्रारंभींच आम्ही अ. प्रे. च्या अधिकृत वृत्तांतांतील पं. नेहरूंचीं ठळक वाक्यें देतों. म्हणजे पुढील विवेचनांत वाचकांना अंधारांत चाचपडल्याप्रमाणे होणार नाहीं. पंडितजी म्हणाले, " जे लोक जातीय चळवळी करतात ते देशाचे शत्रु होत, आणि मी त्यांना दयामाया न ठेवतां शत्रुप्रमाणें वागवीन आणि शिक्षा करीन. मी त्यांची गय करणार नाही. मी त्यांचें आव्हान स्वीकारीन आणि हिंदुस्थानच्या बाहेरून मी त्याच्याशी लढेन."... ..." पाकिस्तानांतील घटना घडल्यानंतर त्याचा बदला (रिटॅलिएशन) केला नसता तर कित्येक भयंकर दु:खकारक गोष्टी होण्याचें टळलें असतें.

मुस्लीम लीग आणि पाकिस्तान यांच्यापासून आपण काय शिकलों ? केवळ जातीयता शिकलों, दुसरें कांहीं नाही. पाकिस्तानमध्ये इस्लामी धर्माधिष्ठित किंवा धर्मिष्ठ राज्य (थिओक्रॅटिक स्टेट) उत्पन्न करावयाची लीगची इच्छा आहे. असलें राज्य त्रिनबुडाचें राज्य होय. आधुनिक काळांत धर्ममतांवर अधिष्ठित असलेलें राज्य हें कालविसदृश आहे; आणि हें स्थापन झालें तर त्यांत उपद्रव उत्पन्न होऊन तें ढासळेल. हिंदूंना हिंदुस्थानांत हिंदु राज्य निर्माण करावयाचें असेल तर, त्याचाहि तसाच अंत होईल. सध्या जगांतील कोणतेंच राज्य आपणांस धर्माधिष्ठित राज्य म्हणवीत नाही."

## नव्या जातीयतेची निर्मिती

आपल्या अंतःकरणांतील खळबळ उघडपणे जनतेपुढे मांडणारे म. गांधींच्या खालोखाल पं. नेहरू हेच पुढारी आहेत. त्यांनी जनतेपुढे आपलें मत उघड करून मांडलें याचा हेतु हा की, त्या संबंधाने जनतेने विवंचना करावी, संमति असल्यास प्रकट करावी किंवा त्यामध्ये जर कांही आत्मविरोध किंवा हेत्वाभास असेल तर तोहि जनतेच्या नि पुढाऱ्यांच्या निदर्शनाला आणावा. या दृष्टीने आम्ही कांही गोष्टी लोकांपुढे मांडीत आहोंत. मुस्लीम लीग आणि पाकिस्तान यांच्यापासून आम्ही जातीयता शिकलो म्हणजे एक नवा धडा घेतला असा अर्थ होतो. यावरून पूर्वी जे लोक जातीय नव्हते ते नव्याने जातीय झाले असें अनुमान क्रमानेच येतें. पाकिस्तान हें १५ ऑगस्ट १९४७ ला होऊन गेले. आणि ते व्हावयाचें हें ३ जूनलाच ठरून गेलें तेव्हांपासून आजपर्यंत पूर्वी जातीय नसलेले असंख्य लोक नव्याने जातीयतेचा धडा शिकले असले पाहिजेत. पाकिस्तानापासून हिंदुस्थानाने नवा धडा घेतल्याने जातीयता निर्माण झाली ती कोणत्या प्रकारे याचें थोडेसें दिग्दर्शन पंडितजींच्या भाषणांत आढळतें. तें म्हणजें हिंदुस्थानांत हिंदुराज्य निर्माण करण्याची इच्छा उत्पन्न झाली हें होय. म्हणजे धर्माधिष्ठित राज्याचें पाकिस्तानांतील उदाहरण पाहून हिंदुस्थानांत तोडीस तोड म्हणून हिंदुधर्माधिष्ठित राज्य उत्पन्न करण्याची इच्छा झाली.

बोलूनचालून अनुकरणानेंच उत्पन्न झालेली ही इच्छा कोठे असलीच तर कशा प्रकारची असूं शकेल? पाकिस्तानांतील धर्मराज्याची आवृत्ती किंवा प्रतिकृति बिंब-प्रतिबिंबाप्रमाणें निर्माण करावयाची अशीच ती इच्छा असणार. तिकडे इस्लामी ध्येये, इस्लामी शरीयतचीं तत्त्वें आणि इतर इस्लामी राज्याशीं बंधुभाव यांचा उदो उदो चालला असतां इकडे हिंदूधर्मीय ध्येयें, धर्मशास्त्राप्रमाणें राज्यव्यवहार आणि इतर हिंदु राज्यांशी साखळी जोडणें अशा प्रकारे धार्मिक राज्य करावें असें कांही लोकांच्या मनांत उत्पन्न झालें अशी कल्पना केल्याविना पंडित नेहरूंच्या म्हणण्याची संगति लागणार नाही.

## असें कोण म्हणतो?

पण घटना-समितीत वा बाहेर मनु-याज्ञवल्क्य स्मृतीना धरून घटना व्हावी, असें कोणीहि म्हटलेलें नाही! क्षत्रियांनाच राज्याधिकार नि सैनिक व्यवसाय करण्याचा अधिकार असावा, असेंब्लीचें अधिवेशन धार्मिक मुहूर्तावर, वैदिक मंत्रांनी, महागणपतिपूजन करून चालू व्हावे, सर्व शपथविधी केवळ गीतेचें पुस्तक घेऊनच व्हावे, सरकारी सणवार केवळ हिंदुधर्मीयच असावेत, एक स्वतंत्र धर्ममंत्री असून तो असेंब्ली नि प्रांतिक विधिमंडळें यांत दर्भासन घालून बसावा, शाळामधून सक्तीचें हिंदुधर्म-शिक्षण द्यावें, सरकारी पगार देऊन धर्मोपदेशक नेमावेत, सामाजिक प्रश्नाचे निर्णय श्रीशंकराचार्यांकडे सोपवावेत, प्रत्येक सरकारी कागदावर "ओम् तत्सत्" ची मुद्रा असावी इ. इ. असा किंवा अशा स्वरूपाचा धर्माधिष्ठित राजकीय व्यवहार चालू करण्याचा पुरस्कार आज वृत्तपत्रांत, व्याख्यानांत वा लोकचर्चेत आम्हांस कोठेहि प्रबळ दिसत नाही!

## खुलासा करा

मग पंडित नेहरूंना पाकिस्तानाच्या अनुकरणानें हिंदुस्थानांत धर्माधिष्ठित राज्य उत्पन्न करण्याची जातीयता कोठे दिसत आहे, हें त्यांनीं स्पष्ट सांगावें! एरवी जों जों ते या विषयावर तेंच ते बोलतील तों तों त्याचें कोडें अधिक वाटत जाणार; उलगडा कांहीच होणार नाहीं. हो नवी काल्पनिक जातीयता आपल्याला हिंदुस्थानांतून हांकून देईल अशीहि पं. नेहरूंची कल्पना असावी. एरवी 'हिंदुस्थानाबाहेरूनहि विरोध करीन' हे गंभीर शब्द

त्यांनीं उच्चारले नसते. येवढें हें प्रचंड संकट पंडितजींना दिसत आहे. म्हणून अत्यंत कडवेपणानें त्यांनीं या 'जातीय' चळवळचा म्हणून देशशत्रु असलेल्या लोकांचा बिमोड करण्याच्या घोर प्रतिज्ञा व्यक्त केल्या. आम्हांस तर धर्मराज्याची कल्पना इकडे कोठेहि दिसत नसल्यामुळे, पोकळ आकाशांत बाण सोडण्यासारखे पंडितजींचें हें वक्तव्य दिसतें! त्यांच्याकडून उलगडा कधींकाळीं होईपर्यंत आम्हांस काही अनुमानानें त्याच्या या अस्थानी, अप्रस्तुत नि अवास्तव भीतीची कारणमीमांसा निराळ्या रीतीनें करतां येईल. पं. नेहरूंनीं कांहीं अधिक समाधानकारक उलगडा केला तर अर्थात आम्ही आमची कारणमीमांसा सोडून देऊं किंवा ती आपोआपच लंगडी पडेल.

## सहेतुक अतिरंजन

ती कारणमीमांसा अशी : कोणतीहि गोष्ट आपल्याला नापसंत असेल तर तिचें विकटोपर्यंत अतिरंजन करून ती मारण्याचा नेहमीचा प्रघात आहे अल्पवयी विधवांच्या पुनर्विवाहास अनुज्ञा ठेवा अशी मागणी करण्याबरोबर "आमच्या विवाहसंस्थेचा विध्वंस करणारा" असें म्हणणें, हें अतिरंजन लोकांच्या परिचयाचें आहे. स्वदेशीच्या प्रचारकांना "घड्याळ विलायती म्हणून तुम्ही गळ्यांत घटिकापात्र बांधणार काय?" असें विचारणें हा अतिरेक एकेकाळी झालेला आहे. विधिमंडळांत सभासदत्व पत्करणाऱ्यांनीं क्रमप्राप्त अशी मंत्रिपदे पत्करावी असें म्हणणाऱ्यांना "नोकरीवाले" असें विशेषण लावलें गेलें हें सुप्रसिद्ध आहे. अशा एक प्रकारच्या सहेतुक अतिरंजनानें "धर्माधिष्ठित राज्या" चा बागुलबोवा कोणाकडून तरी पं. नेहरूंपुढें उभा करण्यात येत असावा असा आमचा समज आहे.

पंडित नेहरूंच्या डोळ्यापुढें आज हिंदु-बंगाल नि हिंदु-पंजाबमधील लोक, सिंधलगतचे हिंदु प्रदेश, निजामीलगतचे भाग हे असावेत; कारण पाकिस्तानाच्या अनुकरणाने जातीयतेचा धडा शिकण्यासारखे हेच संभवनीय भाग आहेत. तिकडून हाकलून काढलेलें किंवा भयानें जिवानिशीं पळून आलेले लक्षावधि हिंदु शीख या भागांत आले आहेत. पाकिस्तानाचा धडा आपण गिरवावा अशी इच्छा कोठे हिंदूंमध्यें उत्पन्न होण्यासारखे प्रदेश असतील तर ते हेच होत. या प्रदेशांतील लोकांचा पाकिस्तानाशीं परिचय नि संघर्ष विशेष असल्यामुळे त्याच्यांत काय भावना निर्माण झाल्या अस-

तील त्या अनुमानानें कळण्यासारख्या आहेत. त्यांतले आंत्यंतिक लोक 'बदला घ्या' असें म्हणत असतील, त्यापेक्षां सौम्य लोक निदान कांहीं चुणूक दाखवून धाक उत्पन्न करा असें म्हणत असतील, तर कांहीं निदान इकडच्या भागांतून पाकिस्तानी लोक सोयीनें हलवा असें म्हणत असतील. पण या सर्व थरांत "हिंदुधर्माधिष्ठित राज्य" येथें करा असें म्हणण्याइतके "विद्वान्" कोणी असतील असें अनुमान करणें देखील चुकीचें होईल. पण या सर्व वृत्तीच्या पीडित आणि पीडाक्षेत्रसन्मुख असलेल्या हिंदूंना येथें जर पाकिस्तानाच्या अत्याचाराला योजनापूर्वक उपकाराचेंच उत्तर दिलें जात आहे असें दिसूं लागलें तर त्यांतील सर्व थर त्या गोष्टीचा रागानें निषेध करतील हा त्यांचा निषेध किंवा राग पाकिस्तानाशी सौम्य व्यवहार करूं म्हणणाऱ्यांना खुपतो. म्हणून "पाकिस्तानी अपकाऱ्यांना उपकारानें आभारी करूं नका" असा किंचित ध्वनि उमटल्यावर "जातीयता! जातीयता! धर्माधिष्ठित राज्याची पाकिस्तानास तोडीस तोड!" इत्यादि ओरड या लोकांकडून पं. नेहरूंकडे करण्यांत येत असावी असें आमचें अनुमान आहे.

## प्रतिकार म्हणजे जातीयता?

या अनुमोदनाला पं. नेहरूंच्या भाषणांतलाच एक पुरावा देतां येण्यासारखा आहे. पं. नेहरू याच भाषणामध्यें म्हणाले कीं, पाकिस्तानांत झालेल्या घटनांचा इकडे प्रतिवाद (रिटॅलिएशन) झाला नसता तर पुढचा अनर्थ वाचला असता. पण पाकिस्तान निर्माण झालें तें आमच्या इच्छेविरुद्ध असतांहि आम्ही थंड राहिलों. तरीहि पाकिस्तानांतल्या "घटना" घडल्या त्या कां? मागें श्री. राजगोपालाचारी म्हणाले होते कीं, कलकत्त्याच्या दंगलीनंतर बिहारच्या हिंदूंनी दंगल केली नसती तर नौखाली प्रकरण घडलें नसतें. पं. नेहरूंचें विधान याच अर्थानें केलेलें असावें. आधी बिहार प्रकरण हें कलकत्त्याच्या अत्याचाराचा प्रतिवाद होता हेंच सिद्ध झालेलें नाहीं. बिहारच्या दंगलीला स्थानिक प्रत्यक्ष क्षोभकारक कारणें घडलीं होतीं. पण क्षणभर राजाजींचा कार्यकारणभाव गृहीत धरला तरी मूळ कलकत्त्याची कत्तल आम्ही शांत असतानाच झाली तिचें काय? तसेंच प्रतिकार किंवा रिटॅलिएशन करण्याची कल्पना कित्येकांना वावडी असली तरी ती

"जातीय" होत नाही. जें जें प्रतिकारी असेल तें तें सर्व 'जातीय' असा नवा अर्थ राज्य कर्त्यांना बनवावयाचा आहे की काय?

## प्रतिकारी हा प्रतिपापी नव्हे

पापी माणसाचाहि प्रतिकार करूं नये असें लंगडे मत या देशांत ज्या एका धूर्तपणानें प्राचीनकाळांत मांडलें गेलें तोच धूर्तपणा त्यांच्या आधुनिक प्रतिनिधींना सुचला आहे. "न पापे प्रतिपापः स्यात्"..."एकानें गाय मारली तर दुसऱ्यानें वासरूं मारूं नये" या उक्तीमध्यें तो धूर्तपणा भरलेला आहें. एकानें गाय मारली तर तो वासरूहि मारील म्हणून तें सोडवणें किंवा पुन: गाय त्याच्या तावडींत जाऊं न देणें येवढीच गोष्ट शाहणा मनुष्य करील. पाप्याला प्रतिपापी कोणीच मनुष्य होत नाहीं. कुत्रा चावूं लागला तर आपण उलट कांहीं चावत नाही; आपण काठी दाखवतो. या मानवी प्रतिकाराला "कुत्रेपणा" किंवा "श्वानाचरण" म्हणणें धूर्तपणाचें किंवा वेडेपणाचें आहे. ज्यांना पापप्रतिकारच मुळी नको त्यांनीं "प्रतिपापा" चा निष्कारण बागुलबोवा या देशांत प्राचीन काळीं निर्माण केला; तीच युक्ति त्यांच्या वैचारिक वारसांना आज सुचली आहे. पाकिस्तानाला प्रतिपाकिस्तान कोणालाच निर्माण करावयाचें नाही. पण त्याच्यापासून संरक्षण नि भावी भयाचें निवारण होण्यास साध्या माणसाला सुचणाऱ्या प्रतिकारात्मक गोष्टी मात्र करावयाच्या आहेत. त्या स्वाभाविक प्रतिकाराच्या गोष्टी कांहींतरी उच्च तत्त्वें सांगून ज्यांना डावलावयाच्या आहेत ते लोक राज्यकर्त्यांपुढें धर्मराज्याचा खोटा बागुलबोवा उभा करीत आहेत.

—केसरी दि. २२-६-१९४८

------

# आधी फांशी....मग चौकशी !

**(लेखांक १ ला)**

रा. स्व. संघाचे प्रमुख श्री. गोळवलकर गुरूजी यांनी अपेक्षा केल्या प्रमाणेंच संघावरील बंदी चालू ठेवण्याचा हिंद सरकारचा निर्णय गेल्या दि. १३ ला बाहेर पडला. त्यासंबंधी हिंद सरकारनें जें पत्रक प्रसिद्ध केलें त्यांत म्हटल्याप्रमाणें, गुरूजींना परत नागपूरला म्हणजे पूर्वस्थळीं पोचविण्याची व्यवस्था करण्यांत आली. पण तेथें गेल्यावर मात्र त्यांना दिल्लीस जाण्याच्या पूर्वीची मर्यादित स्वतंत्रताहि प्राप्त झाली नाही ! कारण दिल्लीस जाण्या-पूर्वी ते बंदिवासांतून मुक्त झाले होते. फक्त नागपुरांतून बाहेर जावयाचें नाही एवढ्यांपुरतेंच त्यांच्यावर बंधन होते. दिल्लीहून परतल्यावरहि तशाच स्थितींत त्यांना पुनः नागपूरला राहूं दिलें असते तर काय बिघडलें असते हें आम्हांस समजत नाही. कारण काय असेल तें असो; पण संघावरील बंदी उठवण्याच्या संबंधांत अखेरचा नकार मिळाल्यानंतर त्यांना नागपुरांत मोक-ळे राहुं देणें हेंही मध्यप्रांत सरकारला अनिष्ट वाटलें ! म्हणून दिल्लीची वारी करून नागपूरला येतांच गुरूजींची तडक बदिवासांत पुनः रवानगी करण्यांत आली. ते संघाला मोकळे करावयाला गेले, पण तें कार्य न साधता स्वतः तेच बंदीत पडले !

## गंजलेल्या शस्त्राचा उपयोग

मध्यप्रांतांत जो नवा सुरक्षा कायदा प्रचलित आहे त्यामध्ये चौकशी-विना बंदिवासाला ६ महिन्यांची मुदत घातलेली आहे, म्हणून गुरूजीना पूर्वी नाइलाजाने सोडावें लागलें होतें. पण आता पुन: अटक करतांना तसली कांही कालमर्यादाहि राहूं नये अशी सावधानता नागपूर सरकारने बाळगली आहे ; कारण विमानांतून उतरतांच केलेली ही नवी अटक १८१८च्या तिसऱ्या रेग्युलेशन खाली आहे असें समजतें. पीनल कोडाच्या १२४, १४४ इत्यादि जुन्या राजवटींतील नामवंत कलमांप्रमाणेच लजपतराय आणि अजितसिंह, तसेंच अश्विनीकुमार दत्त प्रभृति सात बंगाली पुढारी यांना वंगभंगाच्या चळवळींत याच रेग्युलेशनान्वये पकडल्यामुळें देशांत खळबळ उडाली होती. 'हें जुनें गंजलेलें कायदेशीर शस्त्र आता फेकून द्या' अशी जुन्या नोकरशाही-ला राष्ट्रीय लोकांनी सतत विनंति केली होती. पण त्या गंजलेल्या शस्त्राचा राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या वातावरणांतहि अचूक रामबाण उपयोग होईल असें १९४७ च्या पूर्वी स्वातंत्र्यवाद्यांना सागितले असतें तर त्याना तें खरेंहि वाटलें नसतें. अघटित घटना घडत असतां माणसे स्वत.च्या अगाला चिमटा घेऊन आपण जागृत आहोंत, स्वप्न पाहात नाहीं, अशी खात्री करून घेत असल्याचें गोष्टींतून वर्णन करतात. आजच्या स्वातंत्र्यामधील गुरुजींच्या अटकेसारख्या कांहीं अघटित सरकारी कृत्यामुळे अमाच चिमटा घेऊन आपण स्वातंत्र्याच्या सत्यसृष्टींत आहोंत याची खात्री करून घेण्याची पाळी येत आहे!

## आक्षेपांच्या कोलांट्या

संघावर बंदी घालणारें पहिलें सरकारी पत्रक आणि ती बंदी काढतां येत नाहीं या संबंधाने गेल्या दि. १३ ला निघालेलें शेवटचें पत्रक यांची तुलना केली असतां असें स्पष्ट दिसून येतें की, पहिल्या दि. ४ फेब्रुवारीच्या पत्रकांत खून, लुटालूट, जाळपोळ दहशतवाद इत्यादि जे भयानक आरोप संघा-वर करण्यांत आले होते ते निमूटपणे या दुसऱ्या पत्रकांत गाळण्यांत आलेले आहेत. आता संघावर आरोप असा आहे की, संघाची कार्यपद्धति संघ सोडीत नाहीं आणि त्या पद्धतिमुळें असें एक वातावरण निर्माण होतें की,

त्यायोगे "पूर्वीप्रमाणे भयानक प्रकार घडतील." या मोघम उल्लेखाचा अर्थ उघडच असा होतो की त्या पद्धतीमुळे उत्पन्न होणाऱ्या वातावरणामुळे गांधीजींचा खून झाला. इतर आणखी काय भयंकर प्रकार घडले ते लोकांना समजलेले नाहींत आणि त्यांच्यापुढें ते पुराव्यानिशी मांडण्याची सरकारलाहि आवश्यकता वाटत नाही ! तिरंगी राष्ट्रध्वज आणि धर्मातीत राज्य यांना गुरुजींनी मान्यता दिली. पण ती मान्यता त्यांचे अनुयायी पाळतील की नाही, या विषयी संशय सरकारने व्यक्त केला आहे ! सत्ता हातीं असल्यामुळे आणि लोक हुकूमशाही कारभाराला बहुतांशी अनुकूलच असल्यामुळे असले परस्परविरोधी आक्षेप घेण्याचीहि सरकारला खंत वाटत नाही; कारण एकीकडे संघांत लोकशाहीची अंतर्व्यवस्था नसून एका नेत्याच्या आज्ञा पाळण्याची हुकूमशाही व्यवस्था आहे असा आक्षेप संघावर अलीकडे सारखा घेण्यांत आला; आणि आता बरोबर उलट तोंड फिरवून गुरुजींच्या आज्ञा स्वयंसेवक मानतील की नाही याविषयी संशय प्रकट करण्यांत आला आहे ! ! जातीच्या सुंदरांना जसें कांहीहि चालतें तद्वतच जातीच्या हुकूमशाहींना हवें तसें आत्मविरोध हडपून चालवतां येनात हेंच खरें !

## खोट्या प्रचाराची मोहीम

पण या संबंधांत मध्यवर्ती आणि प्रांतिक मंत्र्यांपेक्षा बाहेरचे उपद्व्यापी लोकच अधिक दोषी आहेत असें आम्हांस वाटतें. कारण वृत्तपत्रे, सभा काँग्रेस समित्या इत्यादी मधून संघावरील बंदी उठवू नये अशी चळवळ करण्यांत आली बंदी घालतांना सरकारी पत्रकात जे भयानक आरोप करण्यांत आले ते सिद्ध करणारा कांही तरी पुरावा सरकारने लोकांपुढे मांडला पाहिजे, ही गोष्ट या उपद्व्यापी चळवळ्यांनी ध्यांनात घेतली नाही. ते सरकारी आरोप खरे असोत वा खोटे असोत. एकंदरीने संघाचे अस्तित्व हानिकारक वाटतें म्हणून बंदी चालूच ठेवावी. असा या लोकांच्या मागणीचा इत्यर्थ होता. तसेंच संघाच्या गुप्त हालचाली चालू आहेत इत्यादि वार्ता याच गटांकडून सारख्या प्रसृत करण्यांत येत होत्या, आणि अद्यापीहि येत आहेत. त्यांमध्ये सूक्तासूक्त असें कांहीच पाळले जात नाहीं. उदाहरणार्थ, अलीकडचीच एक बातमी पाहा. कल्याण येथे कांही लोकांना पकडल्यानंतरहि

अजून बाहेर असलेले संघीय लोक राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांना त्रास देत आहेत, अशी मुंबईच्या एका दैनिकाच्या वार्ताहराने बातमी दिलीं आहे. त्याने असेंहि ठोकून दिलें आहे की, कल्याणचा एक भाग हा हिंदुसभावाल्यांचा बालेकिल्ला असून, त्यांच्याशी सहमत नसणाऱ्या लोकांना ते अतिशय त्रास देत आहेत असें म्हणतात. आमचे गृहमंत्री खोट्या वार्ता उठवणाऱ्यांवर कडक उपाययोजना करूं असे बोलतात मात्र; पण संघाविरूद्ध किंवा हिंदु-सभेविरुद्ध वर्तमानपत्रांतून वरील प्रकारच्या खोट्या बातम्या प्रकट होत असतांना देखील त्यांना कोणत्यहि प्रकारें प्रतिबंध सरकार करीत नाहीं.

## पश्चात्बुद्धीचा उदय

आता संघावरील बंदी हडसून खडसून पक्की झाल्यानंतर ही बंदी चालू ठेवण्याबद्दल सतत प्रचार करणाऱ्या मुंबईच्या "फ्री प्रेस" दैनिकाला एक प्रकारची पश्चात्–बुद्धि आठवली आहे ! संघासंबंधीं अलीकडे लिहि-लेल्या एका स्फुटांत तें पत्र म्हणतें की, "संघावरील बंदी चालू राहिल्याने आम्हांस आनंद झाला हे आम्ही लपवून ठेवीत नाहीं. पण संघावर अन्याय झाला, असे पुष्कळांचे मत झालेलें दिसते आणि तें वाढतें आहे म्हणून सर-कारने संघाविरुद्ध निश्चित आरोपपत्रक प्रसिद्ध करावे आणि त्या आरोपांचा पुरावाहि लोकांपुढें मांडावा. एरवी संघाला निष्कारण हुतात्मेपणा प्राप्त होईल !" या पश्चात्–बुद्धीवरून एक गोष्ट दिसते कीं, असा कांहीच पुरावा पुढें नसतां हें पत्र आजवर संघाची बंदी चालु ठेवण्याचा प्रचार करीत होतें. आरोपीवर आरोप सिद्ध न होतांच त्याला फाशीची शिक्षा दिल्यानंतर आणि ती देण्याची सतत मागणी केल्यानंतर, या मागणी कर-णाऱ्यांनीं आता या खुनाचा काय असेल तो पुरावा पुढें यावा असे म्हणणे हे जितके विपरीत दिसतें तितकी ही ' फ्री प्रेस 'ची उपरीत विपरीत आहे.

## आधी शिक्षा मग पुरावा !

वृत्तपत्रीय आणि नागरिक स्वातंत्र्याच्या संबंधानें अत्यंत काळजी दाखवण्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या ' फ्री प्रेस ' सारख्या वृत्तपत्राला जेथे ' आधी शिक्षा कायम आणि मागून पुरावा, हा उलटा व्यवहार सांगण्यास किंचितहि जनलज्जा अथवा मनलज्जा वाटत नाहीं तेंथे इतरेजनांची काय

कथा ? पण आता 'परी प्रेस' ची हीं मागणी सरकारकडून मानली जाण्याचाहि संभव नाही. इतर पत्रेंहि संत्र वाईट आहे म्हणून बंदी चालू ठेवावी, असें मोघम प्रतिपादन करतात. इतकेच नव्हें तर, बंदी उठवणे म्हणजे एक प्रकारे संघाला सरकारी 'मान्यता' मिळाल्यासारखे होतें, असलीहि पोचट विधाने करण्यास त्यांना क्षिती वाटत नाहीं. 'आम्हांस जातीयता नको बिनधार्मिक राज्य पाहिजे आणि या गोष्टीला संघाचें अस्तित्व बाधक आहे 'असे गृहित कृत्य धरून संघावरील बंदी चालू ठेवल्याबद्दल सरकारला ही पत्रें धन्यवाद देत आहेत. खून, दरोडें, जाळ-पोळ इत्यादी गोष्टी संघामुळें झाल्या म्हणून घातलेली बंदी आता तें कांहींहि सिद्ध होत नसले तरी भयानक गोष्टी शक्य होण्याचें वातावरण तो निर्माण करतो असला मोघम आक्षेप घेऊन चालू ठेवण्यांत आली आहे. या कृत्याला अभिनंदनीय समजणारे लोक जेथे आहेत; तेंथे खऱ्या अर्थानें नाग-रिक स्वातंत्र्य आणि लोकशाहीं नांदणें हें फार कठीण आहे असें आमचें मत आहे. एकीकडें हे स्वतः अशा प्रकारे हुकुमशाहीला प्रोत्साहन देणारें आचरण करीत असतां त्यांनीच उलट संघावर नाझीपणाचा आरोप करणें हें विपरीत होय.

## संघटन-स्वातंत्र्याची गळचेपी

मूळ ज्या संघटनेंच्या विशिष्ट अनुकरणानें रा. स्व. संघ बनविण्यांत आला ती बालचमूंची संस्था घ्या. तिचा अंतर्गत व्यवहार लोकशाहीचा आहे काय? ह्यणजे बालचमू संस्थेचीं धोरणें बालचमूंची मतें घेऊन ठरविण्यांत येतात काय ? मुक्तिफौज, थिऑसॉफिकल सोसायटी इत्यादि अनेक संस्था अशा आहेत कीं, त्यामध्यें एक प्रमुख व जवळ जवळ सर्वाधिकारी असतो आणि आपल्या मागून येणाऱ्या प्रमुखांची नेमणूकहि बहुधा तोच करीत असतो. हिंदुस्थानांत काम करणाऱ्या अनेक मिशनरी संस्था त्या त्या धर्ममतापुरत्या मर्यादित आहेत. या संस्था आणि त्यांच्या कार्यपद्धति कोणास मान्य असोत वा नसोत, त्यांच्या योगे देशाचें हित होते कां अहित होतें याविषयी दुमत असूं शकेल; पण जोपर्यंत त्या कायद्याला धरून वागत आहेत तोपर्यंत

त्यांना बंदीं करणें म्हणजें संघटनस्वातंत्र्यावर आक्रमण करण्यासारखें आहे भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, यांच्या इतक्याच तोलाचा संघटनस्वातंत्र्य हा एक जागतिक मान्यता पावलेला नागरिक अधिकार आहे. पण त्याची सीमा फक्त स्वतःच्या आवडत्या मतापुरतीच आहे आणि पलीकडे नाहीं असे मानणारे लोक जेथें पुष्कळ आहेत, तेथे तद्विरुद्ध मताच्या लोकांना हें नागरिक स्वातंत्र्य मुळीच लाभत नाहीं हें संघावरील बंदीच्या खेदकारक घटनेवरून दिसून येंते.

--केसरी दि. १९-९-१९४८

------

# आधी फांशी .... मग चौकशी

(लेखांक २ रा)

## कायदा पाळणाऱ्यांना प्रायश्चित्त !

संघावर बंदी झाली त्याच वेळेस तो विसर्जित केल्याची घोषणा गुरुजींनी बंदीवासातूनच केली, आणि ती सर्व संघीयांनी मानली. आता सरकार बंदी पक्की करणार असें चिन्ह दिसतांच कोणत्याहि प्रकारे निर्बंध–भंग करूं नका असा आदेश आगाऊच गुरुजीनी सर्व संघीयांना दिला, तोहि त्यांनी मानला. तत्पूर्वीहि जेव्हां जेव्हां आजच्या सरकारनें किंवा पुर्वीच्या ब्रिटिश सरकारनें संचलन बंदी किंवा मेळाव्याला बंदी केली तेव्हां तेव्हां ती संघाने, कित्येक वेळेला त्रास सोसूनहि, पाळलेली आहे. गुरुजींनीहि तुरुंगांतून सुटल्यावर नागपूरची स्थानबद्धतेंची अट पाळली आणि दिल्लीस गेल्यावर तेथील मॅजिस्ट्रेटनें घातलेले निर्बंध पाळले. यावरून प्रचलित सरकारचा कायदा मानावयाचा या संघाच्या ठरीव धोरणाचें कोठेहि उल्लंघन झाल्याचें सरकारला दाखवितां येणार नाहीं. पण कायदा काटेकोरपणें पाळणाऱ्यांना हवें तसें दडपून टाकून तो मोडणारांना मात्र कधीकधी आजचें सरकार हळु-वारपणें वागवतें.

## असंभाव्य आक्षेप

संघाच्या सदस्यांची मोठी संख्या वारंवार उल्लेखण्यांत येते. पण त्यामध्यें पांच वर्षाच्या मुलांपासून तो साठ वर्षावरील म्हाताऱ्यापर्यंत सर्वच लोक येतात, हें कोणी ध्यानांत घेत नाहीं. या सर्व संघटनेनें दरोडे, जाळपोळ इत्यादि गोष्टी केल्या असें वाक्य कागदावर लिहितां येतें; पण प्रत्यक्ष त्याचा काय अर्थ करावयाचा हें कोडेच आहे. बरें, संघांत असलेले बाल, वृद्ध आणि तरुण हे देखील कांहीं चोवीस तास संघाच्या हातांत असतात असें नाही. बालांना आणि तरुणांना त्याचें पालक आणि शिक्षण संस्थाधिकारी यांच्या कामांत गेलेला वेळ वगळून इतर कांहीं थोडा वेळ राहील तोच संघाकडे देता येतो. सर्व सभासदांना भोंवतालच्या जगतांतून उचलून दूर कोठे तरी नेऊन संघ त्याच्यावर कांहीं किमया करतो असेंहि मानणें चुकीचे होय. संघ जेथे राजकारणातच पडत नाही, तेथें तो धर्मिष्ठ किंवा हिंदु राज्याचा पुरस्कार करतो हें म्हणणेंहि टिकाऊ नाहीं.

## कुकल्पनांचा खेळ

संघाची प्रार्थना पूर्वी मराठी होती. पुढें महाराष्ट्र प्रांताबाहेर संघाचा विस्तार झाल्यामुळे सर्वत्र ती संस्कृत करण्यांत आली. या प्रार्थनेवरून कोणालाहि धर्मिष्ठ राज्याचें ध्येय किंवा जातीयता ही दाखवतां येणार नाहींत. उलट संस्कृत भाषा पत्करून सर्व प्रांतांची प्रांतीयता एकत्र आणण्याचा संघाचा प्रयत्न दिसतो. गणवेष, संचलन, शारीरिक खेळ यांतून जो वेळ उरेल त्यांत संघाचें बौद्धिक असावयाचे. बाहेरच्या जगांत, शाळेत, वाचनालयांत, चित्रपटगृहात, अनेक गोष्टींचे संस्कार संघाच्या सभासदांवर होत असतात त्यामानानें संघाच्या बौद्धिकाचा वेळ हा अत्यल्पच समजला पाहिजे. संघाच्या बाहेरचें संघीयांचें आचरण संघ कधींच निर्बंधित करीत नाहीं. संघीयानें अमुक शाळेंत जावें, जगाच्या व्यवहारांत अमुकच वेष करावा, अमुकच नाटकें पाहावी, अशी कांहीं बंधनें संघ घालीत नाही आणि संघ घालुं शकत नाहीं. असा विश्लेषणात्मक विचार केला असता संघ म्हणून जें एक काल्पनिक भयानक चित्र काही लोकांनी उभें केले आहे, तो सर्व कुकल्पनांचा खेळ आहे असें म्हणावें लागतें !

## गुप्तपणाचा आरोप

गुप्तपणें कामें करण्याचा संघावरील आक्षेपहि कांही अज्ञानाने व कांहीं दुष्टपणाने घेतला जातो. छापील घटना आणि कार्यक्रमांची वृत्तपत्रीय जाहिरात यांच्याखेरीज संघटना किंवा संस्थाच असूं शकत नाही अशी अधुनिकांची समजूत झालेली असते. एकीकडे आपल्या प्राचीन संस्कृतीच्या चिवटपणाची प्रशंसा करीत असतां दुसरीकडे त्या संस्कृतींतून चालत आलेल्या बिनबोभाट संघटन–पद्धतीचें अनुकरण किंवा पुनरुज्जीवन करणाऱ्या संघासारख्या नमुनेदार संस्थेवर 'गुप्त' पणाचा खोटा आरोप करण्यांत येत आहे. तसें म्हटलें तर आज कितीतरी "गुप्त" संस्था या देशांत आहेत. आज अनेक भजनी मंडळे नि आखाडे बोटभरहि चिठ्ठी न छापतां आणि सभा, मत नोंदणी, नियम दुरुस्ती, मतभेद, आयव्ययाला मान्यता, वृत्तांत प्रसिद्धि इत्यादि आधुनिक संस्थांचे 'सोहाळे' न करतां चालल्या आहेत. करपात्री स्वामींचा धर्मसंघ, यात्रेकरूंची व्यवस्था करणारी काळीकमळीवाल्यांची संस्था, जागोजाग वार्षिक यात्रेकरूंच्या व्यवस्था करणाऱ्या ठरीव संघटना या सर्व 'घटना, नियम, प्रसिद्धि' इत्यादि अधुनिक बोभाटाचावांचून चालू आहेत. हीच प्राचीनपद्धति संघानें उचलली. त्याचें ज्यांना कौतुक वाटत नाहीं त्यांची मैदानी भाषणांतील "भारतीय संस्कृति" ची स्तुति आंधळेपणानें लोकांना केवळ झुलविण्यासाठी असते असें कां म्हणूं नये ?

## संघाचा आदर्श

छापील संसारापासून संघ प्रथमपासून अलिप्त राहिला तो कांहीं 'गुप्त' पणासाठीं नव्हे ; कारण संघाचे बहुतांश कार्यक्रम उघड्या मैदानावर चालतात. सामारंभिक कार्यक्रमांना प्रेक्षक म्हणून येण्यास मुक्तद्वार असतें. संघाची शिबिरे चालवण्यास व संघाचें इतर कार्यक्रम चालविण्यास 'लोकाश्रय' अनेक प्रकारे लागतो. कायदेशीर सत्ता कोणतीच नसतांना असा आश्रय मिळवावयाचा तर लोकांना संघाचें कार्य समजून व पटवून दिल्यावाचून तो आश्रय मिळणें शक्य नाहीं, यामुळें संघाला समाजाशी मिळून–मिसळुन चालावें लागते. संघाकडून गुप्त रित्या भयानक कृत्यें झाली असती तर सर्वसामान्य शांततावादी जनसमाजाचा पाठिंबा त्यास इतका भरघोस

मिळालाच नसता. म्हणून खून–दरवडे यांसारखीं घोर कृत्यें करण्याचें मनांत आणणे देखील संघाला संभवनीय नव्हते. गेल्या फेब्रुवारीत अनेक स्थानिक संघचालकांच्या नि स्वयंसेवकांच्या समक्ष त्यांच्या घरांवर सामुदायिक जाळ-पोळीचे आक्रमण चालूं असतां त्यांनीं कोठेहि काडीमात्र प्रतिकार केला नाहीं ! प्रथम तोंडी विनवणी केली व ती मानली गेली नाहीं तेव्हां "तुम्हांला काय करावयाचें तें करा. आम्ही त्याला काडीचाहि प्रतिरोध करणार नाही," असें क्षुब्ध समुदायाला सांगून संघाधिकारी बाजूस झाले ! गांधीजींची शिकवण मोठ्या प्रमाणावर आचरणात आल्याचे खरे ठळक नमुने कोणी गोळा केले तर त्यांत संघाच्या या नमुन्याची वरच्या क्रमांकांतच गणना करावी लागेल !

## स्टॅलिनचे हिंदी अवतार

आतां बंद नि विसर्जित झालेल्या संघाचे "लोक" गुप्तपणें संघाचे कार्यक्रम करतात अशी ओरड चालू झाली आहे. ती ऐकून आम्हांस आमच्या कांहीं पूर्वग्रहांत दुरुस्ती करावी लागणार आहे. मतविरोधी लोकांवर खटले भरून क्रमशः त्यांचें जिवानिशी निर्मूलन करणाऱ्या स्टॅलिनला आम्ही 'राक्षसी' समजत होतो. पण ती इच्छा पूर्णपणें 'मानवी' आहे अशी संघा-विरुद्ध उसळलेल्या हिंदुस्थानांतील 'मानव्या'चें प्रदर्शनावरून आमची निश्चिति झाली ! तसेंच 'हीन' मानलेल्या जातींत जन्मला तो आमरण हीनच समजला पाहिजे या जुन्या कल्पनेवरील आमचा रागहि बराच कमी झाला ! कारण तोहि आतां मानवी प्रकारच आम्हांस वाटूं लागला आहे. संघ विसर्जित झाला तरीहि भूतपूर्व संघीय व्यक्तीना संघीयत्व चिकटून जिवंत राहते अशा कल्पनेनें आज मानवधर्मीय गांधीनिष्ठ वृत्तपत्रांतून निंदा-त्मक लिखाण येत आहे.

वृत्तपत्रांतून संघावर हवें तें लिहावें; त्याला सरकार कांही मर्यादा घालित नाहीच; पण जनलज्जेचीहि मर्यादा त्याला उरली नाही. त्याचे नमूने पहा . "संघाचे लोक संध्याकाळच्या अंधारांत (मध्यरात्रींच्या नव्हे) अद्याप शिवाजी उद्यानासारख्या सार्वजनिक स्थळीं वर्तूळें करून बसतात, प्रचलित विषयांची चर्चा करतात !" हें एक संघाच्या 'गुप्त' कार्यक्रमाचें वर्णन मुंबईच्या एका इंग्रजी दैनिक पत्रांत आलें होतें. केवढी ही भयानक गोष्ट ! ती उजेडांत आणल्याबद्दल गृहमंत्र्यांनी या वार्ताहराला प्रकटपणे सुव-

णंपदक द्यावें! ही मंडळी संध्याकाळीं एकत्र जमून चित्रपट तारकांच्या अंतः-पुरांची नि धांवत्या विवाहांची चर्चा न करतां प्रचलित राजकारणाचीं चर्चा करतात हा केवढा तरी त्यांचा अपराध! स्वातंत्र्य मिळाल्यावर आता केवळ राजयंत्राची स्तुतीस्तोत्रें किंवा कलाविलासादि गोष्टी लोकांनी बोलाव्या. त्याऐवजी प्रचलित राजकीय गोष्टी एकत्र बसून चर्चिणें हा केवढा तरी स्वातंत्र्य धोक्यांत आणण्याचा दुष्ट उद्योग जन्मजात संघीयांनी चालविला आहे!

## नवी 'गुन्हेगार' जात

अशा रीतीने संघावर चालू असलेल्या कांहीं आक्षेपांचा निरास करण्याला उपरोधिक विडंबन हीच एक पध्दति उपलब्ध आहे. गंभीरपणे त्याचा प्रतिवाद करूं म्हटले तरीहि त्यांतून विनोदच निर्माण होण्याचा संभव. सरकारने बंदी केली, गुरुजीनी संघ-विसर्जन केलें; तरीहि भूतपूर्व संघीय व्यक्तींच्या कपाळावर संघीयपणाची तप्तमुद्रा संघाच्या हितशत्रूंनी कायमची ठोकलेली दिसते. या लोकांचे आक्षेप टाळावयाचे तर भूतपूर्व संघीय मंडळींनी आता आपण एक गुन्हेगार जात ठरलेलो आहोंत असें समजून वागावयास पाहिजे. रस्त्यांतून जातांना समोरासमोर आल्यास त्यांनीं एकमेकांचीं तोंडें चुकविलीं पाहिजेत! संघाने ज्या मुलांना नियमितपणे सायंकाळीं क्रीडांगणावर खेळ खेळण्याची संवय लावली त्या मुलांनी आता ते खेळ क्रीडांगणावर खेळणें म्हणजे लगेच संघाचा 'गुप्त कार्यक्रम' होतो! आतां त्यांनी म्हाताऱ्यांप्रमाणे घरी बसून 'ब्रिज' खेळावे किंवा झकपक पोषाक करून सामुदायिक आकर्षणासाठी फिरण्याची उद्यानें अथवा रस्ते यांच्यांत खुशाल विहार करावा. कारण आता स्वातंत्र्य आलें! पूर्वी राजद्रोहाची शिक्षा भोगून आलेल्या माणसाला रस्त्यातून जाताना त्याचे जुने स्नेही अथवा ऋणानुबंधी लोक घाबऱ्याघाबऱ्या तोंड चुकवीत असल्याचा अनुभव येई; कारण सरकारी गुप्तचरांपैकी एखाद्याने हा साध्या स्नेहाचा किंवा ओळखीचा प्रकार पाहिला तरी नोकरीवर किंवा पेन्शनवर गदा यावयाची भीति होती. आता स्वकीय सरकारच्या आणि त्याच्या पाठीराख्या वृत्तपत्रांच्या स्वयंभू गुप्तचरांची अशीच भीति भूतपूर्व संघीयांनी बाळगावी अशी या प्रकरणातील अनेक आगलाव्यांची इच्छा आहे, असें स्पष्ट दिसतें.

केसरी २३-११-४८

# आधी फांशी .... मग चौकशी

(लेखांक ३ रा)

### संस्था-व्यक्ति-विवेक

एखाद्या छापखान्याला किंवा वृत्तपत्राला कांही विशिष्ट आक्षेपार्ह मजकूर छापल्यामुळे बंदी झाली आणि त्या वर्तमानपत्राचा उरलेला कागद विकत घेऊन कोणी दुसरें वर्तमानपत्र काढलें किंवा त्या बंदी झालेल्या छाप-खान्याचे खिळे दुसऱ्या कोणी विकत घेतले तर त्या गोष्टीचा डोळयांत तेल घालून सुगावा काढून तें वर्तमानपत्र किंवा तो छापखाना गुप्त रीतीने चालू आहे असें म्हणण्याचा अप्रयोजकपणा कोणी करीत नाही. मार्गावरील विशिष्ट संघर्ष -- स्थान टळावें म्हणून, पायीं सामुदायिक यात्रेला बंदी झाली असतां तेच लोक आगगाडीच्या डब्यांतून जातात. अशा एका डब्या-च्या खिडकींतून आंत डोकावून ' ही पहा बंद केलेली यात्रा गुप्तपणे चालू आहे' असें कोणी म्हणत नाही. संघाचे गुप्त कार्यक्रम चालू आहेत अशी ओरड करणारें लोक याच नमुन्याचा अप्रयोजकपणा करीत आहेत. विस-र्जित रझाकारसंस्थेचे कांही घटकहि माणसाळण्याची निश्चिती करून घेऊन निजामशाहींत मोकळे सोडण्यांत येत आहेत. शांत असलेल्या संघीयां-संबंधी मात्र अशा प्रकारचें तारतम्य दाखवण्यांत येत नाही.

## संघीय व्यक्तींचा द्वेष

एखाद्या लोकोपयोगी संस्थेमध्ये अनेक कार्यकर्ते जमतात. ती संस्था जर कांही कारणाने बंद झाली तर त्यांतले लोक आपली मूळ देशहिताची बुद्धि ही कांही त्याबरोबरच विसर्जन करीत नाहीत, तर निराळया मार्गाने देशहिताचे उद्योग आरंभतात. उदाहरणार्थ, महाराष्ट्रांत असहकारितेच्या चळवळींत जन्मास आलेल्या ज्या राष्ट्रीय शिक्षण – संस्था कालांतराने बंद पडल्या, त्यांतील लोकांनी बाहेर नतर काय केलें, याचा इतिहास पाहिला तर ही गोष्ट कळून येईल. वृत्तपत्र – व्यवसाय, पुस्तक – लेखन आणि प्रकाशन, व्यायामशाळा, आश्रम, विद्यार्थि — वसतिगृहें किंवा आरोग्यालयें अशा अनेक संस्था या राष्ट्रीय शाळांमधून बाहेर पडलेल्या शिक्षकांनी काढ–लेल्या आहेत. तीच गोष्ट थोडयाफार अंशाने १९०७–८ सालच्या दडप–शाहींत बंद झालेल्या राष्ट्रीय शिक्षण –– संस्थांतील लोकांनी केलेली आहे. अर्थात् जर त्याच राष्ट्रीयशिक्षण – संस्थेतल्या शिक्षकाने व्यायामशाळा काढली तर पूर्वीच्या ओळखीने पूर्वीच्या त्याच्या विद्यार्थ्यांचें सहाय्य व्यायामशाळेस होईल. राष्ट्रीय शिक्षण संस्था बंद करणाऱ्या ब्रिटीश सरका–राने देखील त्यांतील शिक्षक बाहेर पडल्यानंतर त्यांनी केलेल्या इतर सार्वजनिक कार्यांचें वैषम्य मानले नाही संघावर बंदी होऊन दोन –– तीन महिने गेल्यावर त्यांतील कार्यकर्ते अर्थातच दुसरे जनसेवेचे उद्योग पाहूं लागले. कोणी वृत्तपत्रें काढलीं, कोणी चालू वृत्तपत्रांत जागा पत्करल्या, कोणी विद्यार्थ्यांतून खेळाची आवड तरी चालू राहावी म्हणून क्रीडामंडळें काढलीं. ज्यांचा सार्वजनिक कार्याचा जिव्हाळा हेंच जीवन –– ध्येय होतें असेच निष्ठावान लोकसेवक रा स्व संघामध्ये एकत्र झाले होते ही गोष्ट यावरून सिद्ध होते. पण ज्यांना संघ ही गुन्हेगार जात ठरवावयाची आहे त्यांना हे संघीयांचे नवे उद्योगहि हाणून पाडावयाचे आहेत; आणि म्हणू–नच " संघाच्या गुप्त हालचाली चालू आहेत " इत्यादि ओरड त्यांनी सुरू केलेली आहे. ही अत्यंत खुनशीपणाची, व्यक्तीविद्वेष आणि राष्ट्रकार्य–घातक अशी ओरड आहे.

# या चर्चेचे हेतू

संघावरील बंदी झाल्यानंतर संघविरोधी काँग्रेसनिष्ठांतून संघाबद्दल खोटा प्रचार गेले चार-पांच महिने चालू आहे. बंदी उठविण्याबाबत सरकारशीं संघीयांचें बोलणें चालू आहें असें समजल्यावरून या खोटयां प्रचाराचा प्रतिवाद करण्याचें काम पुढे करतां येईल या हेतूनें आम्ही या संबंधांत स्तब्ध राहिलो होतो. आमच्या कोणाच्याही लिहिण्यानें या सरकारी हृदयपालटाच्या प्रयत्नांत बाध येऊं नये ही इच्छा अशा रीतीनें स्तब्ध राहण्याचे कारण होतीं. या गोष्टीचा एकदां सोक्षमोक्ष झाल्यावरच, मध्यन्तरीच्या काळांत मोकाटपणें संघावर जें अन्यायाचे आरोप केले जात होते. त्या संबंधीं आपले विचार मांडावे असा आमचा संकेत होता, तदनुसार आता यथा काल आम्ही हे सर्व मनांत ठेवलेले विचार या लेखमालेच्या द्वारे प्रकट करीत आहोंत. त्यांतील हेतु संघाचें लवकरच पुनरुज्जीवन होईल असा मुख्यत: नाहीं; कारण सध्याच्या सत्ताधाऱ्यांची आणि त्याच्या बाहेरील पाठीराख्यांची मनोवृत्ति पाहतां नजीकच्या काळांत संघाचे पुनरुज्जीवन शक्य होईल असें आम्हांस वाटत नाहीं. पण निदान संघाच्या कार्यक्रमांतील जें आक्षेपरहित आणि उपयुक्त भाग होते ते सुटकरीत्या, स्वतंत्रपणें अथवा इतर मान्य संस्थामार्फत कोणी चालविले तर त्यावर नसतें सशय घेऊन कोणी शस्त्र धरूं नयें आणि संघीयांची देशहितबुद्धि इतर रीतीनें उपकारी होण्याच्या पंथाला लागली असेल तर केवळ दूषित पूर्वग्रहाने त्यांच्यावर आघात होऊं नयेंत, हा या लेखमालेचा एक उद्देश आहे. दुसरा उद्देश असा कीं, लोकशाही आणि नागरिक अधिकार यांच्या जगमान्य तत्त्वांपासून च्युत होऊन स्वकीय सरकारने कांहीं भावनावशतेनें आणि कांहीं बाहेरच्या खोडसाळपणाच्या प्रेरणेनें हुकुमशाही करीत सुटूं नये असें आम्हांस वाटतें या गोष्टीचे तारतम्य जनतेच्या नीट ध्यानांत येण्यास रा. स्व. संघावरील बंदीची साधकबाधक चर्चा ही उपयुक्त ठरणारी आहे अशी आमची समजूत आहे. हा दुसरा उद्देश होय. वृत्तपत्रकार या नात्यानें जेथे अन्याय दिसत असेल तेथें तो उघडपणे लोकांच्या पुढें विशद करून मांडणें या सर्वसामान्य कर्तव्याची जाणीव होहि या चर्चेच्या मुळाशी अर्थात् आहेच.

## पश्चात् बुद्धीचा अपुरेपणा

" आधी फांशीं......मग चौकशी ! " हां जो मथळा आम्ही दिला तो ' फ्री प्रेस ' ' नवशक्ती ' इत्यादी वृत्तपत्रांनी सरकारजवळ असलेला पुरावा आता तरी पुढें यावा अशी आडपडद्यानें बिचकत बिचकत जाणीव व्यक्त केली त्यावरून. पण नुसता पुरावा पुढें यावा ही इच्छा देखील पूर्ण चौकशीची द्योतक नाही. जर ' फ्री प्रेस ' ने असें म्हटलें असतें कीं, सरकारी पुरावा पुढें यावा आणि त्याचा प्रतिवाद करण्याची संघीयांना संधि मिळावी तर ती संपूर्ण न्यायबुद्धि झाली असती. पण तशी न्यायबुद्धि या वृत्तपत्रांनीं व्यक्त केलेली नाही. संघाला संस्था या नात्याने फांशी दिल्यावर आणि ती शिक्षा कायम केल्यावर मागाहून निदान चौकशीचा एक भाग म्हणजें फिर्यादी पक्षाच्या वकिलाचें आरोप पत्रक आणि त्याचा पुरावा एवढा तरी आता पुढें यावा एवढीच ही पश्चात्बुद्धि आहे. तीहि संघावर अन्याय झाला त्याचें निराकरण व्हावे म्हणन पुढें आलेली नाही ! झालेलें सर्व न्याय्यच झाले असें त्यांचें मत; पण संघीयांना ' हौतात्म्य ' मिळू नये हीच काय तीं त्यांची मुख्य काळजी ! म्हणजे पुरावां पुढे न करतांहि फांशी दिलेल्या संस्थेचें मृत्युलेख देखील गौरवपर होऊं नयेत ही त्यांच्या मनांत राहिलेली खुमखुम. पण ही अर्धवट पश्चात्बुद्धि एका गोष्टीचे स्पष्ट गमक आहे. ती ही की, संघ बुडाल्याबद्दल आनंद मानणाऱ्या या सर्व लोकांजवळ संघावर सरकारनें प्रथम केलेल्या भयंकर आरोपांच्या संबंधांत यत्किंचित्हि पुरावा नाहीं; कारण तो असता तर त्यांनीं त्यांच्या वृत्तपत्रांतून दिला असता व त्या पुराव्याची भिक्षा सरकारजवळ मागण्याची पाळी त्यांच्यावर आली नसती.

## चतकोर मागणीहि अमान्य

दुर्दैव असे आहे की, सरकारला संघबंदीच्या कामी प्रोत्साहन देणारे लोक देहान्त शिक्षेनंतरहि जो चतकोर न्याय मागतात तोहि आता त्यांच्या सरकारजवळ शिल्लक उरलेला नाहीं. गुरुजीनी पं. नेहरु आणि सरदार पटेल यांच्याशी केलेला या संबंधांतील पत्रव्यवहार आतां प्रसिद्ध झाल्यानें ही गोष्ट स्पष्ट होत आहे. तों प्रसिद्ध झाल्यानंतर त्याच्यापुरतांच लेखाला मथळा द्यावयाचा तर " फांशी गेलेल्या संस्थेला चौकशीचा चतकोर भाग म्हणजे

जो आरोपांचा पुरावा तेवढाहि पुढें येण्याची आशा उरली नाही." अशा अर्थाचा कांहीं तरी मथळा द्यावा लागेल. चतकोर भाग आम्ही म्हणतो याचें कारण असें कीं, कोणत्याहि चौकशीमध्यें आरोप करणारांचे निवेदन आणि पुरावा हा एक भाग, त्या पुराव्याची छाननी करण्यास आरोपिताला संधी देणें हा दुसरा भाग, स्वतंत्र रीत्या अगर इतर रीत्या त्या आरोपांचा निरास करण्यास आरोपीस संधी देणें हा तिसरा भाग आणि हे सर्व त्रयस्थ न्यायाधिशानें तोलून निर्णय करणें हा चौथा भाग होय. शिक्षा कायम झाल्यानंतर या चार भागांपैकी पहिला भाग तरी प्रकट व्हावा अशी 'फ्री प्रेस'ची इच्छा ! पण सरकार त्याच्याहि पुढें जाऊन तेवढाहि चतकोर तुकडा जनतेपुढें टाकण्यास सिद्ध नाहीं किंवा तसें कांहीं आपले कर्तव्य आहे ही जाणीवहि त्यांच्या गांवीं नाहीं.

## विवेकबुद्धीचें विसर्जन

या बाबतींत कित्येक विरोधकांना साधा विवेक राहिलेला नाहीं किंवा त्याचें हेतु पूर्वक विसर्जन करण्यांत आलें आहे असें दिसतें. संघबंदीच्या पहिल्या सरकारी पत्रकांत स्पष्ट म्हटलें होतें कीं, संघाचे जे उघड उद्देश आहेत ते सरकारला मान्यच आहेत. अर्थात् हे उघड उद्देश सोडून तद्व्यतिरिक्त इतर कांही आक्षेपार्ह गोष्टी संघाने केल्या असा आरोप, कांही पुरावा पुढें न करतांच सरकार करीत आहे. शारीरिक शिक्षण, शिस्तीची चाड, आपलें व्यक्तित्व विसरून सामुदायिक हितासाठी समाजाशी एकजीव होणें या हेतूनें संघाचे जे सोज्वळ कार्यक्रम चालू होते ते भूतपूर्व संघीयांनी संघाचीं चिन्हें न घेतां आणि प्रार्थनादि विधी न करतां केले तर कित्येकांचें माथें फिरतें याला काय म्हणावें ? या मामुली गोष्टीसाठी कां संघ बंद झाला ? "इंग्रजांच्या दुष्ट राज्यपद्धतीचा द्वेष करावा पण इंग्रज व्यक्तीचा द्वेष करूं नये" ही शिकवण ज्या देशांत गांधीजींनी आजन्म दिली तेथें संघ विसर्जित झाल्यावर त्यांतील व्यक्तींचाहि द्वेष चालू ठेवणाऱ्यांचें सार्वजनिक जीवनांत प्राबल्य होतें हें विलक्षण नव्हे काय ? चांगलें कोणते आणि वाईट कोणते याचा, निदान सरकारी पत्रकांत छापून आलेला तरी, विवेक या लोकांनी ठेवूं नये हें आश्चर्य होय !

## नमुनेदार आक्षेप

यांपैकी एका निंदकानें म्हटलें आहे की, 'गुरुजी' हें उपपद हिटलरच्या 'फ्युहरर' या उपपदाशीं समानार्थक आहे मग असें लिहिण्याच्या द्वेषमूलक भरांत, 'सानेगुरुजी व आपटेगुरुजी हे कोणत्या नाझी पंथाचे फ्युहरर?" असा प्रश्न कोणी विचारील याचेंहि त्यांना भान राहिलें नाहीं! दुसऱ्या एकाने संघावरील बंदी उठविणे म्हणजे पं. नेहरूंचें अनुयायित्व सोडून गोळवलकर गुरुजींचें अनुयायित्व देशानें करण्यासारखें आहे असें म्हटले आहे. या गोष्टी म्हणतांना, संघावरील बंदीं ही कांही गुन्हेगारीच्या घोर कृत्यांचा आरोप करून झालेली आहे ही गोष्ट हे लोक पूर्णपणे विसरून गेले आहेत. ती गुन्ह्यांची यादी हे केवळ दाखवावयाचे शोभेचे दात होते; पण खरी बंदी संघाची विचारसरणी मारण्यासाठी झाली असें गृहीत धरून हे सर्व आक्षेप चालू आहेत! या आक्षेपांनी हे लोक सरकारला पाठिंबा देऊं इच्छित असतील कदाचित्; पण परिणाम दृष्टचा ते आपल्या प्रिय सरकारलाच अप्रामाणिक ठरवीत आहेत, याचें त्यांना भान नाही. या लोकांचा विवेक गाधींजींच्या चितेच्या धुरामुळे मलिन झाला असें वाटून ती गोष्ट आम्ही कांहीकाल क्षम्य समजत होतों; गांधीसारख्या महान् नेत्याचा वध थोडांवेळ विवेक नि दुःखदग्धीकाचा तोल सुटल्यास तो क्षम्य मानण्यासारखी असामान्य घटना होती; पण आता त्या चितेंतील चंदनाबरोबर कांही लोकांच्या विवेकाचीहि रक्षा झाली की काय असें आम्हास वाटुं लागलें आहे.

संघावरील बंदी याच लोकांनी खरोखर आता चालू केली आहे; आणि सरकार हें केवळ निमित्तमात्र आहे; कारण प्रांतिक मतप्रदर्शनावरून प्रांतिक सरकारें बंदी चालू ठेवा असें म्हणू लागली. म्हणूनच मध्यवर्ती सरकारांत बंदी उठविण्याबद्दल जी काय अत्यल्प अनुकूलता होती तीहि या प्रांतिक दडपणाने नाहीशी झाली. या क्रमाने गोष्टी चालल्यास या देशांतील लोकशाहीचा खेळखंडोबा होऊन निर्भेळ हुकुमशाही येथे प्रस्थापित होण्यास फारसा अवधि लागणार नाही. संघाची संघटना गेली तरी संघाची ध्येयें आणि विचारसरणी ही मात्र अशा नुसत्या दडपशाहीने नाहीशी होणें शक्य नाही. त्या विचारसरणीमध्ये जर कोणाला दोष वाटत असेल तर तो त्यांनी मत-

परिवर्तनाच्या लोकशाहीला मान्य असलेल्या पद्धतीने खुशाल दाखवावा. या विचारसंघर्षात जें योग्य असेल तें टिकेल. संघाच्या ध्येयाच्या टिकाऊपणावर ज्यांचा विश्वास आहे ते भारतीय संस्कृतीच्या तत्त्वज्ञानानुसार म्हणतील की संघाच्या संघटनेचा देह जरी नष्ट झाला किंवा अंतर्धान पावला तरी संघाचा उज्ज्वल ध्येयवाद व नागरीक चारित्र्याचें आदर्श शिक्षण, या गोष्टी आत्म्याप्रमाणे अमरच राहणार आहेत.

—केसरी दि. २६–११–४८

---

# राष्ट्रीय पापांचें तीर्थक्षालन

गेल्या आठवडयांत दि. २५ व दि. २७ ला सरदार पटेल यांना काशी आणि प्रयाग या दोन प्राचीन भारतीय तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणीं बनारस हिंदु विश्वविद्यालय आणि अलाहाबाद विश्वविद्यालय यांजकडून ' डॉक्टर ऑफ लॉज ' ही उच्च पदवी देण्याचे समारंभ झाले. या दोन्हीहि प्रसंगीं सरदारांनी जीं भाषणें केलीं तीं मामुली प्रासंगिक स्वरूपाची नसून आत्मनिवेदनपर आणि मागील पिढीचा जिव्हाळयाचा निरोप पुढील राष्ट्रपिढीला सांगून ठेवण्याच्या तळमळीने भरलेलीं अशीं झाली. क्षेत्राच्या ठिकाणीं आयुष्याच्या पापपुण्याची झडती द्यावी लागते असें म्हणतात; किंवा रोम येथें जाऊन मोठ्या धर्मगुरूपुढे आपल्या आयुष्यांतील प्रमादांचें क्षालन करण्यासाठी धर्मनिष्ठ ख्रिस्ती लोक आत्मनिवेदन करीत. तशाच प्रकारचें आपल्या एकंदर राष्ट्रीय आयुष्याचें प्रांजळ आत्मनिवेदन सरदार पटेल यांनीं या दोन भाषणांतून केलें आहे.

## सरदारांची स्पष्टोक्ति

या आत्मनिवेदनांत स्वातंत्र्य मिळाल्यानंतरचें पहिलें वर्ष या नात्याने गेल्या वर्षांत घडलेल्या गोष्टींना विशेष महत्त्व पटेलांनी दिलें हें साहजिकच

होय. सरदार हे स्पष्टवक्तेपणाबद्दल प्रसिद्धच आहेत; दोन्हीहि क्षेत्रांतील भाषणांमध्ये प्रथमच सरदारांनी सांगून टाकलें कीं, " विश्वविद्यालयाकडून विद्वत्ताविषयक पदवी घेण्याच्या वेळीं साजेलसें विद्वत्तापूर्ण भाषण न करतां एक साधा रोखठोक बोलणारा मनुष्य म्हणून मी बोलणार आहे." याप्रमाणे त्यांनी गतवर्षांतील आणि चालू देशस्थितीसंबंधाच्या कित्येक गोष्टी कोण-ताहि आडपडदा न ठेवता सांगितल्या. कांग्रेसचें आणि सध्याच्या राज-वटीचें दोषदर्शन करणारे लोक जें अनेक मुखांनी म्हणतांना आज दिस-तात, तें सर्व सरदार पटेल यांनी एकमुखानें तितक्याच स्पष्टपणे सांगितलें. आज लोकांमध्ये स्वराज्याला घातक अशा ज्या अनिष्ठ प्रवृत्ति दिसतात त्यांचेंहि निर्भीड दिग्दर्शन केलें आणि आपल्या मताप्रमाणे सध्याच्या परि-स्थितींतून उन्नतीकडे जाण्याचे मार्गहि त्यांनी सांगितले.

सध्या चालू आहेत त्या सर्व घटना यथायोग्य रीतीने चालू आहेत अशी एक प्रकारची भोळसर समाधानी वृत्ति उत्पन्न करणें म्हणजेच काय तें प्रचलित सरकारचें पाठीराखेपण करणें असा विचित्र अर्थ ज्या लोकांनीं डोक्यांत घेतलेला आहे त्यानी सरदारांच्या या भाषणांचें मननपूर्वक वाचन करावें, म्हणजे त्यांचा बराच भ्रमनिरास होईल अशी आमची समजूत आहे. ज्याप्रमाणे पंडित नेहरूंची मद्रासकडील भाषणें तात्त्विक दृष्टीने महत्त्वाचीं होतीं, तशींच आज जो संकीर्ण व्यवहार आवरण्याचें काम राष्ट्रावर येऊन पडलें आहे तें नीट रीतीने पार पाडण्याच्या दृष्टीनें सरदार पटेल यांचीं हीं दोन भाषणें महत्त्वाचीं ठरतील.

## सौदा महाग पडला

बनारस येथे केलेल्या भाषणांत सरदार पटेल यांनीं सांगितलें कीं, " आपणांस स्वातंत्र्य हवें असेल तर फाळणीला मान्यता देणें अटळ होतें. ती फाळणी मान्य केली नसती तर देशाचे असंख्य तुकडे झाले असते. हा निर्णय मुख्यतः आपण प्रथम घेतला व नंतर इतरांना मान्य करण्यास लावला. " यावरून फाळणी हें स्वातंत्र्याचें मूल्य दिलें आणि ती पत्करल्या-मुळे स्वातंत्र्य मिळालें हा श्री. न. वि. गाडगीळ यांनी सांगितलेला कार्य-कारणभाव साधारण होता असें दिसतें. फाळणींतून भयानक गोष्टी निर्माण झाल्या हें पटेलांना मान्यच आहे. पण फाळणी पत्करली नसती तर

त्यापेक्षाहि कल्पनातीत आपत्ति हिंदुस्थानावर आल्या असत्या असें पटेल यांचें म्हणणें आहे. याचा अर्थ दोन वाईट गोष्टींतील त्यांतल्या त्यांत कमी वाईट गोष्ट उचलावयाची असा बिनतोड प्रश्न त्यावेळीं सरदार पटेलांसारख्या राष्ट्रधुरीणापुढे होता. मात्र कमी वाईट म्हणून जें पत्करलें त्याच्या परिणामांचा नीट अंदाज त्याना झाला नाही. एरवी पंजाबमधील भयानक संघर्ष आणि सिंध व पूर्व बंगालमधून अद्यापि चालू असलेलें बिगर मुसलमानांचें निर्वासन या गोष्टींचा अनपेक्षितपणा वेळोवेळीं सरकारी प्रवक्त्याकडून प्रकट झाला नसता. पहिलें अनपेक्षित घडल्यानंतर तरी तत्स-दृश इतर 'अनपेक्षितें' कोणकोणतीं ओढवणार याचा तात्काल अंदाज करून त्यांनी त्यांची व्यवस्था योजावयास पाहिजे होती; पण तसें झालें नाही. एरवी आज पूर्व बंगालमधून चाललेलें निर्वासन म्हणजे जणूं काय एखादें अचानक उद्‌भवलेलें वादळ असें मानण्याची सरकारी प्रवक्त्यांची प्रवृत्ति दिसते तशी दिसली नसती. फाळणी पत्करून स्वातंत्र्यप्राप्ति हा सौदा ज्यांनी केला व जे स्वातंत्र्य–उत्सवांत तोंडे उजळ करण्यास पुढे झाले त्यांनी आता कमरा कसून या निर्वासितांच्या प्रश्नाची योग्य निरवानिरव करणें प्राप्त आहे.

## टीका, सरकार सुधारण्यासाठीं असते.

त्याच भाषणांत सरदारजींनी म्हटलें आहे की, "सरकारवर नुसतीच टीका करूं नका कारण हें सरकार तुमचेंच आहे. तुम्हांला ते काढून दुसरें केव्हांहि आणतां येईल." पण हें सरकार बदलावयाचें तर त्याचे दोष दिस-ल्या शिवाय हा बदल कसा घडून येणार ? आज लोकशाहीचें तंत्र देशाने पत्करलेलें आहे आणि असें लोकशाही सरकार बहुसंख्य लोकांना नापसंत वाटलें तरच तें बदललें जाण्याचा संभव, एरवी तें आपण होऊन जात नाही. सरकार चुका करतें ही गोष्ट सरदार पटेल यांनी मान्य केली. मग या चुका वेळोवेळीं सरकारच्या आणि लोकांच्याहि निदर्शनास आणणें हें काम लोक-शाहीच्या तंत्राला अत्यंत आवश्यक आहे. ही टीका केवळ सरकार बदलण्या-साठींच हवी असते असेंहि नव्हे, तर सुधारण्यासाठीहि हवी असते. डोळस रीतीनें सरकारी धोरणाच्या इष्टानिष्टतेची छाननी करणारी जनता ही

लोकशाही राखण्यास अत्यंत अवश्य आहे. लोकांकडून अशी टीका झाल्याने सरकारचे हात सबळ होत नाहींत असें दाखविलें जातें, पण तें खरें नाहीं. हैद्राबादचा प्रश्न त्वरेने सोडवला पाहिजे असें अधीर लोकमत प्रकट झालें. तें होतांना अर्थातच सरकारच्या तत्पूर्वीच्या चालढकलीवर टीकाही झाली. पण यामुळेच शेवटीं जो त्वरेने निजामीत हस्तक्षेप केला तो करण्यास सरकारला बळ आलें नाहीं काय? काश्मीरचा प्रश्न यूनोपुढें नेण्यांत झालेली चूक टीकाकारानी दाखविली, यामुळेंच हैद्राबादचा प्रश्न तेथें येऊं द्यावयाचा नाही हा निग्रह पक्का होण्यास सहाय्य झालें हें मान्य करावयास पाहिजे. 'सरकारचे हात सबळ करा' याचा अर्थ सरकारच्या चुकांकडे डोळेझांक करा असा करणें चुकीचा होय. तसा तो केल्यास सरकारचे हात खरे सबळ होणार नाहीत.

पूर्वी स्वराज्यासाठी चळवळ करतांना असें प्रतिपादन केलें जात असें कीं, आम्हांस चुका करण्यासाठीहि स्वराज्य हवें, आम्ही चुका करूं त्या आमच्या आम्हीच निस्तरूं आणि अशा चुका दुरुस्त करीत आणि त्या पासून धडे घेत आम्ही आमची उन्नतीच करुन घेऊं सरदार पटेल यांनीहि सांगितलें की, आम्ही आमच्या चुकापासून धडे घेतले पाहिजेत. त्या चुकांचाच आग्रह धरुन चालतां उपयोगी नाही. सरदाराचे हे वाक्य सर्वच मंत्र्यांनीं नि अधिकाऱ्यानी ध्यानात घ्यावें. परकी नोकरशाही खोटया इभ्रतीला बळी पडून आपल्या चुकांचेहि हट्टानें समर्थन आणि दृढीकरण करीत असे. ती गोष्ट स्वराज्यांत होऊं नये. दुर्दैवानें चुका करणें हा जसा मनुष्यस्वभाव आहे, तसाच त्या मान्य न करतां त्या तशाच चालू ठेवणें हाहि मनुष्यस्वभाव आहे. पण आत्मपरीक्षणाची दृष्टि सतत जागृत ठेऊन राज्यसूत्रधारांनी या दुसऱ्या सामान्य मनुष्यस्वभावाला बळी न पडतां कांही तरी असामान्य बनलें पाहिजे.

ही सुधारणा होण्यास सरदाराचे प्रयाग येथील भाषण विशेष उपयोगी पडणारें आहे. राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय या दोन्ही क्षेत्रांत राष्ट्राला शक्तीची आवश्यकता कशी आहे आणि ही शक्ति राष्ट्रांत उत्पन्न करण्यासाठी आपण काय केलें पाहिजे यासंबंधी त्यानी मार्गदर्शन केलें. संस्थानें हिंदुस्थानांत आणलीं या गोष्टीबद्दल सरदाराना श्रेय देतान तें न नाकारतां

त्यांनीं सांगितलें कीं, "झाल्या गोष्टींत समाधान मानून बसण्यासारखी स्थिति नाही. विलीन झालेल्या संस्थानांतील अनेक भाग इतके मागासलेले आहेत की, त्यांना लोकशाहीच्या दृष्टीने स्वतंत्र हिंदुस्थानच्या समपातळीवर आणण्यासाठी पुष्कळच प्रयत्न व्हावयास पाहिजे."

काशी क्षेत्रांतील भाषणांत त्यांनी असें सांगितले की, "देशाच्या विच्छेदनानंतर ज्या आपत्ती आल्या आणि चूका झाल्या त्यांचा साक्षात् परिणाम महात्मा गांधींच्या वधांत झाला. जगापुढे लाजेनें खाली मान घालावी अशा आमच्या चुका झाल्या ; आणि गांधींजींचा खून करणारा मनुष्य आपल्यांतीलच एक निघाला हीहि अत्यंत लज्जास्पद गोष्ट झाली. या चूकांपासून आपण धडे घेतले पाहिजेत आणि त्याच त्या चुका करीत राहण्याचा आग्रह धरतां उपयोग नाही. सध्याचीं राष्ट्रांतील अनिष्टें पाहतां एकंदर परिस्थिती अशीं आहे कीं, या पुढे आपणांकडून दक्षतेने व्यवहार न घडल्यास अशी एखादी चूक होईल की, ज्यायोगे राष्ट्र अधोगतीच्या मार्गाला लागेल आणि तें त्यांतून वर निघू शकणार नाहीं." सर्वात महत्वाच्या मुद्याचा हा एक इशारा सरदारांनीं दिला.

## काश्मीरबाबतची चूक

आमच्या मते झालेंल्या कित्येक चुका अशा आहेत की, त्यांच्या परिणामांची परंपरा अजून संपली नाहीं. अर्थात नवीन चुका न करणें याबरोबरच जुन्यांचे परिणाम निस्तारणें ही गोष्टहि आज करावयाची आहे. फाळणीचे परिणाम अद्यापि राष्ट्राला भोंवत आहेत. तसेंच त्यानंतर काश्मीर प्रकरणांत आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडे म्हणजे 'यूनो' च्या सुरक्षा—समितीकडे धांव घेण्यांत जी चूक झाली त्यांतून अजून बाहेर पडतां आलेलें नाहीं. उलट त्या एका चुकीमुळें हैद्राबादचा प्रश्नहि कोणत्या तरी रीतीनें सुरक्षा-समितीपुढें आणण्याची पाकिस्तानची सारखी धडपड चालू आहे. सुरक्षा-समितीचे कमिशन हिंदुस्थानांत आल्यानंतर त्या कमिशनला पाकिस्तानचा खोटेपणा आणि त्याचें आक्रमण या दोन्हीहि गोष्टी दिसून आल्या तरी त्यांनीं त्याबद्दल त्याचवेळीं सुरक्षा-समितीला जागें केलें नाहीं. तसेंच या कमिशनचा वृत्तांत पाकिस्तानच्या विरुद्ध असतांना देखील अद्यापि "रामाय

स्वस्ति रावणाय स्वस्ति" असें संथपणानें बोलण्यापलीकडे सुरक्षा-समिति देखील कांहीं करावयास तयार नाही. हे तिच्या परवाच्या बैठकीवरून दिसून आलें. पुनः या कमिशनने हिंदुस्थानांत जाऊन पुनः सलोख्याचा प्रयत्न करावा असा तेथें ठराव झाला. यामुळे पाकिस्तानी प्रवक्त्यानी पुनः एकदां हिंदुस्थानाकडून नवेच आक्रमण जोरात चालू झाले आहे अशी ओरड चालू केली आहे. हैद्राबादचा प्रश्नहि तेथे उपस्थित केला, त्यावेळी हा प्रश्न तेथें आणण्यास आत्यंतिक विरोध दर्शवून हिंदी प्रतिनिधि उठून गेले, तरीहि सुरक्षासमितीची स्थितप्रज्ञता ढळली नाही! त्यानीं त्या प्रश्नावरील चर्चा पुढे ढकलली. म्हणजे पुनः ही एक टांगती तलवार हिंदुस्थानच्या डोक्यावर राहि-लीच. काश्मीर-प्रकरण सुरक्षा-समितीकडे नेण्यात झालेल्या चुकीमुळे हा एक दुसरा उपद्रव भरीस पडला आहे.

सरदार पटेल म्हणाले की, "गांधीजींनी व मी एकाच वेळी जग सोडण्याचें आपसात ठरवले होते गांधीजी गेल्यामुळे मलाहि त्यांच्या मागो-माग जावेसें वाटले. पण गांधीजींच्या प्रेरणेने त्या निश्चयापासून परावृत्त होऊन उरलेल्या आयुष्यात सध्याच्या आणीबाणीच्या प्रसंगी राष्ट्राची सेवा शक्य तितकी करण्याचें ठरवले." या त्यांच्या उद्गारांवरूनच त्यांची ही भाषणें कोणत्या मनोवृत्तीने आली आहेत हे दिसून येते. राष्ट्रीय तीर्थक्षेत्रात त्यानी राष्ट्रीय पुण्य तेवढें पदरात घेऊन राष्ट्रीय पापाचा इन्कार न करतां दोहोंचाहि झाडा दिला त्यातील पुण्यांश राष्ट्राच्या संपूर्णपणे पदरात पाडून घेणें आणि पापाची पुनरावृत्ति टाळणें या मार्गानेच राष्ट्राने गेले पाहिजे. तो मार्ग क्रमण्याच्या कामी सरदार पटेल यांचा प्रामाणिकपणा आणि मनोधैर्य यांचें अनुकरण राष्ट्रानें करणें अवश्य आहे.

--केसरी दि. ३०-११-१९४८

------

# साध्यानुकूल साधनविवेक

पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेंतील आणि मुंबईच्या अमर–हिंद व्याख्यानमालेतील आपल्या व्याख्यानांत आचार्य स. ज. भागवत यानीं लो. टिळकांच्या तत्त्वज्ञानात राहून गेलेला एक दोष किंवा अपुरेपणा दाखविला तो असा की, टिळकाच्या कर्मयोगामध्यें लोकसंग्रहाचें ध्येय साध्य करण्या-साठी जी साधने उपयोगांत आणावयाचीं त्यांच्या शुद्धाशुद्धतेचा नीट विचार झाला नाही. यामुळें पुढे वाटेल ती अशुद्ध साधनें वापरणाऱ्यांना टिळकांची साधन शुद्धीसंबंधाची उपेक्षा हा एक आधार सांपडला. तत्त्वज्ञानमंडनांत झालेल्या बीजभूत उपेक्षेमुळे टिळकांच्या नांवावर अशुद्ध साधनांचा उपयोग करण्याचा वृक्ष फोफावला.

## विकृत कर्मयोग्यांचा आधार

टिळकांच्या गीतारहस्याचा आधार घेऊन साधनांचा विवेक करणें हें दुर्बलतेचें लक्षण आहे असें मानणारे लोक महाराष्ट्रांत आहेत असें आचार्य भागवत म्हणतात; आणि त्यांना "घातक कर्मयोगी", "विकृत कर्मयोगी" व 'फॅसिस्ट' अशी विशेषणें ते देतात. या लोकांनी साधनांच्या शुद्धतेचा प्रश्न गौण ठरविला आणि गीतारहस्याचा आधार घेऊन साधनांची निर्द्व-द्वता व अवैध मार्ग यांचा पुरस्कार केला. गीतारहस्यांत देखील हा आधार

कसा मिळतो हेंहि आचार्यांनी सांगितलें तें असें:—टिळकांनी 'साधु पुरुषानें लोकसंग्रहासाठीं असाधु वर्तन केलें तरी चालेल' असें मत मांडले; आणि त्याचें समर्थन करतांना अशुद्ध साधनें हा समाजांतील अपूर्णतेचाच एक परिणाम आहे असें त्याचें कारण दिलें. त्याच गीता रहस्यांत साधु पुरुषानें साधु मार्गानें आपले कार्य साधले पाहिजे असेंहि लोकमान्यांनी सागितले. म्हणजे टिळकांचे विवेचन संदिग्ध आहे असेहि भागवत पुढें म्हणाले. टिळकांनीं दोन्ही मार्गांत संदिग्धता ठेवली आणि त्यांच्या अनुयायांनीं त्यापैकी सोयीचा तेवढा अशुद्ध मार्ग उचलला असा आचार्यांचा थोडक्यांत निष्कर्ष आहे.

हें मत मांडतांना टिळकांसारख्या थोर विभूतीवर मोठा दोषारोप करण्याचे युक्तीनें टाळून त्यांच्या अनुयायांवर खापर फोडण्याचे वैचारिक सौजन्य आचार्य भागवत यांनीं कां दाखविलें हें आम्हांस समजतें. पूज्य मानल्या गेलेल्या व्यक्तीसंबंधानें आक्षेप प्रकट करतांना अशी कांही जपणूक अनेक वेळा सोयीची म्हणून पत्करावी लागतें. कारण एरवी पूज्य व्यक्तीवर आरोप करणारा म्हणून एखाद्या मतप्रतिपादकाच्या मताचा विचार करण्यासच सामान्य लोकांचीं मनें अनुकूल रहात नाहीत.

## वादाचें मूळ स्वरुप

आचार्य भागवतांच्या पुण्याच्या व्याख्यानाच्या वेळीं समारोप करतांना अध्यक्ष आचार्य जावडेकर यांनी वादाचें मूलभूत स्वरूप स्पष्ट करून सांगितलें. तें असें कीं, गीतारहस्यांत साधनशुद्धि नाही याचें कारण गीताग्रंथच मुळीं क्षात्रप्रवृत्तीच्या अर्जुनासाठीं सांगितलेला आहे. याचा अर्थ असा कीं, साधनशुद्धीच्या अभावाबद्दलचा दोष मूळ गीतेचाच आहे, म्हणजे अर्थात् श्रीकृष्णापर्यंत पोहोचतो; म्हणूनच आचार्य जावडेकर म्हणाले की, "आजच्या परिस्थितींत श्रीकृष्णापेक्षां गौतम बुद्धाचाच जास्त अभ्यास झाला पाहिजे." वादाचें हें टोक श्रीकृष्ण आणि गौतमबुद्धापर्यंत आचार्य जावडेकरांनी नेलें हें आमच्या मतें अत्यंत सुसंगत असेंच आहे. बुद्धाचा अभ्यास ज्यांना आज अधिक ग्राह्य वाटत आहे, त्यांनीं श्रीकृष्ण, टिळक आणि गीतारहस्य यांच्यासंबंधीं कोणतीच उठाठेव करूं नये हें फार चांगलें. श्रीकृष्णादिकांचा विचार

अनुल्लेखाने त्यांनी बाजूला सारावा आणि बुद्धाची विचारसरणी सरळपणें लोकांपुढे प्रचारार्थ मांडावी म्हणजे सगळाच घोटाळा वांचेल.

आचार्य भागवतांनी उपस्थित केलेला आणि जावडेकरानीं स्पष्ट केलेला हा वाद अभूतपूर्व असा नाही. लोकमान्य टिळक विद्यमान असतांनाच हा वाद उत्पन्न झालेला होता. त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या वर्षांत महात्मा गांधीशीं त्यांनीं पत्ररूपानें जो वाद केला तो भागवत यांनी मांडलेल्या मुद्यावरच होता. तत्पूर्वी टिळकाचे राजकीय चळवळीचे मार्ग हे संधिसाधू आणि साध्य चांगले असले तर वाटेल ते हीन साधन गावविणारे असे होते, असा आक्षेप टिळकाचे राजकीय प्रतिपक्षी घेत असत. या राजकीय प्रतिपक्षीयांमध्ये महात्मा गाधीचे गुरु ना गोखले हे असल्यामुळे गांधोजीच्या मनावरहि या आक्षेपाची छाप होती. १९२० च्या प्रारंभी, म्हणजे अमृतसरच्या कॉंग्रेसनंतर, गाधीजींनी आपल्या 'यंग इंडिया' मध्ये त्या अधिवेशनाबद्दल एक लेख लिहिला त्यात असे म्हटले कीं, अमृतसर कॉंग्रेसमध्ये टिळकाचे वर्तन त्यांच्या धोरणाशीं सुसंगत असेच होते. कारण 'end justifies the means' म्हणजे साध्य चागलें असलें तर वाटेल त्या वेडयावाकडया साधनाचे त्यायोगें समर्थन होऊं शकतें असें टिळकांचें राजकीय धोरण आहे. गाधीजींनी घेतलेल्या या आक्षेपाला किंवा प्रकट केलेल्या चुकीच्या समजुतीला टिळकानी पत्रद्वारे उत्तर दिले. हे उत्तर गांधीजीनी त्यावेळी यंग इंडियांत समग्र प्रसिद्ध केले आहे. हें टिळकांनी गांधीना लिहिलेलें अखेरचें महत्त्वाचे पत्र पूर्वी अनेक वेळां आम्ही केसरीत व मराठ्यांत उर्धृत केलेले आहे. त्या पत्रात टिळकानी गाधीजीना लिहिले होते कीं, 'चागले साध्य असेल तर वाटेल ती साधने राबवून घ्यावीत हें आपण माझ्या राजकीय धोरणाचे केलेले वर्णन बरोबर नाहीं. 'अक्रोधेन जयेत् क्रोधं' हा बुद्धाचा मार्ग आणि 'ये यथा मा प्रपद्यते' हा श्रीकृष्णाचा मार्ग हे दोन्ही प्रामाणिक असले तरी राजकारण हें साधूचें क्षेत्र नसल्यानें त्या क्षेत्रांत बुद्धापेक्षां श्रीकृष्णाचा मार्ग अधिक श्रेयस्कर असें मानलें पाहिजे. यालाच मी राजकारणांत प्रतियोगी सहकारिता म्हणतों आणि याचा अधिक तात्त्विक खुलासा तुम्हांला गीतारहस्यांत आढळेल' या पत्रातील मूळ इंग्रजी पुढीलप्रमाणें आहे :—

## लो. टिळकांचें म. गांधींना पत्र

" I am sorry to see that in your article on the Reforms, Resolution in the last issue you have represented me as holding that I considered 'everything fair in politics' I write this to you to say that my view is not correctly represented therein. Politics is a game of wordly people and not of 'sadhus.' and instead of the maxim 'Akkodena jine Kkodam ' as preached by Buddha, I prefer to rely on the maxim of Shri Krishna, 'Ye yatha mam prapadyante tam tathaiva bhajamyaham.' That explains the *Whole* difference and also the meaning of my phrase Responsive Co-operation. Both methods are equally honest and righteous but the one is more suited to this world than the other. Any further explanation about the difference will be found in my *Gita-rahasya*,"

—*Young India*,
Jan. 28th, 1920.

टिळकांच्या या उत्तरामध्यें बुद्धाच्या मार्गासंबंधानें आदरबुद्धि ठेवूनहि तात्त्विकदृष्टया आपल्या विवेकबुद्धीला कोणती गोष्ट अधिक ग्राह्य वाटतें हे स्पष्टपणें दाखविले आहे लोकमान्य टिळक आणि महात्मा गाधी यांनीं वरच्या भूमिकेवरून हा तात्त्विक वाद केला. पण अशीच त्यांच्या अनुयायांची भूमिका रहात नसल्यामुळे त्याला हीनपणाचें किंवा हमरीतुमरीचें स्वरूप येतें. टिळकांनी या वादाचे स्वरुप टिळक विरुद्ध गांधी असें न ठेवतां 'श्रीकृष्ण विरुद्ध बुद्ध ' असे त्याचें स्वरूप दाखविलें, यालाहि कारण या वादांत प्रचलित वैयक्तिक भावनांना मिसळूं देऊं नये आणि मूळ तात्त्विक वादाचें स्वरूप गढूळ होऊ नये हा त्यांचा हेतु होता. शुद्ध नीतिनियमन आणि समाज व्यवहार यांची सांगड कशी घालावयाची हा यांतला मूळ तात्त्विक प्रश्न आहे. त्याचें विवेचन करतांना कोणाला निष्कारण विकारवश होण्याचें

कारण नाहीं आणि सिद्धांत स्पष्टपणें मांडण्याच्या वेळीं कोणाची व्यर्थ प्रतिष्ठा सांभाळण्याचेंहि कारण नाहीं.

## टिळकांचे राजकारण नि तत्त्वज्ञान

टिळकांनीं गांधीजींना लिहिलेल्या अखेरच्या पत्रांत आपल्या राजकीय धोरणाचा अधिक खुलासा गीतारहस्यात आढळेल असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून हें स्पष्ट दिसतें की, टिळकांच्या सामान्य आयुष्यांतील वागण्याचें धोरण एक आणि राजकारणांत दुसरें असा भेद नव्हता. आणि 'प्रतियोगी सहकारिता' हें एक विशिष्ट कालाचें धोरण नसून त्यांनी आपल्या एकंदर आयुष्यांत जें मूलभूत तत्त्वज्ञान निश्चित केलें त्यावरच तें धोरण आधारलेलें होतें. आपल्या धोरणाचा खुलासा गीतारहस्यांत मिळेल या दाखल्याचा आणखी खुलासा सांगावयाचा तर गीतारहस्यांतील ' कर्म जिज्ञासा ' हें दुसरें प्रकरण आणि ' सिद्धावस्था व व्यवहार ' हें बारावें प्रकरण यांतच मुख्यतः हा खुलासा आढळेल, असा सांगता येईल. टिळकांचें राजकारणांत एक धोरण आणि खासगी व्यवहारांत एक धोरण होतें असा अलीकडे कांही लोकांनी समज करून घेतला आहे. टिळकांनी गांधीना लिहिलेल्या वरील पत्रावरून तो निर्मूल ठरतो. गीतारहस्यांतील वर निर्देशिलेल्या दोन प्रकरणांत, विशेषतः "सिद्धावस्था व व्यवहार" या प्रकरणांत या विषयाची सांगोपांग छाननी टिळकांनी केली आहे.

## दुरुपयोगाची दुहेरी भीति

कोणतेंहि विवेचन एखाद्याने अर्धेमुर्धे वाचलें तर वाटेल त्या गोष्टीसंबंधाने गैरसमज होऊं शकेल. पण प्रतियोगी किंवा सापेक्ष नीतिधर्म यांचा पुरस्कार केला असतां हवें तें करण्यास त्यायोगे लोकांना सबब मिळेल हा आक्षेप लक्षांत घेऊन त्याला उत्तरहि टिळकांनी गीतारहस्यांतच दिलें आहे. आपल्या पापकर्माच्या समर्थनार्थ चांगल्या गोष्टींचा दुरुपयोग करावयाचा या लोकप्रवृत्तीच्या आघातांतून कोणाचाच उपदेश सुटलेला नाही. निरपवाद अहिंसेचा उपदेश देखील अनेकांना आपला आळस, भित्रेपणा व जीवबचावू वृत्ति या गोष्टींवर पांघरूण घालण्यास उपयोगी पडला आहे. निरपवाद नीतीनियम आणि प्रतियोगी किंवा सापेक्ष नीतिनियम या दोहोंची सबब सांगून लोकांनी केलेला दुरुपयोग पाहिला तर निरपवाद नियमांचाच दुरु-

पयोग अधिक होतो आणि घातकहि ठरतो असें दिसून येईल. सापवादं नीतीनियम कोणी आपल्या दुर्वर्तनाचें समर्थन करण्यासाठी पुढें करूं लागला तर युक्तिवादाने त्याचें तारतम्य चुकलें असें दाखवतां येतें; आणि हें तारतम्य सामान्य बुद्धीला कळण्यासारखें असतें. निरपवाद नीतिनियम हे श्रद्धेय निष्ठेप्रमाणे चालविले जात असल्यामुळे युक्तिवादाला तेथे जागाच उरत नाही, म्हणून त्यांचा दुरुपयोग फारच बिनधोकपणे छद्मी आणि कपटी माणसाला करतां येतो.

तत्त्वतः अंतिम स्वरूपाचे जे नीतिनियम असतील त्यांचें महत्व आपण कमी करतों असा गैरसमज कोणी करून घेऊं नये या विषयी टिळकांनी आपल्या विवेचनांत फारच काळजी घेतली आहे. याबाबतींत उतारे घेऊं लागलों तर सर्वच गीतारहस्याचीं प्रकरणें उद्धृत करावी लागतील. पण उदाहरणादाखल कांहीं ठळक उतारे घेणें प्राप्त आहे. ' सिद्धावस्था आणि व्यवहार ' या प्रकरणांत रहस्यकार लिहितात--

## नीतीनियमांचें परमावधींचें स्वरूप

" भूमितीशास्त्रांत सांगितल्याप्रमाणे रुंदीशिवाय सरळ रेघ किंवा सर्वांशीं निर्दोश वर्तुलपरिघ जरी कोणास काढिता आला नाही तरी तेवढ्यामुळे सरळ रेघेची किंवा शुद्ध वर्तुलाची शास्त्रीय व्याख्या जशी चुकीची किंवा निरर्थकहि होत नाही, तद्वत सरळ व शुद्ध नीतिनियमांची गोष्ट आहे. शिवाय एखाद्या गोष्टीचें परमावधीचें शुद्ध स्वरूप कोणतें याचा आधी निश्चय केल्याखेरीज व्यवहारांत त्या गोष्टीचीं जीं अनेक रूपें नजरेस पडतात त्यांत सुधारणा करणें किंवा सारासार विचारान्तीं त्यांतील तारतम्य ओळखणेंहि शक्य नाही; व त्यासाठीच बावन्नकशी सोनें कोणतें याचा सराफ प्रथम निर्णय करीत असतो. दिशा दाखवणारें होकायंत्र किंवा ध्रुवतारा यांच्याकडे दुर्लक्ष करून अफाट समुद्रावर लाटा आणि वारा या दोहोंचेंच तारतम्य पाहून गलबतावरील खलाशी दर वेळीं आपल्या गलबताचें सुकाणू धरूं लागलें तर त्यांची जी स्थिति होईल तीच नीतिनियमांचे परमावधीचें स्वरूप लक्षांत न आणतां केवळ देशकालाप्रमाणे वागणाऱ्या मनुष्याची झाली पाहिजे. दुष्ट व लोभी लोकांच्या समाजांत अहिंसा, सत्य वगैरे नित्य नीतिधर्म पूर्णपणे पाळतां येत नाहींत हें खरें; पण त्याचा दोष

या नित्यधर्मास देणें योग्य नाही. सूर्याच्या किरणांनी एखाद्या पदार्थाची सावली सपाट प्रदेशावर सपाट आणि उंचसखल जाग्यावर उंचसखल पडते म्हणून ती सावली मुळांतच उंचसखल असली पाहिजे असें ज्याप्रमाणे अनुमान करतां येत नाही. त्याप्रमाणे दुष्ट लोकांच्या समाजात नीतिधर्मांचें पराकाष्ठेचें शुद्ध स्वरूप आढळून येत नाही. म्हणून अपूर्णावस्थेंतल्या समाजांत आढळून येणारें नीतिधर्माचें अपूर्ण स्वरूपच मुख्य किंवा मूळचें होय असें म्हणतां येत नाही. हा दोष समाजाचा आहे, नीतीचा नव्हे. ''

—— ( गीतारहस्य, सिद्धावस्था व व्यवहार, पान ३७४-३७५)

नीतिनियमांची ही सापेक्षता केवळ बाह्य जगतांत लोकव्यवहार सुरळींत चालावा आणि लोकसंग्रह व्हावा एवढ्यासाठीच मानावी लागते असें नाही, तर अंतर्मुख होऊन वैयक्तिक पापपुण्याचा आणि आत्मिक उन्नतीचा विचार केला तरी देखील बाह्य आचरणाकडे आणि बाह्य परिणामांकडेच केवळ दृष्टि ठेवून निर्वाह लागत नाही; तर त्याच्याहि पलीकडे जाऊन कर्त्याची बुद्धि कोणत्या प्रकारची आहे हे पाहावें लागते. कारण, वाईट बुद्धि ठेवून केलेलें कर्म कित्येक वेळेला समाजदृष्ट्या अत्यंत उपकारक असें दिसतें. तसेंच, उलट अत्यंत सद्बुद्धीने केलेल्या कर्माचा विपाक परिस्थितीच्या अनपेक्षित घटनेमुळें विपरीत होऊं शकतो. म्हणून तात्त्विक दृष्ट्या चांगले-वाईट ठरविण्याचा अखेरचा निर्णायक निष्कर्ष हा कर्त्याच्या शद्धबुद्धीवरच अवलंबून ठेवावा लागतो. या तात्त्विक अपरिहार्यतेचा दुरुपयोग करून अनेक दुष्कृत्यें करणारे लोक सद्बुद्धीची सबब राबविण्याचा प्रयत्न करतात. " सैतानहि आपल्या कृत्यांना बायबलाचा आधार घेतो " ही म्हण प्रसिद्ध आहे; पण या दुरुपयोगाच्या भीतीसाठी कोणतेंहि तात्विक विवेचन करण्यास कचरूं लागलें तर कोणतेंच विवेचन नीट करतां येणार नाही.

## दुरुपयोगाच्या आक्षेपास उत्तर

लोकमान्य टिळकानी या दुरुपयोगाची जाणीव ठेवूनच गीतारहस्यांत विवेचन केलेलें आहे. उदाहरणार्थ पुढील उतारे पाहा--

" कर्माकर्मनिर्णयार्थ कर्माच्या बाह्य फळाकडे लक्ष न देतां कर्त्याच्या शुद्धबुद्धीसच प्राधान्य दिले पाहिजे असा जो गीतेचा सिद्धांत त्यावर कित्ये-

कांचा असा तर्कटी आक्षेप आहे की, कर्मफलाकडे न पाहतां याप्रमाणे नुसत्या शुद्धबुद्धीचाच विचार करावयाचा म्हटलें तर शुद्धबुद्धीच्या मनुष्यानें कोणतेंहि दुष्कृत्य करावें असें प्राप्त होईल आणि मग त्यांस सर्व दुष्कृत्यें करण्यास मुभा मिळेल.... पण हे आरोप किंवा आक्षेप सर्वस्वी मूर्खपणाचे किंवा दुराग्रहाचे आहेत असें म्हणण्यास आम्हांस कांहीच दिक्कत वाटत नाहीं." (–गीतारहस्य, प्रकरण 'सिद्धावस्था व व्यवहार', पान ३८०) "कर्माच्या बाह्य फलाचा विचार करीत बसूं नये असें जेव्हा गीता सांगते तेव्हा त्याचा अर्थ वाटेल तें करा असा नाहीं; तर ज्या अर्थी बाह्यतः परोपकार करण्याचे सोंग दभानें, लोभानें कोणीहि आणू शकतो, पण सर्वाभूती एक आत्मा हें ओळखिल्यानें बुद्धीत जें स्थैर्य व समता येते तिचें सोंग आणतां येत नाही, त्याअर्थी कोणत्याहि कृत्याच्या योग्यायोग्यतेचा विचार करतांना कर्माच्या बाह्य परिणामापेक्षा कर्त्याच्या बुद्धीकडे योग्य नजर पुरविली पाहिजे, असें गीतेचे सांगणें आहे. थोडक्यांत सांगणें असल्यास नीतिमत्ता ही नुस्त्या जड कर्मांत नसून ती सर्वस्वी कर्त्याच्या बुद्धीवर अवलंबून असते, असा गीतेचा सिद्धान्त आहे. परंतु या आध्यात्मिक सिद्धान्तातील खरें तत्त्व न ओळखता कोणी वाटेल ते करूं लागेल तर तो पुरुष राक्षसी किंवा तामसी होय असें गीतेतच पुढे म्हटलें आहे."

(गीतारहस्य, प्रकरण–' सिद्धावस्था व व्यवहार ', पान ३ ८१ ).

—केसरी दि. २६–७–१९४९

———

## साध्यानुकूल साधनविवेक ( पुढें चालू )

' लोकसंग्रह ' हें साध्य आजच्या नवीन " शुद्ध -- साधननिष्ठा ' मानणाऱ्यांना संमत आहे. त्या लोकसंग्रहासाठी उपाय कोणते करावयाचे याविषयी शुद्धता राखली पाहिजे आणि ती राखण्याची काळजी लो. टिळ-कानी घेतली नाही असें ते म्हणतात. शुद्ध नीतिनियम हे मुख्यत: सत्य आणि अहिंसा या दोन मूलतत्त्वावर आधारलेले आहेत. लो. टिळकांनी ' कर्मजिज्ञासा ' या प्रकरणांत क्रमाने शुद्ध नीतिनियमांचा विचार करतांना ' सत्य ' आणि ' अहिंसा ' या तत्वांना पहिले आणि दुसरें स्थान दिलेलें आहे. हे नीति -- नियम साधनाच्या बाबतींत कडकपणे पाळावयाचे हाच साधमशुद्धीचा अर्थ, टिळकांवर आक्षेप घेणाराचा आहे हेंही उघड आहे. पण अंतिम स्वरूपाचे नीति-नियम साधनांच्या बाबतीत, विशेषत: लोकसंग्रह हे ध्येय साध्य होण्याच्या दृष्टीने वापरावयाच्या साधनांच्या बाबतींत, पाळ-तांना कांही मर्यादा किंवा तारतम्य ठेवावें लागतें, असें टिळकांनी प्रतिपादन केले आहे. साधनाच्या शुद्धतेमुळेच, साध्य प्राप्त करून घेण्यास तें निरुपयोगी ठरलें तर त्याचें साधनत्वच नाहीसें होतें. साधन शुद्धिवाल्यांची साधन-निष्ठा ही इतकी अप्रमाण असते की, शेवटी त्या साधनाचें साधनत्वच ते नाहीसे करतात. म्हणजे एक प्रकारे त्याला शुद्ध करण्यासाठी त्याचा जीवच घेतात !

## अपवादात्मक प्रसंग

गाडी ही खडखड वाजते हा तिचा दोष काढून टाकण्यासाठी म्हणून एखाद्याने चाकेंच काढून फेकून दिलीं तर खडखड वाजण्याचा दोष निघून जाईल हें खरें, पण गाडीचें वाहनत्व हेंच मुळी उरणार नाही! कपडे स्वच्छ करण्यासाठी पाण्यांत भिजवून ते आपटणें हें साधन होय. पण मूर्ख चाकराच्या ज्या प्रचलित लोककथा आहेत त्यांमध्ये कपड्याच्या चिंध्या होईपर्यंत त्याने हें काम चालविल्याचें एक उदाहरण असतें. यांत त्याचा जो वेडेपणा होतो तो असा की, कपडे स्वच्छ करावयाचे आहेत हें साध्य तो विसरतो आणि अप्रमाण साधननिष्ठ बनतो! सत्य आणि अहिंसा ही पाळून लोकसंग्रह साधत नाही अशी अपवादात्मक परिस्थिति उत्पन्न होते. समाजाच्या पूर्वीच्या अवस्थेत असे प्रसंग अधिक येत असतील, आज ते कमी येत असतील पुढे आणखी समाज चांगला झाला तर हे अपवादात्मक प्रसंग त्याहूनहि कमी होतील कदाचित्. पण या अपवादात्मक प्रसंगाचा संभव आहे तोंपर्यंत या प्रसंगात कसें आचरण करावयाचें याचा निर्णय देणें नितिशास्त्राला प्राप्त आहे. हें प्राप्त कर्तव्य जितक्या काळजीपूर्वक, खुलासेवार आणि अपसमजाचा धोका टाळून करता येईल तितके गीता--रहस्यांत टिळकांनी केलेलें आहे.

## सुप्रसिद्ध कूटप्रश्न

पण साधनशुद्धीवाल्यांचा आग्रह असा आहे की, शुद्ध नीतिनियमांना परिस्थितीच्या प्रतियोगित्वाने उत्पन्न होणारे स्वाभाविक अपवाद हे मानावयाचेच नाहीत. हा त्यांचा आग्रह एकांगी, भावनाप्रधान आणि निव्वळ अशास्त्रीय आहे. ह्या साधननिष्ठेची शाब्दिक पराकोटी गांठणारे गांधीजी यांना देखील हे अपवादात्मक प्रसंग टाळतां आलेले नाहीत. त्यांत त्यांना साधननिष्ठा सोडावी लागली. याचें समर्थन करण्याच्यावेळीं भोवतालच्या परिस्थितीचा दोष असें म्हणण्याऐवजी "मी अपुरा आहें" असे ते म्हणत. या म्हणण्यामध्ये वैयक्तिक नम्रपणाचा प्रकर्ष दिसत असला तरी शास्त्रीय निर्विकारता दिसत नाही. उलट एक प्रकारचा सुप्त अहंकारच दिसतो. साधनांचा आग्रह साध्याला डावलूनहि साधनाग्रही लोक चालवू लागले

म्हणजे शेवटीं साधन हेंच त्यांचें साध्य बनते. आणि त्याच्या शुद्धतेसाठीं साध्याचा बळी देणें हें उलट साधन बनते ! उदाहरणार्थ गांधीजींना एके वेळीं विचारला गेलेला प्रसिद्ध कूटप्रश्न घ्या. "तुमच्या बहिणीवर अत्याचार करावयास आलेल्या माणसाला तुम्ही शब्दानें वळवून पहा; नंतर मध्यें पडून त्याच्या आघातांनी मरून जा." इतके गांधीजीनी सांगितल्यावर पृच्छकानें विचारलें की, "अशा रीतीने मेल्यानंतर देखील अत्याचारी हा अत्याचार करीलच, त्याला तिने आत्मबलानें प्रतिकार केला तरीहि अत्याचार थांबणार नाही" यावर गांधीजींचें शेंवटचे उत्तर असे आहें की, 'The victory will be of the victim and not of the oppressor.' ह्या उत्तराचा अचानक अप्रयोजकपणा बावळटांना प्रज्ञाहत करणारा ठरतो. पण हा तथाकथित अंतिम नैतिक विजय मिळेपर्यंत, मन वळवणें, आडवे पडणें, मरून जाणें येथपर्यंतच्या अहिंसात्मक साधनांचें साध्य अत्याचार प्रत्यक्ष होऊं नये हे असते. शेवटच्या पायरीला मात्र वैचारिक हातचलाखीने तें साध्यच बाजूला सारून काल्पनिक नैतिक विजयाचे साध्य उभे केलें जातें !

अहिंसेच्या कसोटीचा, भगिनीवरील अत्याचाराचा हा दृष्टांत गांधीजींच्या विवेचनांत अनेक वेळा आलेला आहे. त्यांपैकी एका ठिकाणचा आधार दिला तरी आमचे पुढील विवेचन साधार आहे हे दाखवण्याचें काम भागण्यासारखे आहे. म्हणून पुढील इंग्रजी उतारा उद्धृत करीत आहोंत. त्याचा आशय वरील विवेचनांत सर्व आलेला असल्यामुळे त्याचें वेगळे भाषांतर देण्याची आवश्यकता नाहीं.

## आधारभूत उतारा

"And even at this late day, I was seriousy asked whether Satyagraha did not at times warrant resistance by violence, as for instance, in the case of a sister whose virtue might be in danger from a desperado. I ventured to suggest that it was the completest defence without irritation, without being ruffled to interpose oneself between

the victim and the victimizer, and to face death I added that this (for the assailant,) novel method of defence would, in all probability, exhaust his passion and he will no longer want to ravish the innocent woman, but would want to flee from her presence for very shame, and that if he did not, the act of personal bravery on the part of her brother would steel her heart for putting up an equally brave defence and resisting the lust of man, turned brute for the while. And I thought I clinched my argument by saying that if, in spite of all the defence, the unexpected happened, and the physical force of the tyrant overpowered his victim, the disgrace would not be that of woman, but of her assailant, and that both she and her brother who died in the attempt to defend her virtue, would stand well before the throne of judgement. I do not warrant that my argument convinced my listener or that it would convince the reader. The world, I know, will go on as before But it is well at this moment of self examination to understand and appriciate the implications of the powerful movement of non-violence. All religions have emphasised the highest idea, but all have more or less permitted departures as so many concessions to human weakness."

*—Young India' 23 Febrary 1921 Young India Vol.II, page 221 published by S. Ganesan*

## कसोटीच्या प्रसंगाची चिकित्सा

आता, आपल्या भगिनीवरील अत्याचारामध्ये शेवटपर्यंत म्हणजे तो अत्याचार होऊन जाईपर्यंत, पीडकाने कितीहि दुष्टपणा केला तरी पीडित

पक्षानें मात्र अहिंसाच आचरली पाहिजे हा आग्रह धरणाऱ्या मनाचे कांही अधिक पृथक्करण किंवा विश्लेषण करणें आवश्यक आहे. पराकोटीपर्यंतच्या अहिंसेचें हें समर्थन सामान्य माणसाच्या मनाला इतकें धक्का देणारें असतें कीं, तो त्या धक्क्यानें विव्हल होऊन त्याची मति कुंठित होते. अहिंसा तत्त्वाच्या आग्रहापायीं एकाद्या थोर व्यक्तीनें एकाद्या असहाय्य स्त्रीवर होणाऱ्या अत्याचाराला त्या तत्वधुंदीमध्ये तिच्याच 'विजयाचें'चें स्वरूप द्यावें ही गोष्ट सामान्य माणसाला विस्मयाच्या झटक्याने प्रज्ञाहत करते, त्याची विचारशक्ति गुदमरून जाते, त्याची तर्कबुद्धि पांगुळते, विषण्णतेने तो आपल्याला हें पटत नाही एवढे दर्शविण्यासाठी फक्त मान हलवतो ! पण या अत्याचाराला अहिंसात्मक विजयाचें स्वरूप देणारा किती निर्घृण असतो पहा. एका चलचित्रपटावर भगिनीवरील अत्याचाराचें उदाहरण प्रत्यक्ष दाखविलें जात आहे आणि तें पहात सामान्य माणसे आणि पराकोटीचे अहिंसाग्रही बसले आहेत अशी क्षणभर कल्पना करा. सामान्य माणसे शेकडा शंभर त्या भगिनीच्या बंधूला म्हणतील ' अरे ! असा स्वस्थ काय बसलास, प्रतिकार कर ' शेवटी अत्याचार झालेला दिसला तर ते त्या अत्याचाऱ्याचा धिक्कार करतील. स्वस्थ बसून प्रतिकार न करता मरणाऱ्या बंधूला धि:कारतील आणि शेवटी अबलेवरील अत्याचाराच्या वेळी अश्रूपुरीत नयनातून अर्धवट दिसणारें दृश्यहि पाहूं नये म्हणून डोळ्यांपुढे हात धरतील !

## परात्परकोटीचें विडंबन

उलट अहिंसाग्रही माणसाला त्या अत्याचाऱ्याबद्दल राग येत नाही असें दिसेल. प्रतिकार न करतां मेलेल्या बंधूसंबंधाने तो गौरव करील. शेवटीं बिचाऱ्या स्त्रीवर अत्याचार झाला तरी तिची कींव येण्याऐवजी माझें ' अहिंसा ' तत्त्व स्वच्छ आणि निष्कलंक आणि अपराजित राहिलें हें उफराटच्या विचारप्रणालीने सिद्ध करून त्याचा एक प्रकारचा आनंद मानीत राहील ! म्हणजे तो बंधू मेला त्याची याला क्षिती नाही ती स्त्री अब्रूनिशी मेली याची खंत नाही. माझ्या ' अहिंसा ' तत्त्वावर शिंतोडाहि पडूं न देतां तें मी कसें राखू हाच त्याचा सर्वोच्च विचार. या बिकट प्रसंगांतूनहि दोघांचे जीव मेले तरी " अहिंसा तत्त्व " हें मात्र कसें न दुखावता बाहेर

पडेल याची काय ती याला चिंता! पण याला दुसरा तितकाच निर्घृण नि पाषाणचित्त मनुष्य भेटला तर तो म्हणेल की, " आता एकच गोष्ट उरली. जे पीडित झाले नि मेले त्यांच्या अहिंसेचा तुझा मताने विजय झाला ना! ठीक! मग आता हा हार घे आणि अहिंसेचा हा दिग्विजय मिळवण्याची सुवर्णसंधि देणाऱ्या त्या अत्याचाऱ्याच्या गळयांत घालून त्याला उचलून डोक्यावर घे ! ! " पराकोटीच्या आग्रहाला शेवटीं परात्पर कोटीने विडंबन करूनच त्याला शमविणें शक्य असतें.

## लोकविलक्षणाची आवड

साप पुढे आला असता सामान्य मनुष्य त्याला ठार करतो. ' अहिंसा ' तत्त्वाग्रहाने दयाबुद्धि बधिर झालेला पराकोटीचा महंत म्हणतो की, " माझी अहिंसा इतकी उच्च झाली पाहिजे की या सर्पाने मला न चावतां आपल्या वाटेने निःशंकपणे, मला न भिता, सावकाश गेलें पाहिजे. " पुढे हा मोकळा सोडलेला साप अनेकांना चावला तर त्यांच्या मृत्यूने त्यांच्या आप्तेष्टांना किती दुःख होईल याचा विचार सामान्य माणसांच्या मनात येईल. पुढील धोका टाळण्यासाठी या सापाला नाहीसें करणें प्राप्त आहे असें म्हणून त्याचा जीव घेण्याची आपत्ति खंत करीत स्वीकारील; दुःख करील की अरेरे ईश्वराने इतक्या सुंदर प्राण्याला विषारीपणा कां दिला! पण हे तर मामुली सरळ घास घेण्यासारखें झालें. हिंदुस्थानांत तें आकर्षक नाहीं. जो डोक्यावरून किंवा पायाखालून हात घालून घांस घेईल तो खरा अलौकिक अशी हिंदुस्थानांतील लोकप्रवृत्ति आहे !

## अहिंसेचा निर्दयपणा

प्लेगने माणसें मरत असता उंदरांचा नाश करण्याची आत्यंतिक अहिंसाप्रणेत्यांची परवानगी मागितली. ती त्यांनी कोणत्या शब्दांत दिली हे लक्षांत घेण्यासारखें आहे. ते म्हणाले " उंदरांना मारण्याने माझ्या अहिंसेला बाध येत नाही! " ही खरोखर हिंदुस्थानांतली गौरवली जाणारी असामान्यता. सामान्य बुद्धीचा मनुष्य काय म्हणेल? तो बहुधा उद्गार काढील की "ही साधी गोष्ट मला विचारावयास कशाला येता. ही तुमची परप्रत्ययनेय प्रवृत्ति योग्य नव्हे. असल्या गोष्टी तुम्ही मला विचारावयास धांवता यामध्ये

तुम्हांस आणि मलाहि कांही भूषण नाही. विचारण्यांत वेळ दवडून कांही प्लेग दूषित उंदीरामुळे माणसे दगावली तर किती वाईट होईल. आता माणसांना वाचवण्याकरिता आणि त्यांना मृत्यु आल्यास इतर माणसांना जें दुःख होणार ते टाळण्यासाठी हा मुषकसंहार करून टाका. मोठी हिंसा टाळण्यासाठी ही लहान हिंसा कितीहि दुःख झाले तरी करावी लागतें, त्याला उपाय नाही." पण उंदीर मरो वा माणसे दगावोत माझें अहिंसा-तत्त्व तर बाधित होत नाहीना येवढीच काय ती आत्यंतिक अहिंसाग्रहीची चिंता. अशी कल्पना करा की, वरील भगिनीवरील अत्याचाराच्या चित्र-पटामध्ये, सर्व प्रकार होऊन गेल्यावर अहिंसावादी मनुष्य त्या अत्याचाऱ्याबद्दल रागाचा एक शब्दहि न बोलता त्या बंधु — भगिनीच्या प्रेताकडे बघून म्हणतो की, "तुम्ही आपल्या मरणाने निष्कलंक अहिंसेला शंभर टक्के यश मिळवून दिलेत या बद्दल धन्यवाद!" तर त्याबद्दल सामान्य लोकांना काय वाटेल ?

— केसरी दि. २-८-४९

---

## साध्यानुकूल साधनविवेक (पुढें चालू)

लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्यावर आणि विशेषत: त्यांतील 'जशास तसें' या तत्त्वाच्या पुरस्कारासंबंधाने असा आक्षेप घेण्यांत येत असे की, " आजच्या सर्व जगाची प्रवृत्ति ही अधिक सदयतेकड चालली आहे, मनुष्याचें दु:ख कमींत कमी कसें व्हावें यासाठी शास्त्रज्ञांचे यत्न चालू आहेत; अशावेळीं दुष्टांशी कडकपणाने वागण्याचें कठोर तत्त्व हें अर्थातच लोकांना आजच्या प्रवृत्तीशीं विसदृश वाटतें". हा मोघम आक्षेप केवळ टिळकांच्या प्रतिपादनावरच नसून गीतेवरहि घेण्यांत येतो. पण याला उत्तर असें आहे की, प्रतिकारी किंवा प्रतियोगी वर्तनात देखील दयाबुद्धि आहे कारण असें प्रतियोगी वर्तन न केल्यास पुढे जी दु:खें किंवा हिंसा यांची निर्मिति होईल ती प्रतियोगी वर्तन करणाऱ्याला अगाऊच दिसत असते आणि वेळींच थोडीशीं हिंसा करून पुढील मोठी हिंसा टाळण्याचा प्रयत्न प्रतिकारी मनुष्य करीत असतो. उलट अहिंसेचा भलता आग्रह धरणारा मनुष्य हा केवळ तात्कालिक हिंसेकडे आणि ती टाळण्याकडे दृष्टि ठेवतो. तसेंच, आपल्या अहिंसापालनाने दुष्टांकडून जी लगोलग हिंसा होईल तिच्याविषयी तो अत्यंत निर्घृण बनतो.

## दयेंतून निर्दयपणाची प्राप्ती

उदाहरणार्थ, मागील लेखाकामध्ये घेतलेलें भगिनीवरील अत्याचाराचें उदाहरण घ्या. या उदाहरणामध्ये अत्याचारी माणसाला प्रथम त्या उदाहरणांतील बंधूची प्रतिकार करण्याची शक्ति कळून येण्यापुरतें विरोधाचें प्रदर्शन त्याने केले असते तर दोन जीवाच्या हत्त्या, एका जीवाची अब्रू आणि एका जीवाचा अधःपात इतक्या गोष्टी टळणें संभवनीय होतें. त्याऐवजी दोन जीवाचा घात, एका जीवाच्या अब्रूचें नुकसान आणि एका माणसाचा अधःपात या चारी गोष्टी झाल्या तरी अहिंसेचा नैतिक विजय झाला, या समाधानात आत्यंतिक अहिंसावादी गुंग राहतो. या चार प्रकारच्या दुष्परिणामांची क्षिति न बाळगता शुद्ध अहिंसेच्या नैतिक विजयाचें समाधान तो मानीत राहतो. मूळ दयेपासून निघालेल्या अहिंसा तत्त्वाचें पर्यवसान कळत न कळत शेवटी इतक्या निर्दयपणांत होतें. वरवर जें अकर्म दिसतें तें मुळात कर्म असतें इत्यादि कर्माकर्माचा विरोधाभास गीतेने सांगितला आहे. तशाच प्रकारचा विरोधाभास हिंसा आणि अहिंसा, किंवा दया आणि निर्घृणता यांच्या संबंधांतहि उत्पन्न होतो. वरवर जी अहिंसा दिसते ती परिणामांचा विचार केला असता खरोखर मोठ्या हिंसेला कारण होते. उलट योग्य मर्यादेत प्रतिकारबुद्धीने केलेली अल्प हिंसा ही भावी महान् हिंसा टाळणारी म्हणून खरी अहिंसा आणि खरी दयाबुद्धि होय असें म्हणण्याचे प्रसंग अनेक वेळा येतात.

## मिळती आत्यंतिक टोकें

सामुदायिक अहिंसा--पालनांत ज्या पक्षाला अहिंसा–पालनासंबंधाने आदेश द्यावयाचा त्या पक्षाची एकेरी हिंसा जी होत राहते तिच्याकडे आत्यंतिक अहिंसावादी दुर्लक्ष करीत असतो. याचें कारण कोणतेंहि मानवी अंतःकरण हें आत्मक्लेशाने केव्हांतरी विरघळलेंच पाहिजे अशी त्याची "श्रद्धा" असते. या श्रद्धेला काहीएक पुरावा नाही. आणि या श्रद्धेच्या नादाने अहिंसेचा विषय झालेल्या बाजूचे बळीं तो देत असतो; शेवटीं एखाद्या वेळेस 'शेळी जाते जिवानिशी, खाणारा म्हणतो वातड' या म्हणीप्रमाणे प्रतिपक्षाचें अंतःकरण द्रवलें नाही तर झालेलें आत्मबलिदान पुरेसें झालें नाही असें म्हणण्याची त्या आत्यंतिकाची सिद्धता असते! प्रतिपक्षाकडून

गोळीबार झाल्याने एकाद्या माणसाच्या हातापायांतून गोळी गेली तर " ती त्याच्या छातीतून गेली असती तर मी त्यांचा अधिक गौरव केला असता " असे उद्गार या एकपक्षीय बलिदानाच्या नादी लागलेल्या उपदेशकांकडून निघतात ! अहिंसेची प्रेरणा मूळ दयाबुद्धीतून होत असेल हें खरें. पण 'आत्यंतिक टोके दोन्ही बाजूंची एकत्रित मिळतात' अशी इंग्रजीत म्हण आहे, त्याप्रमाणे पराकोटीच्या अहिंसेच्या आग्रहाचे शेवटी निर्घृणपणांत पर्यवसान होतें.

## दुहेरी फसवणूक

प्रतिकार न करतां मरण्याच्या योगाने नैतिक विजय होतो हें दाखवण्यासाठी इतक्या प्रकारच्या आपत्ति उत्पन्न होतात त्यापेक्षा सौम्य उपायांनी अत्याचार थांबला नाही तर प्रतिकार करूनहि तो थांबविला पाहिजे असें म्हणणें हेंच साध्य निष्ठेला अधिक धरून आहे आणि प्रामाणिकपणाचें आहे तसेंच शुद्ध साधनात जे अपवाद अपरिहार्य होतात त्याचा दोष आपल्या अपुरेपणावर घेण्याने अखेरीस एक प्रकारचा अहंकारच वाढतो. मी अपुरा आहे असे म्हटले काय आणि जग अपुरे म्हटले काय, प्रत्यक्ष कृतीमध्ये बदल करावा लागतो हे खरेंच, तें काही चुकत नाही. मात्र त्यामध्ये जगत्कल्याणाच्या निकषाऐवजी सर्ववेळी आत्म-परिक्षणाची दृष्टि पुढे करण्याची आवड ही काय ती दृष्टोत्पत्तीस येते. आणि शेवटी धड अहिंसाहि पुरी नाही आणि जगत्कल्याणहि नाही अशी दुहेरी फसवणूक पदरी पडते. गांधीजींनी दूध न घेण्याची प्रतिज्ञा केली होती. पुढे एका आजारात त्यांना दूध घेणे हे अपरिहार्य झाले. तेव्हां पेचप्रसंग निर्माण झाला. गांधीजींच्या आग्रहापुढे डॉक्टरांनीहि हात टेकले. पुढे कस्तुरबांनी सुचविले की, प्रतिज्ञा करण्याच्या वेळी आपल्या मनामध्ये गाईचे दूध होते म्हणून बकरीचें दूध घेतल्यास चालेल असा हा श्लेष तात्पुरता मानून गांधीजींनी बकरीचें दूध सुरू केलें आणि जीव वांचविला, तरीहि आपण एक पळवाट काढली आणि प्रतिज्ञा मोडली हें त्यांच्या मनाला बोचू लागलें तेव्हा आपल्या आत्मचरित्रांत त्यांनी असे लिहिलें आहे की, "The will to live proved stronger than the devotion to truth, and for once the votary of truth compramised his sacred ideal by his eagerness to take up the satyagrah fight."

## नैतिक शब्दच्छल

अशा रीतीने आपला पराभव मान्य करण्यांत आणि आपला कमीपणा झाला असें लिहितांना देखील 'सत्याग्रह चळवळ करण्याची उत्कंठा' हें त्याला कारण गांधीजींनीं दिलें आहे. म्हणजे जगण्याची इच्छा देखील पुढे सत्याग्रह करण्याच्या इच्छेमुळें प्रबळ होती. आणि त्या सत्याग्रहानें असंख्य लोकाचें हित साधत होतें हें ध्वनित करण्याचा गांधीजींचा उद्देश स्पष्टपणे दिसतो. मात्र तसें स्पष्टपणे केलें असतां मोठ्या साध्यासाठीं लहान साध्य आणि त्याचें साधन हें डाव ठरें आणि तें योग्य झाले असें म्हणावें लागेल. तें गांधीजीच्या अप्रमाण साधननिष्ठेत बसत नाही. यापेक्षां श्रीकृष्णांनी अर्जुनाला त्यानें केलेली प्रतिज्ञा ही कांहीं मर्यादेपर्यंतच पाळणें इष्ट आहे असें सांगितलें, तेंच सरळ वाटतें. ती प्रतिज्ञा पुरी करण्यासाठी आपल्या वडील बंधूंवरच जर हत्यार चालविणें क्रमप्राप्त होत असेल तर ती प्रतिज्ञा झुगारून द्यावी ही श्रीकृष्णांची नीतीच अधिक प्रामाणिक ठसठशीत आणि धर्मशील वाटते. गांधीजींनी न्यायालयांतील अभियोग न लढविण्याचें ठरवून (Leagal quibbling) 'कायदेशीर शब्दच्छल' टाळला, पण अप्रमाण साधननिष्ठेने त्यांना जो अनेकवेळां नैतिक शब्दच्छल करावा लागला आहे त्याच्या मानानें पाहतां कायदेशीर शब्दच्छल एकवेळ पुरवला असें वाटते!

## जुन्या वादाचा निष्कर्ष

गौतम बुद्धाच्या वेळेला किंवा तत्पूर्वीपासूनहि हिंसाहिंसेचे वाद या देशात अनेकशः झालेले आहेत, पण या ऐतिहासिक कालांतील वादांमध्ये जीवदया आणि वैयक्तिक पापपुण्याची धार्मिक दृष्टि ही प्रमुख होती. अहिंसेचा हा सर्व वाद ज्ञानेश्वरीमध्ये एके ठिकाणीं विस्तृतपणें आलेला आहे. पण ज्ञानेश्वरांना देखील शेवटीं अहिंसेची व्याख्या कर्त्याच्या उद्देशावर अवलंबून ठेवून तो उद्देश लोककल्याणाचा असला पाहिजे असाच निष्कर्ष काढावा लागला आहे. "जगाचिया सुखोद्देशें। शरीर–वाचा–मानसें। राहटावें हेंचि अहिंसे। रूप जाण॥" या एका ओवीत त्यांनी सर्व विवेचनाचें सार ग्रथित केलें आहे. दुरुपयोग होईल हा आक्षेप घेतला तर त्यांतून ज्ञानेश्वरहि सुटणार नाहींत. कारण दुष्कृत्य करणारा दुष्ट मनुष्य देखील मी जगाच्या सुखोद्देशाकरितां वागत आहे असें म्हणू शकेल.

## नवीन साधनेचे स्वरूप

धार्मिकदृष्टया पूर्वी या देशांत झालेल्या वादाचें संकलन थोडक्यांत गीतारहस्यामध्येंहि आलेलें आहे. पण गांधीजींनी या अहिंसा तत्त्वाला राजकीय मुक्तीचें साधन म्हणून आणि जागतिक कलहाचे शमन करणारा रामबाण उपाय म्हणून नव्याने पुरस्कारिलें. या नव्या स्वरूपामुळे जुन्या धार्मिक वादापेक्षांहि निराळे असें वादाचे पूर्वपक्ष आणि उत्तरपक्ष निर्माण झाले. त्यांचाच या लेखमालेंमध्यें मुख्यत: परामर्श घेतलेला आहे. अहिंसा हे गांधीजींनी देशांतील स्वराज्येच्छु लोकांपुढे त्या स्वराज्याचे साधन म्हणून पुढे केलें असलें तरी त्यांचे स्वत:चे मात्र ते साधन नसून साध्य होते. काँग्रेसवाले देशासाठीं उपयुक्त म्हणून अहिंसा पत्करीत होते, तर उलट गांधीजींनी अहिंसा हीच देशापेक्षांहि अधिक प्रिय मानली होती! हिंदुस्थान देश हिंसेचा अनुयायी बनला तर कदाचित् तो देश आपण सोडुनहि जाऊ, असे आत्यंतिक उद्गार काढून त्यांनी हेंच दर्शविलें. हे उद्गार १९२० मध्यें म्हणजे राजकारणांत या तत्त्वाचा प्रवेश करून देण्याच्या वेळीच त्यांनी काढले होते; ते असे :–

"If violence results *from* Non-Co-operation, or if Non-Co-operators resort to violence i. e. if India makes violence her creed, and I have survived, I would not care to live in India. She will cease to evoke any pride in me."

--'*Young India*'
1st December, 1920.

## मल्लीनाथींचे प्रकार

सत्य आणि आहिंसा या साधनांचा अप्रमाण आणि निरपवाद असा आग्रह धरला म्हणजे ती तत्त्वें प्रस्थापित करणें हेच एक महत्साध्य बनते. तीं तत्त्वें धादांत फसल्याची उदाहरणें घडतात म्हणजे त्यांनी लोकहित किंवा लोकसंग्रह साधण्याऐवजीं उलटाच प्रकार होण्याचें प्रसंग वारंवार येतात. अशा वेळी निरपवाद सत्य आणि आहिंसा या तत्त्वाना बाध येतो असें लोकांना उघड दिसते. तेंव्हां लोकाच्या मनातील हा ग्रह काढून टाकण्यासाठीं कांहीं युक्तया करणें अवश्य होते. त्यासाठी मग मल्लीनाथी, लटपट इत्यादि

प्रकार कळत न कळत चालू होतात ! " या मल्लीनाथीचे प्रकार आतां सर्वांच्या परिचयाचें झालेंले आहेत. पण संकलित रीत्या त्यांची एकदा उज-ळणी विसराळूसाठीं तरी करणें अवश्य आहे, पहिली संपादणी अशी हा सत्य अहिंसेचा वरवर दिसणारा पराभव तात्पुरता असून असे अनेक पराभव घेत राहणें हेंच अखेरच्या जयाचे साधन आहे, असें सांगण्यांत येंते. दुसरी संपादणी अशी की, पराजय होणे म्हणजे त्या तत्त्वाचा दोष नसून पराजित मनुष्य हा अपुरा आहे, तेव्हां पराजय ही आपल्या अपुरेपणाची खूण समजून आणि पराजय घेत राहणें हेंच अपुरेपणांतून पूर्णतेंत जाण्याचें साधन समजून ते करीत रहावें असेंहि सांगण्यांत येतें. तिसरी मखलाशी अशी की, तो पराजय हाच मुळी नैतिक जय आहे. आणि सत्य-अहिंसेचें भौतिक पराभव आणि नैतिक जय घेत घेत शेवटच्या पायरीला केव्हां तरी सत्य-अहिंसेचे भौतिक आणि नैतिक जय एकत्रित होतील. चौथी फसवणूक अशी की, या प्रयोगाच्या योगाने आपण आपला आत्मघात करून घेत असलो तरी त्या आत्मत्यागाने आपण जगाला मोठें मार्गदर्शन करीत आहोंत आणि त्यांतून मोठे जगकल्याण होणार आहे.

## आत्म विरोधांची गुंतागुंत

निरपवाद सत्य-अहिंसा हे साधन लोकांना आचरण्यास सांगावयाचें आणि त्यायोगे फलप्राप्ति झाली नाही म्हणजे लोक अपुरे आणि अर्धवट होत असा मागाहून साक्षात्कार झाल्याचें दाखवयाचें अशा यांच्या क्रमात काय होतें ते पहा. प्रथम कांही चागले झाले तर तें प्रतिपक्षाच्या चागुलपणामुळे झालें असलें तरी किंवा परिस्थितीच्या परिपाकाने झाले असलें तरी निरपवाद सत्य-अहिंसेचाच तो एकमेव परिणाम असें प्रतिपादन करावयाचें; तोपर्यंत लोकाची पूर्णता किंवा अपूर्णता यांचा विचार नाहीं. ज्या क्षणापासून अपयशाला प्रारंभ झाला, त्या क्षणी लोकांच्या अपुरेपणाच्या सबबीचा उपयोग आपोआप चालू व्हावयाचा ! ही सर्व प्रता-रणा करून काय पदरी पडते तें पहा. साधन हेच नवे साध्य बनून, तें नवे साध्य प्रस्थापित करण्याकरिता, जो शुद्ध आणि सरळ साधनांचा नियम पहिल्या पायरीला सांगितला तोच मुळी उधळला जातो ! म्हणजे पुन:

शुद्धसाधनें वापरावी हा नियमहि त्याचा पुरस्कार करतां करतां बाधित होतो अशी ही एकप्रकारे आत्मविरोधाच्या वलयांची गुंतागुंत आहे. ब्रिटीश राष्ट्राची मगरमिठी या राष्ट्रांवर बसली असतांना लोकांनी हें सर्व जंजाळ अगतिकतेने आणि इतर कसलेच खरें प्रभावी साधन सुलभ नसल्याने, चालवून घेतले ! म्हणजे हा गडबड गुंडा निमुटपणें चालवून आणि निभाऊन घेणें गौण हें साधन अपरिहार्य म्हणून व स्वातंत्र्याच्या साध्यांकडे दृष्टी ठेवून राष्ट्राने पत्करलें ! म्हणजे, याहि पायरीवर साधनशुद्धि न राहतां चांगल्या साध्यासाठी गौण साधन निभावून घ्यावें असाच प्रकार झाला. आतां स्वराज्यप्राप्तीनंतर पुनः हेंच अप्रमाण व निरपवाद साधननिष्ठ लोक ते साधन स्वराज्यनंतरहि पक्के करावें, यासाठी यत्न करीत आहेत.

--केसरी दि. ५-८-१९४९

------

## साध्यानुकूल साधनविवेक ( पुढें चालू )

हिंदुस्थानामध्यें गेल्या २५ वर्षांत झालेला अहिंसेचा प्रयोग जगांतील कांही तत्वज्ञानी लोकांना विचारणीय आणि आकर्षक ठरला. याचें कारण जगामध्यें पहिल्या व दुसऱ्या महायुद्धाच्या प्रचंड संहारानंतर युद्धें कशी टाळावी यासंबंधी अनेक तत्त्वज्ञानी लोक व्यग्रतेनें विचार करणारे होते. युध्यमान राष्ट्रांमध्यें दोन्हीं महायुद्धांत ख्रिस्ती राष्ट्रांची संख्या मोठी होती. त्यांच्यामधील तत्त्वज्ञानी लोकांना ख्रिस्ताचा अप्रतिकाराचा उपदेश नव्यानें सांगणारा कोणीतरी प्रभावी प्रवक्ता हवा होता. तसेंच अप्रतिकारानें युद्धें टाळतां येतात, असें दाखवण्याचा प्रयोग हिंदुस्थानांत झाला तर तो सर्व जगाला उपयोगी पडेल अशीहि त्यांची कल्पना होती. गांधीजीच्या हिंदुस्थानांतील प्रयोगाकडे या देशांतील अनेक बुद्धिमान् लोकाचें लक्ष वेधलें, याचेंहि कारण जगाला महत्त्वाचे वाटणारे असें आपण कांहीतरी करीत आहोंत, असें त्यांना सारखें वाटत होतें. गांधीजीना अहिंसेविषयी शंका आणि स्पष्टीकरण विचारणारीं बाह्य जगतांतून अनेक पत्रे येत. आणि आपल्या मुखपत्रामध्यें गांधीजी ही पत्रें वारंवार प्रामुख्यानें देऊन त्यांना उत्तरें देत असत. यामुळें आपल्या प्रयोगाला जगांत फार महत्त्व आहे ही जाणीव लोकांना सारखी होती. लोकेषणेचा उपयोग उत्तेजक पेयासारखा होतो. व्यक्तीला ज्याप्रमाणें समाजांतील मानमान्यतेचें आकर्षण असतें त्याप्रमाणें हिंदुस्थानांत अहिंसेच्या प्रयोगासंबंधांत एक प्रकारची आंतरराष्ट्रीय लोकेषणा किंवा कीर्तिलालसा आमिषासारखी काम करीत होती.

## ख्रिस्ती राष्ट्रांचें आचरण

पण १९३९ सालापर्यंत म्हणजे दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभापर्यंत हिंदुस्थानांत गांधीजीचे अनेक प्रयोग झाले असतांना देखील त्यांचा परिणाम युद्धमान राष्ट्रांवर आणि युयुत्सु नेत्यांवर काडीइतकाहि झाला नाही. चर्चिल आणि हिटलर यांना पत्रें पाठवून गांधीजींनी त्यांना अप्रतिकाराचा उपदेश केला. पण या पत्रांची पोंचदेखील गांधीजींना दोघांकडूनहि मिळाली नाहीं. या पत्रांची तेथील जनतेनेहि दखल घेतली नाहीं. युद्धमान राष्ट्रांतील लोकांनीहि आपल्या नेत्यांना महात्माजींच्या सूचनेचें आपण काय करतां असें विचारलें देखील नाहीं. तसेंच हिटलरला प्रतिबंध न करतां त्याच्यापुढें शक्य तितकें पडतें घेऊन युद्ध टाळण्याचा यत्न चेंबरलेनने केला याची पराकाष्ठा म्युनिक करारांत झाली. तत्पूर्वी जॉर्ज लॅन्सबरी याच्या सारखे लोक यूरोपमध्ये अहिंसेच्या उपायांनी युद्धें टाळावी असा आटोकाट प्रयत्न करीत होते. तरीहि याचे यत्न यशस्वी झाले नाहीत. आपल्यावर हालअपेष्टा ओढवून घेऊन आत्मक्लेशानें दुष्टाचें मतपरिवर्तन करावे हा ख्रिस्ताचा सर्वांत महत्वाचा उपदेश. त्या धर्माचें प्रतीक म्हणजे 'क्रूस'. हाच मुळीं आत्मक्लेशाचें प्रतीक आहे. अर्थात् यूरोपमध्यें ख्रिस्तीधर्माचा आधार घेऊन अप्रतिकाराचा उपदेश करण्यासाठी अधिकात अधिक अनुकूल परंपरा आहे. कारण आत्मदंडनाचें आणि आत्मत्यागाचें श्रेष्ठत्व हेंच त्यांच्या आद्य धर्मगुरूंनी (श्रीख्रिस्तांनी) प्रत्यक्ष आपल्या आचरणाने दाखविलेलें आहे.

## प्रयोगाचें फसवे स्वरूप

त्या मानानें हिंदुस्थान ही या प्रयोगाला मुळींच अनुकूल भूमिका नव्हती. कारण, हिंदुस्थानांतील संख्येच्या मानानें पाहिल्यास पहिल्या व दुसऱ्या क्रमांकाचे जे धर्म होते ते म्हणजे हिंदु व मुसलमान; या दोन्ही धर्मांत अप्रतिकार आणि अहिंसा यांच्या पराकोटीच्या आचरणाला आधार नाहीं. सर्वांत अनुकूल क्षेत्रांत प्रयोग करण्याचे टाळून सर्वांत प्रतिकूल क्षेत्रांत प्रयोग सुरू करणें हें शास्त्रीय नाही. तसेंच हिंदुस्थान हे इंग्रजांनी निःशस्त्र केलेलें होतें; आणि सशस्त्र शक्तीशी निःशस्त्र लढा देणे येथें प्राप्तच होतें. व्यवहाराच्या अटळपणामुळें अहिंसेचा स्वीकार सामुदायिक चळवळींत येथें प्राप्तच

होता. या आपत्तीला सद्‌गुण-स्वरूप देण्यानें एक प्रकारे अहिंसेच्या स्वीकाराला फसवें स्वरूप प्राप्त होण्याचा येथें संभव होता आणि तसें झालेहि. भिकाऱ्याला उपास करणें प्राप्तच असतें. त्याला उपासापासून होणाऱ्या शारीरिक लाभाचीं प्रवचनें झोडली आणि नंतर भिकारीपणामुळें स्वाभाविक झालेलीं उपासमार म्हणजे त्या सदुपदेशाचा खऱ्या मनानें स्वीकार झाला असें, कोणी म्हणूं लागल्यास त्याला एक प्रकारे फसवे स्वरूप येईल. या फसव्या प्रायोगिकाला आपण असें म्हणूं की, "तुझें हे उपासशास्त्र सारखें भुकेकंगालावर कां फेकीत आहेस? ज्यांना खाण्याला भरपूर आहे, अशा लोकांना हें पटलें आणि त्यांनी उपास केले तर तुझ्या शास्त्राचा खरा परिणाम झाला असे म्हणतां येईल."

## अहिंसेचे जुनें बंधन

महात्मा गांधीची अहिंसा राजकारणात येण्यापूर्वी हिंदुस्थानांत जें राजकारण चालले होतें तें अहिंसेच्या मर्यादेतच चालले होतें. वैध किंवा घटनात्मक विरोधाच्या चळवळी या सर्वच अहिंसात्मक होत्या. कायदा आणि सनद ही अहिंसेच्या अलिकडची बंधनें स्पष्ट असतांना, अहिंसेच्या बंधनाचा वेगळा उच्चार करण्याचें कारण उरत नव्हतें. ज्याप्रमाणें एखादीं चळवळ एखाद्या विशिष्ट जातीसाठी आहे असें म्हटल्याने ती हिंदूसाठी आहे असें वेगळे सांगण्याचे कारण नाही कारण जातिभेद हिंदूतच असल्यामुळें ती मर्यादा आपोआपच समजते. तशीच वैध आणि सनदशीर चळवळ म्हटली म्हणजे ती अहिंसक असतेच. पण उलट सर्व जातीं मोडावयाच्या अशी जातपात तोडक चळवळ झाली तर मात्र ती हिंदुत्वाच्या तटापर्यंत जात असल्यामुळें त्या उरलेल्या एकमेव बंधनाचा उल्लेख करावाच लागतो. गांधीजींनी कायदा मोडण्याचा म्हणजे कायदेशीरपणापलीकडील मार्ग सांगितल्यामुळे "आमची चळवळ कायदा मोडणारी असली तरी अहिंसात्मक आहे" असें शेवटचें अहिंसेचे बंधन उल्लेखावे लागलें. न हून हिंदुस्थानांतले सामुदायिक राजकारण हें हिंसाप्रवण होते आणि गांधीजीनी त्याला नव्याने अहिंसात्मक बनविले असें मुळीच नाहीं. गांधीजींनी अहिंसेच्या अलीकडची कायदा आणि सनदेची बंधनें मोडून टाकली म्हणून पूर्वी असलेल्या बंधना-

पैकीच जें एक शेवटचें बंधन उरलें त्याचा उच्चार करावा लागला. कारण त्याच्या अलीकडची बंधने उरलीच नाहींत.

## नवीन काय झाले ?

घराच्या बाहेर पडण्यास बंदी करणारीं आज्ञा विद्यमान असतें, तोंवर " गांवांतून बाहेर जाऊं नका " असें सांगावें लागत नाही. ज्या वेळी ही गृहबंदीची आज्ञा काढून घेण्यांत येतें तेव्हां पूर्णपणें अनिर्बंधता ठेवावयाची नसल्यास ' गांव सोडून जाऊं नये ' अशी आज्ञा काढावी लागतें. तशासारखें अहिंसेचें बंधन राष्ट्रीय सभेच्या चळवळीला आपोआपच उरत होते. पण गांधीजींना या स्वाभाविक बंधनाचा स्वीकार केवळ अपरिहार्य म्हणून न करतां नैतिक दृष्टया उच्च म्हणून करावा, आणि अहिसा केवळ सामान्य धोरण न ठेवतां भयानक क्षोभाच्या वेळीं देखील लोकांनी मनाला पटलेली सद्‌गुणनिष्ठा म्हणून कायिक, वाचिक, मानसिक, अहिसा सामुदायिकरीत्या पाळावी असा प्रचार केला, लोकक्षोभ आसि त्यायोगे होणारी हिसा ही कांही टळली नाहीं. पूर्वीपेक्षा अधिक काही झालें असेंल तर सामुदायिक हिसाचरण होऊन गेल्यावर मागाहून त्या अहिमेचा झडझडून निषेध, खंत त्यासाठी आत्मशुद्धि आत्मदंडन इत्यादि गोष्टी नवीन झाल्या.

## प्रयोगाचा शेवट

हिंदुस्थानांतल्या प्रयोगामध्ये शास्त्रीय दृष्टया एक मोठा दोष होता. कारण लोकांनो परिस्थिति-प्राप्त म्हणून नव्हे तर खऱ्या मनाने अहिसेचा कितपत स्वोकार केला याचें मोजमाप ठरवणें कठीण होतें. हिदुस्थानांतील लोक, विशेषतः हिदु लोक निष्कारण आक्रमक कधीच नव्हते. त्यांना कोणी डिवचले तरच तें हिंसक होत असत. गांधोनी नवीन काय आणलें असेल तर ते हे की, ' डिवचले तरीहि हिसक बनूं नये कारण आम्ही डिवचलों गेलों ही सबब प्रतिहिंसा करण्यास योग्य नव्हे, ' २५ वर्षे चळवळ झाल्यानंतर शेवटच्या चळवळीच्या वेळो ' सरकारने लोकाना डिवचले म्हणून लोक हिंसक झाले. ते स्वयभू हिसक नव्हते ' अशी उलट सबब गांधींजींना पुढें करावी लागली. पक्वान्नाचें ताट पुढें असतांहि उपवास करावा असा उपदेश २५ वर्षे केल्यानंतर या उपदेशाचें विषय झालेले लोक बकाबक खाऊं लागले

तेव्हां " तुम्ही ताट पुढें आणून ठेवून अमिष दाखविलें, एरवी हे लोक उपासप्रवणच आहेत ' असें प्रतिपादन कोणी केल्यास ते पंचवीस वर्षांच्या उपदेशाचें वैय्यर्थ्यच सिद्ध करतें !

## जुन्या गोष्टींवर मल्लीनाथी

अहिंसेबरोबर जुळचा भावासारखें सत्य हे पुढें येत होतें. हिंदुस्थानांत अहिंसेचा प्रचार करावयाचा तर परंपरांगत हिंदुधर्मामध्ये अत्यंतिक अहिंसा आणि अप्रतिकार ही सांगितली आहेत असे भासविल्याशिवाय प्रचाराला बाध येईल म्हणून तसें भासविण्याचे यत्न झाले. उदाहरणार्थ गीतेंतील व महाभारतांतील युद्ध हें खरें नसून, रूपकात्मक मनोविकाराचा झगडा आहे असें भासवण्यांत आलें. ' रामराज्य म्हटले तरी रामाने देखील दुष्टांचे शासनच केले ! ' सर्वेषु, कालेषु..... युध्द च ' या वचनाची ओढाताण करून सर्वकालीं युध्द ज्या अर्थी शक्य नाही. त्या अर्थी ' युद्ध च ' शक्य नाहीं त्या अर्थी ' युध्द च ' याचा अर्थ प्राप्त कर इतकाच घ्यावा ' अशी युक्ती पुढें करण्यांत आली. पण खरोखर ' सर्वेषु कालेषु ' हे पद ' मामनुस्मर ' या पदापुरतें असून ' युध्द कर ' हा आदेश प्राप्त कालापुरता आहे हे अगदी उघड आहे. ' नेहमी माझें स्मरण कर, आणि आज प्राप्त झालेले हें युध्द कर ' असा या वचनाचा सरळ अर्थ आहे तसेंच, ' यस्य नाहकृतो भावो ' इत्यादि १८ व्या अध्यायांतील श्लोक हा माणसांना मुळी लागूच नाही, अशी त्याची संपादना करावी लागली. आत्यंतिक अहिंसेचा घुटका कसाबसा हिंदूंच्या गळीं उतरवण्यासाठी ही सर्व ओढाताण करावी लागली. म्हणजे पुनः अहिंसा तत्त्व प्रस्थापित करण्यासाठी साधन म्हणून लटपट करावी लागली.

## चक्रापत्तींत श्रेय बुडाले

हिंदुस्थानांतील दुसरी मोठी जमात म्हणजें मुसलमानाची. त्यांच्या धर्मपुस्तकावर अशा प्रकारची मल्लीनाथी करण्याची सोयच नव्हती कोणाहि मुसलमान पुढाऱ्याने गांधीजींची अहिंसा वाचेने देखील स्वीकारली नाहीं. अब्दुल गफारखान हेच काय ते एक त्यांत अपवाद ठरतील. अहिंसेच्या उपदेशाचा सर्व भर एकटया हिंदूवरच चालू होता. आणि त्यांत वारंवार हिंदु-

धर्माच्या आधाराचा उपयोग केला गेल्यामुळें उलट असें झालें कीं, गांधीजींना 'रामराज्य' म्हणजे 'हिंदुराज्य' पाहिजे अशी मुसलमानांची समजूत झाली किंवा तशी ओरड करण्यास त्यास सवड सांपडली. यामुळे हिंदु-मुसलमानांची एकीही ते करूं शकले नाहीत. देशातल्या देशांत हिंदुमुसलमानांचा प्रश्न सोडवण्यांत त्यांना अपयश आलें म्हणून, आपल्या ठिकाणीच अपेशी झालेल्या या प्रयत्नाचा जगावर तरी काय प्रभाव पडणार? शेंवटी अहिंसा ही जगांत नाही आणि घरांतही नाही असे नेमकें 'श्रेय' उरले! मि. स्टॅन्ले जोन्स यांनी आपल्या एका पुस्तकात ही आपत्ति फार चांगली वर्णन केलेंली आहे, ते म्हणतात.--

" He (Gandhiji) complains that the Hindu-Muslim clash in India precludes him from speaking with authority in the world situation. But his becoming more and more a Hindu also precludes his becoming a mediating force in India between Moslems aud Hindus, for the Moslems on the whole do not trust him They feel that he is standing for a Swaraj that is essentially a RamRajya, a Hindu Swaraj. He is not, I know. But he is ought in a vicious circle–he cannot lead the world because he is becoming more and more a Hindu. He cannot lead in the healing of the Hindu-Moslem breach in India for the same reason. He cannot lead the world because he has not succeeded in India–the vicious circle is complete, he is caught–a supreme tragedy. "

" –*Along the indian Road* "
Pages 126–127

--केसरी दि. २-९-१९४९

-----

# सार्थ केळकरमत-विजय

आजच्या स्वरूपांतील केसरी संस्थेचे विधाते आणि आद्य चालक गुरू-वर्य तात्यासाहेब केळकर यांच्या लौकिक स्मृतीच्या वार्षिक गणनेने त्यांचा दुसरा स्मृतिदिन इंग्रजी दिनांकाप्रमाणे १४ आक्टोबरला झाला व पंचांगा-प्रमाणे तो दि. २१ आक्टोबर या दिवशीं पडतो. आजच्या केसरी सस्था-रूपी त्यांच्या सार्वजनिक कुटुंबातील आप्तांना लो. टिळकांबरोबर केळक-रांची स्मृति ही तैलधारेप्रमाणे अखंड आहे आणि राहील. पण लौकिक दृष्टचा सार्वत्रिक सोयीचा म्हणून वर्षदिन मानण्याचा प्रघात अशा आप्तानाहि व्यव-हार्य ठरतो.

इंग्रजांचा पाय प्रत्यक्षपणे या देशांतून निघाल्याने एक मोठा कालखंड संपला नि दुसरा चालू झाला. ' राजा कालस्य कारणम् ' या न्यायाने केवळ राजकीयच नव्हे तर जीवनाच्या अनेकविध अंगामध्ये हा नवा कालखंड चालू झाला. यांच्या संधीकाल–वर्षात नियतीने गांधी, जिना, भाई परमानंद, मुंजे आणि केळकर यांना जगन्नाटकाच्या जवनिकेंत (पडद्यांत) ओढून नेले. या झालेल्या घटनांचा खेद मानवी स्वभावानुसार ज्यांच्या त्यांच्या अनुयायांना मोठ्या प्रमाणांत पण इतरांनाहि सामान्यत: वाटलाच.

## अनेकांगी पुढारी

'इंग्रजांच्या या देशांतील दीर्घकालीन घातक वर्चस्वाचें समूळ उच्चाटन करणे आणि पुन: देशाच्या स्वाभाविक जीवनाचें पुनरुत्थान करण्याच्या भूमिकेवर देश यथायोग्यपणे आणून सोडणें, या एका विचाराने देशधुरीण १९४७ पूर्वीचीं पन्नास–साठ वर्षे सदैव व्यग्र होते. त्या आपत्तीशीं झगडणें आणि त्या आपत्तींतहि भावी प्रगतीचीं बीजें जितकीं रोवून ठेवतां येतील तीतकी ठेवणें, या गोष्टीलाच देशांतील ठळक व्यक्तीनी आपले मुख्य लक्ष्य मानलें. या ठळक व्यक्तीपैकी कांही केवळ राजकारणावर भर देणाऱ्या, तर कांही आपल्या शक्तीप्रमाणे एकेका प्रगतीच्या अंगावर आपले जीवन केंद्रित करणाऱ्या झाल्या.

पण जीवनांच्या बहुतेक किंवा सर्व अंगाचा परामर्ष घेऊन त्याचें नियोजन, मार्गदर्शन आणि योगक्षेम यांच्याकडे पाहण्यास समर्थ अशाहि कांही विशेष व्यक्ति यांतून चमकल्या. गेल्या ३० वर्षातील राष्ट्रीय जीवनामधील अनेक अंगांचा इतिहास जर गांधीजीना वगळून लिहावयाचा म्हटला तर लिहीतां येणार नाही. रामांवाचून रामायण लिहिण्यासारखें ते होईल. त्याचप्रमाणे महाराष्ट्राचें प्रातिक क्षेत्र घेतलें तर याच तीस वर्षाच्या कालखंडाच्या अनेक क्षेत्रांतील इतिहास केळकराना वगळून लिहूं म्हणणें खोटे ठरेल.

## दुर्दैवी मतसंघर्ष

जुन्या काळच्या ज्योतिषावर गाढ विश्वास ठेवणाऱ्या एकाद्या मनुष्याचें जसें रोजचें ग्रहमान पाहिल्यावाचून चालत नसे, तसेंच या तीस वर्षांच्या काळांत राष्ट्रीय क्षेत्रांत गांधी काय म्हणतात आणि महाराष्ट्राच्या प्रांतिक क्षेत्रांत केळकर काय म्हणतात याची दखल घेतल्याविना सार्वजनिक जीवनाचें पाऊल पडत नसे, असें स्थूलमानाने म्हणतां येईल. या दोन क्षेत्रांतील ह्या सर्वस्पर्शी पुढाऱ्यांचा मतसमन्वय कधीच न होतां सतत मतसंघर्षच झाला. एकमेकांसंबंधी प्रथम आदर आणि सदिच्छा भरपूर असतांहि हा संघर्ष उभयतांस टाळतां आला नाही. शेवटी या विरोधाला हे दोघेहि सत्प्रवृत्त पुरुष मनाने विटले.

गांधीजींसंबंधी शेवटची जी एक मुलाखत केळकरांनी दिली तिच्या प्रारंभीं त्यांनी आपला निर्वेद व्यक्त केला आहे; कारण गांधीजींसंबंधी,

अपरिहार्य प्रसंग नसतां, आगंतुकपणे कांही बोलण्यामध्ये त्यांच्या भक्तांना कडू वाटणारें असें कांही बोलणें येणारच. या मुलाखतीत गांधीजींचें गुणहि केळकरांनी आपल्या मताप्रमाणे मान्य केलेले आहेत. पण नुसतें गुणगान केलें तर ती फसवणूक होईल आणि आपल्या मताप्रमाणे वाटतात ते दोष सांगितले तर " गांधीनिंदक " म्हणून त्यांच्या भक्तांनी केळकरांची जी मनोमय ' कृष्ण' मूर्ति कल्पिली तिच्यावरच आणखी एक कोळशाचें पूट तेवढे चढणार! अशी दुहेरी अडचण केळकरांना वाटली.

## दोघांची तुल्य स्वमतनिष्ठा

या मुलाखतीत गांधीजींशी आपलें कधीच जुळलें नाही ही दुर्दैवाची गोष्ट म्हणूनच केळकरांनी सांगितली. उलट, केळकरांच्या निधनानंतर त्यांच्याविषयी गांधीजींनी कांहीच कसे लिहिले नाही या चिंतेनें व्यग्र होणारे पुण्यासहि एक भोळसर चिंतातुर होतेच. त्यांच्या पाशानें शेवटी गांधींनी चार ओळी लिहून पाठविल्या, पण त्याहि लिहून न लिहिल्यासारख्या होत्या. किंवा त्यांत न लिहिलेलेच चाणाक्षाच्या मनःश्चक्षूपुढें अधिक दिसणारें होतें. आपला न्यायनिष्ठुर प्रामाणिकपणा आणि एका भक्ताने घातलेली गळ यांतून मार्ग काढण्यास अर्थशून्य लिहिणें हा एकच मार्ग गांधीजींना होता; कारण स्वमतप्रतिपादनाचें धैर्य घेतलें तर गांधीजी आणि केळकर हे सारख्याच तोलाचे होते. मुझफरनगरच्या एका परिषदेंत पांढऱ्या टोप्यांचा सागर आणि गांधींचा पावलोंपावलीं जयजयकार उसळत असतांहि तेथील भाषणांत केळकरांनी सांगितलें की,

" Gandhiji is undoubtedtedly the greatest man in the world but he has not the monopoly of political wisdom."

(गांधीजी हे जगांत सर्वात थोर पुरुष हें खरें; पण राजकीय विवेकाचा मक्ता कांही त्यांच्याकडेच सोपवलेला नाही.)

केळकर एकेक वाक्य इंग्रजीत बोलत होते. आणि बॅ. असफअल्ली हे उर्दुत अनुवाद सांगत होते. तेव्हां वरील वाक्याचा अनुवाद सांगतांना त्यांच्या अंगांवर शिरशिरी आली आणि घशांत आवंडा अडखळला. पण केळकरांनी शांतपणें आपला पुढील वाक्यौघ, त्यांचा अनुवाद संपतांच, चालू केला.

## केळकरांचे प्राथमिक विजय

या संघर्षाच्या काळांत जे केवळ माणसांची उंची मोजून आणि अनुयायांची संख्या मोजून 'मतें' ठरवणारे होते, त्यांच्यापुढें केळकर शून्यवत् ठरले ! मतें हा शब्द आम्ही हेतुपूर्वक अवतरणांत घातला आहे; कारण या लोकांच्या संचलनस्वरूपी हातउचली नि तोंडपूजा या गोष्टींना 'मतें' म्हणणेंहि चूक आहे. ज्यांना खरोंखरच गांधीजींचीं मतें पटली त्यांना केळकर शून्यवत् न होता मोठ्या अडसरासारखे किंवा त्यांच्या मार्गांतील धोंडेसारखे वाटले. त्यांनी केळकरांवर शाब्दिक प्रहार केले. त्यांचीच री 'मतें' नसणाणांनीं ओढली. या काळांत संस्थेनें शेवटी केळकरांचा पराभव झाला. पण एकदा स्वराज्य पक्षाचे वेळीं भारतीय क्षेत्रांत आणि प्रतिसहकार पक्षाच्या वेळीं प्रांतिक क्षेत्रांत केळकर घसघशीतपणें यशस्वी झाले, ही गोष्ट कोणी दृष्टीआड करूं नये.

१९२१ पासून सुबुद्ध महाराष्ट्रीय जीवनांत केळकरयुग सुरूं झालें. विवेक, तारतम्य, औचित्य. सावधानता, चौफेर दृष्टि, आत्यंतिक भावनेच्या वाऱ्यावर वाहून न जातां प्रत्येक विचार आणि साधन व्यावहारिक रोखठोक दृष्टीनें पारखून घेण्याची चिकित्सा बुद्धि ह्या केळकरांच्या गुणविशेषांची छाप अनेक क्षेत्रांमध्ये महाराष्ट्रांत पडलेली दिसून आली. कोणत्याहि क्षेत्रातला एकांगी विचार केळकरांनी मोडून काढला. मोघम भावनेला सार्वजनिक आवाहन करूं पाहणारे लोक उरले नाहीत असें नाहीं. पण केळकरांनीं सतत चालू ठेवलेल्या विवेकी बाण्याच्या प्रभावामुळें या लोकाना एका कोपऱ्यांत हटावें लागलें.

## आंधळ्या संख्याबलाची पूजा

विवेकाला विवेकानेच पराभूत करण्यांत असमर्थ ठरलेले लोक शेवटी विवेकाचीच थट्टा करूं लागले; आणि केळकरांनी जाणत्या लोकाचे उघडलेलें सार्वजनिक विवेकाचें डोळे धूळ फेकून किंवा फुंकर घालून मिटवण्याचे उद्योग कित्येकांनी केले. या आंधळ्या प्रचारापुढें हार खाऊन केळकरांनी केव्हा तरी आपल्या विवेकबुद्धीचा निकष केवळ निर्वेदामुळें गुंडाळून ठेवावा अशा ईर्षेनें हे प्रयत्न झाले. पण चोरांच्या बाजारांत मूल्यवान् वस्तु मुठींत जशी घट्ट धरून ठेवावी तसा केळकरांनी हा आपला विवेकाचा ठेवा

शेवटपर्यंत राखला.

गतेतिहासांत या गोष्टीमुळें या संघर्षातला एक हीनपणा आता स्पष्टच मांडलेला बरा. सुबुद्ध महाराष्ट्राला, बौद्धिक भूमिकेवरून, केळकरांसारखे विवेचक बुद्धिचे पाठीराखे असेपर्यंत, पराभूत किंवा वश करणें शक्य नाही याची खूणगाठ मनोमन पटल्यामुळे शेवटी विवेकशून्यतेला उंचावून आंधळ्या संख्याबलानें केळकरांच्या विवेकाच्या क्षेत्राला डावलून वा दडपून मागें काढण्याचा यत्न झाला इंग्रजांनी, जाणते राजकीय चळवळे वश होत नाहीत तेव्हा अजाणाना वश करून त्याच्यावर मात करण्याची जी कारवाई केली तिच्या इतकेच हिडीस स्वरूप याहि कारवाईला आहे. मात्र ब्रिटिशांचा हेतु अराष्ट्रीय आणि ही कारवाई करणाऱ्या स्वकीयांचा हेतु राष्ट्रीय होता. तसेंच ब्रिटिशांच्या उद्धट अविक्षेपाच्या पद्धतीपेक्षां थोडीशी हळुवार पद्धति स्वकी-यांकडून या कामात उपयोजिली गेली, एरवी दूषित पूर्वग्रह उत्तेजित कर-ण्याचें साधन दोघानीहि जवळजवळ सारखेंच राबविलें. त्यासाठी क्षणभर बुद्धिमंतांनीहि आपली बुद्धि तीन पायऱ्या खाली उतरवून तिच्या जागीं गावरानपणाला श्रृंगारून वर आणून बसविले.

## लोकशाहीचें हीन स्वरूप

लोकशाही ही चांगली खरी; पण लोकशाहीचेंहि एक विकृत स्वरूप असते, त्याचें वर्णन मि. वेल्स यानी पुढीलप्रमाणें केले आहे--

"There is a base democracy just as there is a base aristocracy, the swaggering aggressive disposition of the vulgar soul that admits neither superiors nor leaders. Its true name is insubordination; it resents rules and refinem-ents; delicacies, differences ond organizations; it dreams that its leaders are its delegates, it takes refuge from all superiority all special knowledge, in a phantom ideal,-People, the sublime and wonderful People"

खरी विवेकी लोकशाही कशी असावी याचें वर्णन सर राधाकृष्णन् यांनी " हिंदु जीवनदृष्टि " या पुस्तकामध्ये मार्मिकपणानें केलें आहे; ते असें की —

" Democracy is not the standardising of every one so as to obliterate all peculiarity. We cannot put our souls in uniform. That would be dictatorship. Democracy requires the equal right of all to the development of such capacity for good as nature has endowed them with. If we believe that every type means something final, incarnating unique possibility; to destroy a type will be to create a void in the scheme of the world. Society is a living organism, one in origin and purpose, though manifold in its operations " (page 116)

## भस्मासुरी परिमाम

या उताऱ्यांचा संकलितपणे भावार्थ असा की, लोकशाहीत देखील एक कनिष्ठ प्रतीचा नमूना उत्पन्न होतो. त्यामध्ये लोकांच्या सर्वसाधारण कनिष्ठ पातळीहून उच्च कांहीच नाही असे मानले जातें. लोक म्हणतील त्या साच्यांत, कोणतेहि तारतम्य न मानता, सर्वांना कोंबले पाहिजे, अशा प्रकारची तिची प्रवृत्ति असते. पुढारी म्हणजे आपल्या हातातली बाहुली असे तो समजते. ज्ञान किंवा कोणतीहि उच्च गोष्ट ही डावलून लोकांचें भ्रामक आणि अद्‌भुत सामर्थ्य ही लोकशाही डोक्यावर घेते. पण याप्रमाणे सर्वांना एका साच्यांत कोंबणे म्हणजे एकप्रकारे हुकूमशहीच होईल. समाज ही एक सजीव वाढ आहे. तिचा हेतु एक असला तरी विविध रूपानें समाजाच्या शक्ति प्रकट होत असतात ही वैशिष्टये नाहीशी करणें म्हणजे त्या समाजाला विफल करणे होय.

केळकरांना पराभूत करण्यासाठी अशीच विकृत लोकशाही, अंतिम आश्रय म्हणून, शेवटी त्याच्या विरोधकानी पत्करली. हिच्या प्रभावानें त्यांनी केवळ संख्याबलाचा विजय मिळविलाहि; पण भस्मासुरासारखी ती उच्छृंखल लोकशाही पुढे आपल्या निर्मात्यावरच उलटली. तिचें हे अनिष्ट स्वरूप अंशतः १९४२ साली व्यक्त झालें. पण ते समिश्र असल्यामुळे मागाहून सारवासारवीनें उजळ करता आले. तिचें अगदी नागडेउघडे स्वरूप

१९४८ च्या फेब्रुवारीतील जाळपोळीत आणि घातपातात स्पष्ट झाले. स्वातंत्र्यप्रेम म्हणून १९४२ चा उद्रेक पुष्कळसा सोज्वलपणाच्या पांघरुणांत झाकतां आला. १९४८ चा उद्रेक देखील गांधी-प्रेमाच्या उदात्त कल्पनेनें झाकण्याचा यत्न झाला नाहीं असें नाही, पण तो यत्न टिकला नाहीं. ही मोकाट सुटलेली वेडी लोकशाही कशी आवरावी याविषयी ती निर्माण करणारांना फार पंचाईत पडली त्यांनाहि अखेर हात टेकावे लागले.

## नव्या घटनेतील डागडुजी

या विकृत लोकशाहीचें भय किंवा धसका नव्या राज्यघटनेंतील सर्व-प्रौढ-मताधिकारामुळें निर्माण झाला. आता तें मान्य केलेलें व्यापक मताधिकाराचे तत्त्व मागे घेता येत नाहीं, म्हणून राज्यघटनेच्या खालच्या टोंकाला तो सार्वत्रिक मताधिकार नांवाला कायम ठेवून, घाईघाईनें वरच्या घटनेंत प्रथम केलेल्या योजना बदलण्यांत आल्या. सत्ता केंद्रीत करण्यांत आली आणि ही केंद्रें निवडलेल्या माणमांच्या हातांत ठेवण्याऐवजी नेमलेल्या लोकांच्या हातांत ठेवण्यासाठी इष्ट ते बदल नव्या घटनेंत करण्यांत आले. यापैकी कांही बदलांचें समर्थन करतांना पं. नेहरूंनीं स्पष्टच सांगितलें कीं, गेल्या कांही महिन्यांच्या अनुभवावरून आम्हीं हें फरक सुचवीत आहोंत. नेहरूंच्या या अनुभवामध्यें विकृत लोकशाहीचा कांही महिन्यांत झालेला साक्षात्कार हाच प्रमुख असला पाहिजे हें त्यांनी तितकें स्पष्ट केलें नसलें तरी अनुमानानें सहज उमगण्यासारखें आहे.

या घटनेंतील फेरबदलाच्यां मुळाशी, घटनेंत अविवेकी सत्ता उत्पन्न न होतां विवेकी सत्ता उत्पन्न व्हावी अशी काळजी आहे. केळकरांच्या विवेचकपगाला पराभूत करण्यासाठीं ज्या अंधबळाचा उपयोग महाराष्ट्रांत मोठ्या प्रमाणांत करण्यांत आला त्याचा उपयोग इतर प्रांतातहि निराळ्या कारणांनी थोडा थोडा झाला असला पाहिजे, म्हणूनच अविवेकी लोकशाहीला आळा कसा घालावयाचा याची विवंचना उत्पन्न झाली आणि त्यासाठीं सोयीचे असे वेगळे घटनेचे पर्याय आदरणीय ठरले.

पण हे घटनात्मक उपाय, रोग झाल्यावर त्याला दाबून टाकणाऱ्या औषधांसारखे आहेत. मूळ सुबूद्ध विवेकी लोकशाही कशी निर्माण करावयाची हा

प्रश्न त्यायोगे सुटत नाही. ती सोडवावयाचा असेल तर जी विवेचक बुद्धि तीस वर्षे केळकरांनी महाराष्ट्रामध्ये चिकाटीने आणि जयापजयाची क्षिति न बाळगतां सतत अनेक क्षेत्रांत पेरली आणि जिची त्यावेळीं कित्येकांना आपल्या राजकीय स्वार्थापुढे मोठी अडचण वाटली, तीच आता ( कृतज्ञता बुद्धि असेल तर केळकरांचें नांव घेऊन, आणि नसेल सर ते मागे ठेवूनहि कदाचित्) याच लोकांना उत्पन्न करावी लागेल किंवा लागत आहे.

## कृतज्ञतेचें क्रमप्राप्त कर्तव्य

आज विद्यार्थ्यांना. मजुरांना व मतदारांना, अविचारी बेहोषपणापेक्षा विचाराच्या मर्यादा ह्या चांगल्या असें अनेक पर्यायानी सत्ताधाऱ्यांना सांगावें लागत आहे. याच विवेचक बुद्धिचें ' अजीर्ण ' केळकरांच्यामुळे महाराष्ट्रांत झालें अशी कुरकूर याच मतप्रणालीमधल्या लोकांनी पूर्वी केली होती. म्हणून केळकरांनी अनेक क्षेत्रांत प्रगतीचे जे डोळस मार्ग दाखविले ते मार्ग अद्यापि इतिहासांत गुंडाळून ठेवण्यासारखे झालेले नाहीत. पूर्वी केळकरांचें जें म्हणणें ऐकलें नाही व जे लिहिणें वाचले नाही तेच आता उजळण्यासारखी वेळ निश्चित आलेली आहे. स्वराज्यानंतर सर्व कोरो पाटी होईल आणि आपल्यास हवें तें मनमोकळपणे तिच्यावर लिहितां येईल ही आशा अनेक ठेचा खाऊन संपलेली आहे. " ब्रिटिशाचें शेवटचें जहाज " या अचुक भविष्यवादी लेखांत केळकरानी १९४७ या वर्षी इंग्रज गेल्यानंतर काय परिस्थिति होईल याचें. १९३० मध्ये म्हणजे सतरा वर्षापूर्वी, संवाद--रूपाने केलेलें दिग्दर्शन उदाहरणार्थ म्हणून आजहि लोकानी उघडून पाहावे. त्यावरून आजच्या परिस्थितींतून मार्ग काढण्यास अनेक बाबतीत केळकरांचें मार्गदर्शन काय होते हें पहाण्याची बुध्दि सहजच होईल.

## धाडसी दूरदृष्टि

पुष्कळ वेळां आजचा तात्पुरता फड मारून नेणें आणि लोकांना शाश्वत हिताच्या दृष्टीनें मार्गदर्शन करणें यांचा बिनतोड विरोध येतो. वेळ मारून नेण्याची कामचलाऊ दृष्टि ठेवली तर सवंग विजय लाभतो पण चिर -- मार्गदर्शनाचें काम गुंडाळून ठेवावे लागतें. असा पेचप्रसंग केळकरांना गांधीयुगांत सतत आला. त्या वेळीं फड मारून नेण्याची नीति ज्यांनी पत्करली, त्यांनी आपल्या ठिकाणींच आपल्या बुध्दीचें मोटें कौतुक

केलें. त्यांना वाटलें की, या वेळी निष्ठुरपणाने विवेकाच्या चौकटींत बसेल तेंच बोलण्याने विजय हातचा जातो ही साधी गोष्ट केळकरांना कशी कळत नाही! आणि केळकराच्यापेक्षा आपण अधिक चाणाक्ष व समयज्ञानी ठरलों किंवा आहोंच असा कित्येकांना भ्रम झाला. पण ही साधी गोष्ट न कळण्याइतके केळकर निर्बद्ध खास नव्हते. त्यांनी दूरवर विचार करून विवेकासाठी आणि स्थायी लोकहितासाठी उघड्या डोळ्यानी तात्कालिक पराजय पत्करला. याचे एक उदाहरण देतो. १९२९ मध्ये पंडित नेहरू यांनी आंतरराष्ट्रीय क्षेत्रातून ' ब्रिटिशाचा संबंध तोडून पूर्ण स्वातंत्र्य ' हा ध्येयवाद आणला. सर्वच त्यावेळी उत्साहित झाले. अशा वेळी तात्यासाहेबांनी एका भाषणात सांगितले की, " कितीहि दूरवर दृष्टि फेकली तरी मला दूरच्या क्षितीजावर देखील, ब्रिटिशाचा सबंध पूर्णपणे तुटलेलें हिंदुस्थान दिसत नाही, " यावेळी केळकराचें हे म्हणणे युक्तिवादाने खोडून काढण्यासारखे नसले तरी ' हें ते कशाला बोलले ? ' असे त्याच्या कित्येक अनुयायाना देखील वाटलें. त्यावेळी अर्थातच ' सर्व लोक विरुध्द एकटे केळकर ' असा हा प्रसंग होता. त्यांत नेहरूंचा प्रचंड विजय झाला पण आज ब्रिटिश राष्ट्रकुलाशी अनेक शाब्दिक वळणे घेऊन संबध चालू ठेवण्याची त्याच नेहरूंची धडपड पाहत असताना तरी केळकराच्या धाडसी दूरदर्शीपणाची आठवण न करणें कृतघ्नपणाचें ठरेल.

## जयापजयाची आंदोलने

मतांचा जय आणि माणसांचा पराभव असाहि विरोधाभास सार्वजनिक जीवनांत होत असतो. उदाहरणार्थ, अलीकडे निघालेल्या धर्मातीतपणाच्या रक्षणाची काळजी घेणाऱ्या एका लेखकाने म्हटलें आहे की, हिंदुमहासभेचा पराभव झाला असला तरी तिच्या तत्त्वाचा जय होत चालला आहे. त्याला उदाहरणे म्हणून त्याने हिंदी आणि नागरीचा स्वीकार, भारत या नांवाचा स्वीकार, महत्त्वाच्या मूलभूत उद्योगधंद्यांतून पाकिस्तानी लोकांचें उच्चाटन, इत्यादी गोष्टी दाखविल्या आहेत. त्याचप्रमाणें केळकर हे जरी व्यक्तिशः किंवा पक्षशः शेवटी पराभूत झाले तरी केळकराच्या अनेक तत्त्वाचा विजय हा निश्चितपणें झालेला आहे. उलट गांधीजींच्या जीवनांत त्यानी

वैयक्तिक पुढारीपणांत यशाचें शिखर गाठलें असलें तरी गांधींच्या तत्त्वानु-सार आजचा कोणताच राज्यव्यवहार चालू नाही. नांवाचा जयजयकार वा उच्चार काय तो चालू आहे! एकाच वेळीं तात्कालिक आणि भविष्य-कालीन अशा दोन्ही यशांचीं टोकें गाठणें बहुतांशीं दुरापास्त वाटतें. म्हणून जयापजयांची हीं पारडी कालक्रमाने उलटी सुलटी फिरतात. ज्यांनी भावी कालाच्या दृष्टीने तात्पुरतें अप्रिय आणि कटु असें मतप्रतिपादन पत्करलें आणि त्याचा परिणाम पराभवरूपाने आपल्या जीवनात निर्धाराने सोसला त्यांनां त्याच्या विनिमयात कालाच्या पलीकडच्या दुसऱ्या पारड्यांत न्याय-बुद्धीने भारंभार मान्यता मिळणे न्याय्यच आहे. म्हणून केळकर–मतप्रणालि आज अनेकश: स्वीकार्य झाली आहे हे मोकळ्या मनाने पूर्वीच्या विरोध-कांनाही मान्य करावयास हवें.

––केसरी दि. १८–१०–१९४९

------

# अहिंसा, निरपेक्ष का सापेक्ष ?

कै. तात्याराव केळकराच्या निधनासंबंधी दुःखप्रदर्शनार्थ भरलेल्या सभेमध्ये ना. खेर यांनी उद्गार काढले होते की, अशा सर्व पक्षीय सभेचें अध्यक्षस्थान चालविण्यास स्वतः केळकरच हवे होते. अशाच प्रकारची आत्मविरोधी आकांक्षा गांधीजीच्या घोर हत्येंतून निघालेल्या न्यायनिवाड्याने निर्माण केली आहे. गांधी हिंसा करणाराची न्यायनियोजित वैध प्रतिहिंसा विहित आहे काय ? असा तात्त्विक आणि नैतिक कूट प्रश्न निर्माण झाला आहे. गांधी–तत्त्वज्ञान आणि गांधीनिष्ठ आचरणशिस्त यांतील मुरब्बी अशा ज्या दोनचार व्यक्ति आहेत त्यापैकी श्री. किशोरीलाल मश्रुवाला यांनी गांधीस्थापित ‘ हरिजन ’ पत्रामध्ये हें विरोधमंथन कोडें उलगडण्याचा अयशस्वी प्रयत्न केला आहे; कारण त्यांनी असें सूचित केलें आहे की, गांधीजींच्या मृत्यूने उत्पन्न झालेली ही समस्या सोडविण्यास स्वतः गांधीजीच पाहिजे होते. अनेक नीतिविषयक गूढ पेचांना तोंड देण्याचें नीतिधैर्य आणि अनपेक्षित निर्णय सांगण्याचें धाडस गांधीजींमध्ये होतें तसें आज कोणांत आहे ? महात्माजींच्या मरणाने असा एक विलक्षण कूट–प्रश्न निर्माण झाला आहे की, त्याच्यापुढे गांधींव्यतिरिक्त इतर कोणीहि हतबुद्धच व्हावा. पेटींत किल्ली टाकून पेटीच चापाच्या कुलपाने बंद केल्यानंतर उत्पन्न होणारा

लैंहीनसा व्यावहारिक कुलुपबंद पेच मोठ्या नैतिक पेचाचें स्वरूप कांहीसें विशद करील. पण त्याला सर्वांगीण समर्पक उपमाच सांपडणें कठीण. ती एक उलट-सुलट दिशांनी गति आणि गतिविरोध ही दोन्ही आपल्यांतूनच उत्पन्न करणारी चक्रापत्ति आहे !

## आता चर्चेला मोकळीक झाली

हा अंतिम पेच गांधीहत्येचा पहिला दुःखावेग ओसरल्याबरोबर प्रत्येक विचारी माणसाच्या मनांत आला असेल. या हत्येच्या सिद्धसाधकांना देहान्ताची शिक्षा झाल्यावर नि पहिल्या अपिलाचा निर्णय झाल्यावर या प्रश्नाला अधिक सार्वजनिक वाच्यता फुटली. तिसऱ्या म्हणजे प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करण्याच्या अनुज्ञेचा तांत्रिक पण ठरीव अपेशी मार्ग यथासांग संपेपर्यंत कित्येकांना दम निघाला नाही; पण तो मार्ग संपून अधिकृत न्यायालयाने येत्या दि. १५ नोव्हेंबरला देहान्त शिक्षेच्या म्हणजे दोघा आरोपींना फाशी देण्याच्या आज्ञाहि सोडल्या, तेव्हा मात्र या प्रश्नाच्या चर्चेला कोणतीच तांत्रिक अडचण उरली नाही. डाऊ येथील सर्वोदय-संमेलनांतच हा प्रश्न रत्नागिरीचे गांधीभक्त श्री. अप्पासाहेब पटवर्धन हे उपस्थित करणार होते; पण वरील तांत्रिक अडकाठीमुळे तो विचार स्थगित राहिला. त्यावेळीं तो व्यक्त न झाला तरी अव्यक्तपणे मनोमन त्याची भवति न भवति प्रत्येकानेंच आपल्याशी केली असेल. अप्पासाहेब पटवर्धन यांनी जो ठराव डाऊ येथे आणणार म्हणून म्हटलें होतें, त्यामध्ये गांधीजींच्या अहिंसा, क्षमा आणि वैऱ्यावरहि प्रेम या तत्त्वानुसार गांधीहत्या करणारांना देहांत शिक्षा देणें विसंगत व विसदृश होईल असा आशय प्रकट झाला होता. अमेरिकेंतील प्रख्यात शांतिवादी लेखिका पर्ल बक यांनी तर न्यायालयाचें किंवा प्राथमिक चौकशीचें काम चालू होण्याच्या आधीच " गोडसे याला फाशी द्यावें काय ?" असा प्रश्न करून त्याला नास्तिपक्षीं उत्तर देणारा लेख प्रसिद्ध केला होता. त्याकडे मुंबईच्या एका पत्राव्यतिरिक्त इतरांनी त्या वेळीं लक्ष दिलें नाही.

## आजवरचे प्रयत्न

तांत्रिक प्रत्यवाय असतांहि अलीकडे सेनापति बापट, श्री. बाळुकाका कानिटकर, श्री. वा. वि. साठे, श्री. ल. ग. थत्ते प्रभृति सर्वतंत्र स्वतंत्र

व्यक्तींनी या प्रश्नांत मन घातलें होतें. कांहींनीं सामुदायिक विनंत्यांचे नमुने करून अनेक स्वाक्षरींसह ते भारताचे गव्हर्नर–जनरल ना. राजगोपाळाचारी यांच्याकडे धाडण्याचा उपक्रम चालवला होता. तसेंच गांधीजींचे पुत्र श्री राम-दास गांधी यांनी हा पेचप्रसंग सोडविण्यास कांही मार्ग निघावा या हेतूने श्री गोडसे यांच्याशीं पत्रव्यवहार केला. तोहि त्यांच्या सद्‌हेतूकडे लक्ष देऊन आम्ही यापूर्वीच प्रसिद्ध केला आहे. या पत्रव्यवहारांतून कांही मार्ग निघणें कठीण दिसल्यामुळे गाधीजींचे तीन निःसीम अनुयायी आणि श्री. गोडसे यांच्या प्रत्यक्ष भेटी घडवून आणण्याची कल्पना याच पत्रव्यवहारांत व्यक्त झाली. मात्र या भेटी प्रत्यक्ष पुढे झाल्याच नाहीत असें दिसतें. त्यामध्ये सरकारी अनुज्ञेची अडचण आली का इतर कांही अडचणी आल्या हेंहि स्पष्ट होण्याइतकें ज्ञान आजहि उपलब्ध झालेलें नाही. या पत्रव्यवहाराने या प्रश्नाची निरगांठ सुटण्यापेक्षाहि ती कशी तेढी आहे हेंच अधिक निदर्शनास आलें. विलायतेंतील कांही शांततावादी लोकांनी अलीकडे सामुदायिक ठराव करून आणि हिंदुस्थानांतील ख्रिश्चनांनी कांही वैयक्तिक निवेदनें प्रसिद्ध करून, गांधीहत्येचा बदला वैध अशा हिंसेने देखील घेऊं नये असें ख्रिस्तमान्य आत्यंतिक क्षमातत्त्वानुसार आपापलें मत मांडलें होतें. श्री. ल. ग. थत्ते यांच्या टोचणीने प्रेरित होऊन वा रागावून राजा महेद्रप्रताप, साने गुरुजी इत्यादि हिंदी पुढाऱ्यांनीहि असेच अभिप्राय व्यक्त केले. मुंबईस नवीन निघालेल्या ' भारत ' पत्रानेहि अपिलाच्या निकालाच्या वेळीं श्री. गोडसे यांना फाशी देऊं नये असें सूचित केलें होतें. या पत्राशीं सरदार पटेल यांच्या चिरंजिवांचा संबंध असल्यामुळे या सूचनेच्या मूळ प्रेरणेचा धागा कित्येकांनी मनोमन भारत सरकारापर्यंतहि ताणला होता.

## आपटे-गोडसे यांच्यांतील भेद

गांधीजींच्याच ' हरिजन ' पत्रांत श्री. मश्रुवाला यांच्यासारख्या गांधी-निष्ठाने या प्रश्नाला स्पर्श करणें हें आता अटळ मानल्यामुळे त्याच्या चर्चेला थोडा अधिक उजळ राजरोसपणा उत्पन्न झाला आहे. श्री. मश्रु-वाला यांचा हा लेख उद्‌धृत करतांना मुंबईच्या भारत पत्राने ' गोडसे आणि आपटे यांना दया दाखविण्याचें समर्थन " असा मथळा दिला आहे हें खरें.

पण तो लेख प्रत्यक्ष शेवटपर्यंत वाचल्यानंतर हा मथळा अन्वर्थक वाटत नाही. श्री. आपटे यांच्या संबंधांत त्यांना फाशीऐवजी जन्मठेप द्यावी, ही गोष्ट जवळ जवळ निर्विवाद आणि उपेक्षणीय म्हणून तिची शेवटच्या चार वाक्यांत श्री मश्रुवाला यांनी बोळवण केलेली आहे. आपटे यांनी न्याया-लयांत अपराधच अमान्य केला, स्वतः दयेसाठी आवेदनहि केलें आणि प्रत्यक्ष हत्या त्यांच्या हातून न घडतां प्रमुख सहायक अशी त्याची भूमिका न्यायालयाने देखील धरली. उलट श्री. गोडसे हे हत्येच्या जागींच पकडले गेले; आपण हत्या केल्याचें त्यांनी मान्य केलें, त्यासंबंधांत तेवढ्या घटने-पुरते प्रश्न विचारावयाची त्यांनी आपल्या वकिलाला बंदी केली . आणि लांबलचक राजकीय स्वरूपाचें निरूपण करून त्यांनी आपल्या कृत्याचें समर्थन केलें. तेंच सरकाराला इतकें बोचक वाटलें की, सरकारने त्याच्या मुद्रणालाहि मनाई केली. स्वतः श्री. गोडसे यांनी दयेची याचना केली नाही आणि इतर कोणीहि आपल्या वतीने दयेची याचना करूं नये असा शाब्दिक प्रतिरोधहि करून ठेवला. तसेंच त्यांच्या अखेरच्या वक्तव्यांत त्यांनी असें म्हटलें आहे की, "ज्यांची मी हत्या केली त्यांना मी दया दाखवली नाही, तेव्हा मलाहि दयेची विनंती करण्याचा अधिकार नाही." श्री. गोडसे यांनी दयेची याचना केली असती तरी देखील हा पेचप्रसंग राहिला असताच; पण त्यांनी दयेची याचना न केल्यामुळे मात्र तो अधिकच कठीण झालेला आहे.

## नागमोडी विवेचन

श्री. मश्रुवाला यांची इतर अनेक संबंधांत रेंखीव निर्णय देणारी लेखणी या विषयांत मात्र चाचपडत आणि नागमोडीं वळणाने चालावी यांत आश्चर्य नाही. "आपल्या प्रिय गुरूची हत्या करणाऱ्याला जीवदान देणें हें परमदयेचें कृत्य ठरेल, व असें कृत्य केवळ गांधीजींच्या शिक्षाप्रणालींत वाढलेल्या राज्यकर्त्यांच्याच मनांत येणें संभवनीय आहे; पण या गोष्टीचा अर्थ इतरांकडून सरकाराचा दुबळेपणा असा केला जाईल; आणि व्याव-हारिक दृष्टीने चालणाऱ्या राजकारणी पुरुषांना एकदम आपला नेहमींचा मार्ग बदलून उच्च नैतिक भूमिका घेता येणार नाही. विशेषतः अशा उच्च

तत्त्वानें वागण्यानें अनेक धोके उत्पन्न होण्याचा संभव असून अशा ठिकाणीं तर ही भूमिका घेणें अवघड आहे." याप्रमाणे उलटसुलट विवेचन करून श्री. मश्रुवाला यांनी म्हटलें आहे की, "सध्याच्या भारतीय राज्याला 'महात्मा–राज्य' असण्याचा अधिकार सांगतां येणें अशक्य आहे. म्हणून श्री. गोडसे यांच्या बाबतींत राजकीय आणि व्यवहारीं तारतम्याचा निर्णय घेऊन दया करण्याचा आपला अंतिम अधिकार चालविण्याचें या राज्यानें नाकारले तर त्याला दोष देणें कठीण होईल." याप्रमाणे शुद्ध गांधीतत्त्व, स्वतः गांधीजींचा आदर्श आणि गांधी नसतांना व्यवहारी आणि राजकीय पद्धतीनें चालणारें सरकार यांच्यासंबंधांत श्री. मश्रुवाला हे स्पष्ट भेद मानतात. ते असेंहि म्हणतात की, "स्वतः गांधीजी असते तरी त्यांच्यावर या प्रसंगानें एक विलक्षण वैचारिक पेच आला असता. तो असा की, गोडसे याला दया दाखविणें म्हणजे इतर खुनी लोकांना देहान्त शिक्षा दिली तरी अहिंसक महात्म्याचा अपवाद करून त्याच्या बाबतींत मात्र खुनी मनुष्याला देहान्त शिक्षा देऊं नये. ही विसंगति करण्याचें धैर्य गांधीजी हे महात्मा असल्यामुळे केवळ त्यांच्यांतच होते."

## चुकीची विचारसरणी

हा पेंच दाखवितांना श्री. मश्रुवाला एक अटळ सिद्धान्त मांडतात. तो असा की, गोडसे याची देहान्त शिक्षा कमी केली याचा तर्कशुद्धरीत्या अर्थ असा होतो की सरसकटपणे देहान्त शिक्षाच मुळी रद्द केली पाहिजे; कारण जगांतील सर्वश्रेष्ठ अशा महात्म्याच्या खुनी मनुष्यास जर फाशी द्यावयाचें नाही तर सामान्य खुनी मनुष्यास फाशी काय म्हणून द्यावयाचें? हा कोटिक्रम करतांना श्री. मश्रुवाला यांनी हत्तीच्या पावलांत सर्व पावलें येतात असा न्याय लावला आहे; म्हणून फाशीची शिक्षा मुळांतच ज्या सरकारनें रद्द केलेली नाही त्या सरकाराला गांधीजींच्या खुन्याला कसें सोडतां येईल? असा प्रश्न श्री. मश्रुवाला यांच्या मनांत आहे असें दिसतें. पण गांधीजींचें उदाहरण हें जसें अपवादात्मक, तसाच त्यांचा खूनहि अपवादात्मक व म्हणून त्याचा दाखला इतर सामान्य खुनी आरोपीच्या बाबतींत न लावणें हेंहि शक्य आहे; ही गोष्ट श्री. मश्रुवाला यांनी ध्यानांत

घेतलेली दिसत नाही. तसेंच स्वत: गांधीजी हे फाशीची शिक्षाच नसावी असेहि मानणारे होते म्हणून त्यांच्यावरहि जो एक कल्पित पेचप्रसंग श्री. मश्रुवाला यांनी लादला आहे तोहि अयुक्त वाटतो.

## कुप्रसिद्धीचें भय कशाला?

श्री. मश्रुवाला यांनी म्हटलें आहे कीं, राम आणि रावण तसेंच कृष्ण आणि शिशुपाल हीं नांवें जशी जोडीने इतिहास-पुराणांत संबद्ध झालेलीं आहेत त्याप्रमाणेंच गांधीच्या नांवाबरोबर गोडसे याचेंहि नांव चिरस्थायी झालें आहे. (Like Shishupal and Ravan Godse has made a name which might live as long as Gandhiji's.) इतर खुनी मनुष्यांच्या संबंधांत अशी चिरंतन नांव राहण्यासारखी परिस्थिति नसते. हा भेद गांधीजींवरील व सरकारवरील काल्पनिक पेचप्रसंग मांडतांना श्री. मश्रूवाला यांच्या बरोबर ध्यानांत यावयास पाहिजे होता. "श्री. गोडसे यांच्याबरोबरच फांशीची शिक्षा झालेल्या आपटे यांना फाशीची माफी द्यावी" असें म्हणतांना त्यायोगें फाशीची शिक्षाच रद्द करावी लागेल अशी आपत्ति येते असें मश्रुवाला यानां वाटलें नाही. मग गोडसे यानां माफी दिल्यावर मात्र सर्वच खुन्यांना फाशी न देण्याचा नियमच केला पाहिजे अशी आपत्ति तरी श्री. मश्रुवाला हे का मानतात तें समजत नाही. श्री. गोडसे यांचे नांव चिरंतन गांधीबरोबर राहणार हें जर खरें तर मग देहान्त शिक्षेची गोष्ट ही त्याच दोन नांवांच्या अनुषंगाने लोकांच्या स्मृतीत चिर-स्थायी होणार. शतकानुशतकें गांधीजीच्या नावाबरोबरच शिशुपाल आणि रावण याप्रमाणें श्री. गोडसे यांचें नांव राहणार, त्यांच्याच मागोमाग गांधी-जींच्याच प्रभावळीने स्थापन केलेल्या सरकारने नथुरामला फांशी दिलें किंवा दिलें नाहीं ही गोष्ट आठवणीत राहाणारच, ती कोणत्या प्रकारे राहावी हा काय तो प्रश्न आहे. त्याचा उलगडा श्री. मश्रुवाला यांचें सर्व विवेचन वाचल्यानंतरहि होत नाही. पण यासाठी आम्ही त्यांना दोषदेत नाही; कारण प्रश्नच तसा बिकट आहे. त्याचें श्री. मश्रुवाला यांनी केलें तेवढयाहि मोकळया मनाने विवेचन इतरांच्या हातून होणार नाहीं.

## 'याचना-प्रतियोगी' दया

शिशुपाल आणि रावण यांच्याप्रमाणें गोडसे यांचें नांव राहणार व त्या नांवाबरोबर त्याला फाशी दिलें ही गोष्टहि राहणार. म्हणजे आक्रमक, प्राणघातक माणसाला क्षमा करावी हें तत्त्व उच्चतत्त्वनिष्ठ माणसांच्या निकटवर्ती अनुयायांनादेखील बाजूला ठेवावें लागतें हीहि गोष्ट, सुईमागून दोरा येतो त्याप्रमाणे, लोकांच्या मनांत येणार. श्री. मश्रुवाला यांच्या मतानुसार केवळ आपटे यांनाच दया दाखवली तर याचना करणाऱ्यास दया आणि अयाचकास रोखठोक व्यावहारिक न्याय, असाहि भेद लोकांच्या ध्यानांत नित्य राहणार. म्हणजे दया ही 'याचना-प्रतियोगी' असते असेंहि मानावें लागणार. उलट माफी दिली तरीहि नांव राहणार नाही असें नाही; कारण गोडसे यांच्या नांवाची आठवण ही गाड्याबरोबरच्या नळयाप्रमाणे गांधींजीच्या थोरपणावर अवलंबून आहे. गोडसे आणि आपटे या दोघांचींहि नांवें फाशी द्या अगर न द्या, त्यांच्या कृत्याच्या भयानकपणामुळेच लोकस्मृतीत राहतील. गोडसे यांच्या नांवाइतकेंच आपटे यांचें नांव उरूं देण्याचें कारण नाही म्हणून त्यास माफी करावी असा कोटिक्रम मश्रुवाला यांनी केला आहे तो आम्हांस विचित्र वाटतो. नांव कोणाचें आणि कसें राहील या विषयाची गुंतागुत मश्रुवाला यांनी या माफीच्या प्रकरणांत अगदी निष्कारण आणून सोडली आहे असें आमचें स्पष्ट मत आहे. श्री. मश्रुवाला यांच्यासारख्या, गांधीजींच्या शिकवणीनें अंतर्मुख झालेल्या, थोर विचारी लेखकाला जेथे अनेक भावनावश भ्रमांनी सोडलें नाही तेथें सामान्यांची काय कथा!

## संदेही वृत्ति नको

गांधीजींसारखा पुढारी हा पाठीराखा असतांना भावी कालाविषयीं जो एक प्रकारचा नितांत विश्वास त्याच्या भक्तांना वाटत असे तो आतां डळमतो आहे की काय याची शंका येते. आपटे यांना माफी देण्याविषयीं जो कोटिक्रम मश्रुवाला यांनी केला आहे त्यामध्ये ही संदेहवृत्ति सूक्ष्म रीतीने पाहिल्यास दिसून येते. मश्रुवाला म्हणतात की, "आपटे याना गोड़से यांच्या बरोबरीला आणून बसवूं नये असें मला वाटतें. गोडसे यांना वीर आणि हुतात्मा मानणाऱ्या लोकांचा एक वर्ग आहे. ही मनोवृत्ति विपरीत होय,

पण ती आहे हें खरें. आपटे यांना गोडसे यांच्याइतकें महत्त्व (इम्पॉर्टन्स) मिळावें हें योग्य दिसत नाही." या वाक्यावरून एक प्रकारचा संदेह दिसतो. पण तो घालविण्यासाठी पुढील वाक्यांत लगेच गोडसे यांचें महत्त्व हें रावण-शिशुपालांच्या हीन प्रतीचें असें त्यांनी म्हटलें आहे. मग या कुप्रसिद्धींत गोडसे यांच्याबरोबर आपटे आले तर काय बिघडलें? आपटे हें गोडसे यांच्या दुष्कीर्तीतील भागीदार होऊं नयेत, याविषयी काळजी करण्याचें काय कारण? इम्पॉर्टन्स (महत्त्व) या शब्दाच्या जागीं नोटोरायटी (कुप्रसिध्दि) हा शब्द मश्रुवाला यांना घालता आला असता. तो त्यांनीं घातला नाही, म्हणून असें वाटतें कीं, भावी कालांत गोडसे याची कुप्रसिध्दी कुप्रसिध्दीच राहील असा भरंवसा मश्रुवाला यांना वाटत नसावा. सरकारने गोडसे यांचें न्यायालयापुढील आत्मसमर्थन आक्षिप्त ठरविलें, यामध्येहि हीच संदेही वृत्ति दिसते. "इतिहास मला न्याय देईल" असें गोडसे यांनी न्यायालयापुढे म्हटले. हा भावी न्यायनिर्णय आजच्याप्रमाणेच प्रचंड बहु-संख्येनें गोडसे यांच्याविरुद्धच जाणार ही खात्री मश्रुवाला यांच्यासारख्या निष्ठावंतांनी तरी राखावी. म्हणून सध्यां दिसणारी त्यांची किंचित् संदेही वृत्तीहि मुळांत नाही किंवा असल्यास ती क्षणिकच ठरावी अशी आम्हांस आशा आहे.

ज्या रीतीनें गांधी-हत्येचें कृत्य करण्यात आलें आणि ते ज्या परि-स्थितींत करण्यांत आलें त्यावरून तें इतकें निर्घृण आणि दुष्टपणाचें आहे कीं, जगांतील सर्वसामान्य माणसाची सहानुभूति खुनी माणसाच्या बाजूला जावयास एकहि सबब नाही, असें मश्रुवाला यांनी म्हटलें आहे आणि तें खरें आहे. पण जिचा खून झाला ती व्यक्ति मात्र असामान्य होती आणि वाटेल त्या अपराध्याला क्षमा करावीं हें तत्त्वज्ञान आग्रहपूर्वक आजन्म प्रतिपादन करणारी होती. तसेंच न्यायाची बजावणी करण्याचें काम त्याच थोर व्यक्तीच्या नांवावर मिळालेल्या प्रतिष्ठेने राज्य करणाऱ्या अनुयायांच्या हातीं आलें आहे. म्हणून हा पेच निर्माण होतो. ब्रिटिश सरकार असतांना हा खून झाला असता तर आजच्या सारखा पेच निर्माण झाला नसता हें कल्पनेने कोणीहि जाणूं शकेल. आपल्या कृपेने राज्यावर बसलेल्या लोकांना

गांधीजींनी पोलिस आणि सैन्य ठेवून व्यावहारिक प्रतियोगी हिंसा वापरण्यास अनुज्ञा दिली होती. म्हणून दुसऱ्या एकाद्या पुढाऱ्यावरील प्राणघातक हल्याचा प्रश्न असता तर आजच्या सारखा पेच उत्पन्न झाला नसता. व्यावहारिक रीतीने वागण्यास इतरांना जरी गांधीजींनी सवलत दिली तरी स्वतःच्या बाबतींत मात्र ते आपल्यापुरता तात्त्विक अत्युच्च आदर्श मानीत म्हणूनच हा पेच आहे. नथुरामला फाशी दिल्यानें जी व्यावहारिक वैध हिंसा घडते ही देखील गांधीजीच्या स्वतःच्या उच्च आदर्शांत बसत नव्हती. गाधीजींच्या कृपाप्रसादाने राज्यावर आलेल्यांना जी व्यावहारिक सवलत इतर बाबतींत गांधीजींनी दिली होती तीच सवलत स्वतः गाधीजींच्या खुनाच्या शिक्षेच्या बाबतींतहि मानावयाची कां गांधीजींचा आदर्श मानावयाचा, हा काय तो नेमका प्रश्न आहे. त्याहि एका बाबतीत गांधीजीचा आदर्श सोडला तर मग तो आदर्श व्यवहारांत कोठेंच उरत नाही; अशी आपत्ति येणार नाही काय? गोडसे यांना वीर आणि हुतात्मा मानणारे थोडे कोत्या बुद्धीचे दुष्ट लोक आहेत, त्यांना नथुराम यांच्यां फाशीने बल येईल कां येणार नाही? बरें, माफी देण्याने तरी हा विपरीत बुद्धीचा वर्ग किती शमेल आणि विरमेल? या भावी अंदाजांच्या सदिग्धपणाची भेसळ या पेचप्रसंगांत होऊन तो अधिकच बिकट झाला आहे. म्हणूनच या जटिल प्रश्नांत प्रकटपणें बोलूं नये असें पुष्कळ विचारीं लोकांना वाटतें.

## गांधीजींचा एक ठळक दाखला

नथुरामला वाचवल्याने कांही लोक सरकारला दुबळें ठरवतील ही गोष्ट मश्रुवाला यांना अनिष्ट वाटते. पण असले लोक सर्वच उच्च कोटीच्या अहिंसकांवर दुबळेपणाचा खोटा आरोप नेहमी करतात. त्याचें निमित्त करून अहिंसकांनी आपला आदर्श सोडावयाचा काय? स्वतः गांधीजींना मरण्यापूर्वी कांही क्षण तरी बोलण्यासारखीं संधि लाभली असती तर त्यांनी आपला खून करणारास क्षमाच केली असती. स्वामी श्रद्धानंदजी यांनाही अखेरचे शब्द उच्चारण्याइतकी चेतना त्यांच्या खुनी इसमानें केलेल्या गोळीबारानंतर उरली नव्हती. पण यासंबधी १९२६ च्या काँग्रेस अधिवेशनांत स्वतः गांधीजी म्हणाले की, स्वामीजीचे अखेरचे शब्द आपल्यास उपलब्ध

नाहीत. पण मी त्यांचें अंतरंग ओळखलें होतें तें खरे असेल तर, 'आपण काहीं वाईट गोष्ट करतो, अशी ज्या खुनी माणसाला जाणीव नाही त्याला क्षमा कर' अशी प्रार्थना आपल्या देवापाशी श्रद्धानंदजींनी केली असली पाहिजे याविषयीं मला मुळीच शंका नाही." श्रद्धानंदजी हे हुतात्मे झाल्यामुळें त्यांच्या मृत्यूबद्दल मी शोकहि करीत नाही असें गांधीजींनी म्हटले होतें. "अबदुल रशीद याची मी वकिली करूं इच्छितों. तो कोणीहि असो आणि त्याचा उद्देश कांहीहि असो, सारा दोष आपला आहे. म्हणजे वैरभाव पसरवणाऱ्या वृत्तपत्रांचा आणि सुशिक्षित पुढाऱ्यांचा आहे," असेंहि गांधीजींनी सांगितलें आणि अबदुल रशीदला 'भाई अबदुल रशीद' म्हणून संबोधलें. नथुराम यांना हुतात्मा मानणाऱ्या तुरळक लोकांच्या मानानें 'भाओ' म्हणून अबदुल रशींदचा जयजयकार करणाऱ्या लोकांची संख्या किती तरी प्रचंड होती. तरीहि अबदुल रशीदला फाशी देऊं नये अशीच आपली इच्छा गांधीजींनी प्रकट केली होती. गांधीजींचें तत्त्वप्रतिपादन आणि आचरण अशा प्रकारे पूर्वी झालेले असल्यामुळें सध्याच्या बिकट समस्येत अधिकच भर पडली आहे. अबदुल रशीदनें न्यायालयापुढें असें स्वच्छ सांगितलें होतें की, "स्वामी श्रद्धानंदांनीं मुसलमानांना दुःस्थितीत लोटलें म्हणून मी त्यांचा बळी घेतला." या कृत्याबद्दल आपल्यास स्वर्गप्राप्ति होईल असाहि विश्वास त्यानें प्रकट केला होता, नथुराम गोडसे यांची भूमिका कडवी असली तरी त्या मानानें पुष्कळच विस्तृत "प्रज्ञावाद" सांगणारी आहे. हे प्रज्ञावाद फोल असले तरी जप्त करण्याइतके ते लोकांचीं मनें विपरीत रीतीनें भारून टाकणारे आहेत असें सरकारलाहि वाटले. गोडसे हे दयेची याचना करीत नाहींत यामुळें तर व्यावहारिक माणूस अधिकच घोटाळयात पडतो. दया न मागणाराला दया कशाला दाखवायाची ? त्यांना उपरतीहि झालेली नाही. श्री रामदास गांधींच्या पत्रव्यवहारानें तसा कांहीं संभव दिसला असता तर नथुराम यांना वांचवण्यास ही एक सबब कांहीं अंशी आधारभूत झाली असती. पण तोहि आधार नथुराम यांनीं ठेवलेला नाहीं. सारांश, नथुराम यांचें एकंदर वर्तन हें कोडें सोपे करण्याऐवजीं गहन करीत आहे. नथुराम यांना फांशी दिल्याबद्दल सरकारला दोष देता येणार नाहीं ही मश्रुवाला यांनी दिलेली अकरणरूप मान्यता

आम्हांसहि पटते, पण उलट माफी दिल्यानें मात्र सरकार दुर्बल ठरेल असें आम्हास वाटत नाहीं. नथुराम यांना सरकारनें माफी देणें म्हणजे गांधीजीच्या बाबतींत तरी गांधीजीची तत्त्वनिष्ठा पुरेपूर पाळण्याचा मानसिक सबळपणा व्यक्त करणें होय. हा सबळपणा नथुराम यांना जीवदान देण्यानेंच अधिक दिसेल. तसेंच त्यायोगे, नथुराम यांना हुतात्मा करूं पाहणारे मूठभर लोक लंगडे पडतील. जन्मठेपीच्या जीवनाचा क्षुद्र लाभ नथुराम यांना झाला तरी क्षमाशील गांधीतत्त्वज्ञानाच्या यशापुढें तो लाभ निर्माल्यवतच ठरेल.

## तारतम्याचा निर्णय

असो! अशा प्रकारच्या बिकट पेचप्रसंगांत एक पर्याय शंभर टक्के चांगला आणि दुसरा शंभर टक्के वाईट असें कधीच नसतें. जें तारतम्य असतें ते फारच सूक्ष्म आणि एकेका विचारानें इकडून तिकडे झुकणारें असें असते; म्हणून नथुराम यांना फांशी दिलें तरी सरकारला बोल लावतां येणार नाही आणि जीवदान दिलें तर तोहि सरकारच्या आंतरिक सबळ-पणाचा पुरावाच ठरेल एवढे तारतम्य सूचित करण्याविना दुसरा कांहीं एकेरी निर्णय सध्या तरी आम्हांस देतां येत नाही. या विषयांत मत प्रकट करणें अवघडच होतें म्हणून तें इतके दिवस प्रकट करण्याचें आम्ही टाळले; पण या प्रकरणाचा सोक्षमोक्ष आता समीप आल्यानंतर आणि श्री. मश्रुवाला यांच्या सारख्यांनीं या विषयाचा योग्य प्रकारे उपन्यास केल्यानंतर वर दिल्याप्रमाणें तारतम्य याच वेळीं प्रदर्शित करणें हें अयोग्य ठरणार नाहीं असें आम्हांस वाटतें.

--केसरी दि. ४-११-१९४९

---

# अहिंसा निरपेक्ष का सापेक्ष ? (पुढें चालू)

गेल्या लेखामध्ये श्री. मश्रुवाला यांच्या गोडसे-आपटे विषयक 'हरिजन' मधील लेखांतील मुख्य विचारप्रवर्तक भागासंबंधाची चर्चा आम्ही केली. ती लांबल्यामुळे श्री. मश्रुवाला यांच्या लिखाणांतील एक-दोन उल्लेखनीय आणि विवेचनीय अंश अस्पृष्ट राहिले; पण त्यांचेंहि महत्व उपेक्षणीय नसल्यामुळे त्यांचा थोडा परामर्ष आज घेत आहोत. गांधी-जींच्या मृत्यूला आपण सर्वच कारणीभूत आहोत' असा धाडसी आणि ता-त्त्विक स्वरूपाचा निर्णय मश्रुवाला यांनी केला आहे. या कारणीभूतपणांतून मश्रुवाला हे गांधीजींच्या निकटवर्ती अनुयायांना देखील वगळीत नाहींत. मौ. आझाद यांनीहि याच प्रकारचा विचार गांधीजींच्या मृत्यूनंतर लगेच केलेल्या भाषणांत मांडला होता; पण त्या वेळी त्यांनी या विचाराची अधिक फोड केली नाही ती श्री. मश्रुवाला यांनी केली आहे. ते म्हणतात की, गांधीजीं-च्या मृत्यूपूर्वी कांही दिवस त्याचें जिवितकार्य संपुष्टांत आलेलें आहे असें अनेकांना वाटत होतें, आणि कित्येकांनी त्यांना सार्वजनिक जीवनातून निवृत्त होण्याची सूचनाहि केली होती. विचाराचें सामर्थ्य हें बंदुकींच्या गोळीपेक्षाहि अधिक असतें, गांधींनी आपले सार्वजनिक जीवन संपवावें असें आपणास

वाटत नव्हतें असें म्हणण्यांत कांही अर्थ नाही. अनेकामध्ये विखुरलेला हा विचार एकत्रितपणें गोडसेच्या मध्यें अवत्तीर्ण होऊन या विचारानें गोडसेला आपल्या अंमलबजावणीचें साधन बनविले असें मश्रूवाला यांनीं म्हटले आहे. . " गोडसेच्या हातानें उडविलेल्या गोळयामध्यें आपलीही भागीदारी आहे हे आपण मान्य केलें पाहिजे. गोडसे–आपटे हें दोघे हजारों लोकांच्या मनांचे माध्यम किंवा साधन होते असें म्हणतां येईल." हीं मश्रूवाला यांची वाक्ये इतर कोणीं लिहूं शकला नसतां. अर्थात् व्यवहारबुद्धीनें चालणारें सरकार हें या उच्च भूमिकेपर्यंत जाऊं न शकले तर त्या सरकारला दोष देतां येणार नाहीं असें मश्रूवाला म्हणतात; पण सरकारनें जर गोडसे–आपटे यांचे अथवा त्यांच्या मित्रांचें दयेचे अर्ज मानले तर आपल्याला आनंदच होईल, हेंहि त्यांनी स्पष्ट केलें आहे.

## गांधीभक्तांचा मिथ्याचार

सार्वजनिक जीवनांत हजारोंना नकोसें झालेलें गांधीजी गोडसे–आपटे यांनी भयानकरीत्या नाहीसे केले. असें हजारोंच्या इच्छेचें भयानक प्रतिनिधित्व इतर सामान्य खुनी लोकांच्या बाबतींत दाखवितां येतें काय ? एका इच्छेचा अयोग्य मार्गानें झालेला अचानक आणि परभारे परिपाक असे स्वरूप जर मश्रूवाला यांच्या मताप्रमाणे गोडसे–आपटे यांच्या कृत्याला असेल तर तें असामान्य आहे. म्हणजे त्याचा विशेषरीत्या विचार करून फांशी देण्याचें टाळण्यास सरसकट फांशीची शिक्षाच मुळी सोडावी लागेल, ही मश्रूवाला यांची भीति त्यांच्याच द्वार प्रतिपादनावरून निरर्थक आणि निष्कारण ठरतें. ताक नको असें म्हणणाऱ्या सासूबाईचा एकमेव अधिकार गाजवण्यासाठी इतरांचा नकार त्याना बोचतो. विशेषतः इतरांनी हा नकार दुष्टपणाने ताकाचे भाडेच फोडून दिला म्हणजे त्यांना अधिक राग येतो. गांधी हजारोंना सार्वजनिक जीवनात नकोसे झाले होते; पण गोडसे–आपटे यांनी अघोरीपणाने त्यांना बाजूला सारण्याचें दुष्कृत्य केल्याबरोबर ते हजारो लोक ही पूर्वीची भावना विसरले, अथवा ती भावना अनेक कारणांनी दबून जिरून गेली, आणि ते सोयीस्कर रीत्या गांधीजींच्या पुढील सार्वजनिक जीवनाची नितान्त आवश्यकता होती असें म्हणूं लागले. बरें, हे हजारो

लोक पाया पडले असते तरी गांधीजींनी या हजारोंच्या दृष्टीने उपयुक्तता संपलेलें सार्वजनिक जीवन संन्यास घेऊन म्हणजे निवृत्त होऊन संपविलें असतें काय? पूर्वी तुरुंगांत असणाऱ्यांना कौन्सिलप्रवेश मनांतून हवा होता. तें सुटेपर्यंत कौन्सिलप्रवेशाला मान्यता मिळण्याचें काम परभारे होऊन जावें आणि बंदीवास श्रेयाच्या जोरावर त्यांना सुलभतेने कौन्सिलप्रवेश मिळावा असें त्यांस वाटत असे. हे काम अप्रियता पत्करून आणि शिव्या खाऊन श्री. केळकरांनी चालविले असतां तुरुंगांतील व्यक्तींना आतून आनंदाच्या गुदगुल्या होत. बाहेर अर्थात् धोपट मार्गाने केळकरांच्या प्रतिगामीपणाला ते शिव्या देत. हा जसा एकप्रकारचा मिथ्याचार होता, तसाच मिथ्याचार नथूरामला फाशी देण्याचा आग्रह धरणारे गांधीभक्त करीत आहेत असें म्हणावें लागेल, मश्रूवाला यांच्या कोटीक्रमावरून सरळपणे वरील सिद्धान्त निघतो

## मश्रूवाला यांचा गैरसमज

मश्रूवाला यांच्या लेखांतील शेवटच्या छेदकात त्यांचा एक गैरसमज प्रकट झाला आहे. तो होण्याचें कारण काही वृत्तपत्रांचा आणि वृत्तसंस्थांचा मतलबी आणि खोटा प्रचार हें आहे हिंदुमहासभेचे ' कांही ' अधिकारी गांधीजींची तत्त्वें सांगून नथूरामाला माफी देण्याची खटपट करीत आहेत असें ' थत्ते ' यांच्या स्वयंभू, एकाकी आणि अप्रातिनिधिक प्रयत्नावरून ते म्हणत आहेत. पण थत्ते यांना एरवी प्रसिद्धि न देणाऱ्या वृत्तसंस्थांनी त्यांचें हिंदुसभेचें प्रतिनिधित्व एकदम गृहीत धरून त्याची मोथिस्कर प्रसिद्धि केली दुसऱ्या कोणाहि हिंदुसभेच्या अधिकाऱ्याने गोडसे यांना माफी मिळण्याचा प्रयत्न केलेला नाही, किंवा कोणत्याहि हिंदुसभेने यासंबंधीं ठरावरूपाने मत-प्रदर्शन केलें नाहीं. गांधीजींचीं क्षमेचीं तत्त्वें मान्य नसतां त्या क्षमातत्त्वांच्या आधारें थत्ते यांनी नथूरामला माफी मिळण्याबद्दल भडकपणे प्रचार करणें ही प्रतारणा (हिप्रॉक्रसी) आहे हें मश्रूवाला याचें म्हणणे आम्हांस मान्य आहे. या ' हिपॉक्रसी 'बद्दल त्यांनी प्रकट केलेल्या सात्त्विक संतापाशींहि आम्ही सहमत व सहभागी आहोंत. औचित्य आणि सूसंगति ही ' पब्लिसिट्टी ' च्या मोहाने कोळून पिणाऱ्या ' थत्ते ' यांच्यासारख्या लोकांना हिंदुसभेसारख्या लोकशाहीच्या संस्थेमध्यें प्रवेश देण्याचें थांबविता येत नाही.

मात्र थत्ते यांना मुंबई प्रांतिक हिंदुसभेचा पाठिंबा मुळीच नाही. हे मु. प्रां. हिंदुसभेचे अध्यक्ष आणि कार्यवाह यांनीं प्रकट केले असतां सध्याच्या मतलबी प्रसिद्धिसंस्थांनी त्या इनकाराला योग्य प्रसिद्धि दिली नाही. यामुळें थत्ते यांच्यावरून "Some of the office-beareres of the Hindu Mahasabha" असा सर्वसामान्य उल्लेख मश्रूवाला यांनी केला. वायुमानाच्या प्रकृतीवरील इष्टानिष्ट परिणाम जसे अटळ आहेत, तसेच प्रसिद्धिदैवताच्या छद्मीपणानें उत्पन्न होणारे अपसमजहि कसे अटळ आहेत व मश्रूवाला यांच्यासारखे निर्विकार विचार करणारे लोकहि त्यांतून मुक्त राहूं शकत नाहीत एवढेंच " त्यांवरून दिसते. त्याची केवळ नोंद करण्यापलीकडे आम्ही मश्रूवाला यांना कांहीहि दोष देऊं शकत नाही.

## कालक्षेपाच्या सुलभतेसाठीं

गांधींची निस्सीम क्षमावृत्ति सोडली व केवळ " political & Prudential " म्हणजे व्यवहारी तारतम्याची दृष्टि ठेवली तरी नथूरामला फांशीची माफी देण्यास पुष्कळ इतर कारणेंहि आहेत. वैयक्तिक " Extenuating circumstances " म्हणजे दयेच्या सबबी नाहींत हें खरें; पण सार्वजनिक जीवनाच्या दृष्टीने नथूराम हा केवळ कालपक्व नियतीचे आणि हजारोंच्या इच्छाशक्तीचे एक भयानक स्वरूपाचे प्रतीक ठरतात, हे मश्रूवाला यांच्या विवेचनावरून म्हणतां येते. ही कारणमीमांसा सुचणे ही कांहीं निस्सीम क्षमाबुद्धि नव्हे.म्हणून गांधीजींची निस्सीम क्षमाबुद्धी मान्य नसणारांनाहि केवळ व्यवहारिक विचारानी कालपरिस्थितीकडे लक्ष देऊन नथूरामला फांशी न देणे हे व्यावहारी आणि राजकारणी कालज्ञतेचें कृत्य म्हणून देखील पुरस्करता येण्याजोगे आहे; म्हणजें तशी शक्यता आहे स्वतःला क्षमाबुद्धि मान्य नसतां गांधीजींच्या क्षमाबुद्धीला आवाहन करण्याचा थत्ते यांचा अप्रयोजकपणा त्यासाठीं केलाच पाहिजे असें नाहीं.

व्यावहारिक राजकारणी दृष्टीने अनेक खुनी आजवर सुटलेंले नाहींत असें नाहीं. कुलाबा जिल्ह्यांतील पटवर्धन यांचा क्रूरतेने सुऱ्याने चोचावून खून करणाऱ्या पठाणाला माफी देण्यांत आली. सोलापूरच्या कुळकर्णी वकिलांचा असाव अमानूष खून झाला. पण त्याबद्दल फांशीं झाली नाहीं. मलबारांतील रामसिंहन कुटुंबाचा भयानक संहार झाला, पण कच्च्या पुराव्या-

मुळें अपिलांत सर्व आरोपी सुटले. स्वतःच्या पत्नीला माडीवरून खाली ढकलून तिचा जीव घेणारा नवराहि कच्च्या पुराव्यामुळे सुटूं शकतो यांचें उदाहरण लोकांच्या परिचयाचे आहे. नथूरामाने ३० जानेवारीची घटना सरळ मान्य न करतां कमून उलट तपासणी करून कांहीं संशयाचें जाळे त्याला क्वचित् निर्माण करता आले असतें:तसा त्याला कांही लोकांनी सल्लाहि दिला होता. पण तो त्यानें मानला नाही, शुद्ध व्यावहारिक दृष्टचा या सरळपणा-चाहि विचार माफीला अनुकूल होणें शक्य आहे. नथूराम गोडसे याच्या कृत्याचे निमित्त होऊन मूडबुद्धीने एकाच घरातील तीन निरपराध व आड-नांवाचें गोडसे ठार होऊन एकाच दिनी वंशक्षय झाला; पण पुराव्याच्या अभावी खुनी लोक सापडले नाहीत. याच दंगलीतील अनेक खुनी अशोधित किंवा संदिग्ध पुराव्यामुळें अदंडित राहिलें आहेत. या गोष्टींचाहि ' व्याव-हारिक ' बुद्धीनें विचार येऊं शकतो; मात्र क्षमाबुद्धीचा निर्णय जसा बिन-धोक असतो, तसा या व्यवहारी तारतम्याचा नसतो, ते दोहो बाजूस झुकूं शकतो. तथापि आतां गव्हर्नर जनरल यांनी आपला निर्णय दिला असल्याने वरील विवेचन हे केवळ तात्त्विक विचाराची मीमांसा करण्यापुरतेंच उप-युक्त होय.

---

--केसरी दि. ८-११-१९४९

## फांशीं निर्णयाची बोधक संगति

महात्मा गांधीच्या खुनाच्या खटल्यांतील न्यायालयांच्या रीतसर निर्णयामध्ये, दया बुद्धीने अथवा दयाबुद्धीच्या नांवाने कांही सौम्यता किंवा बदल करणें ही गोष्ट गांधी मार्गीय राज्ययंत्र, विहित किंवा उचित मानीत नाही, ही गोष्ट एकदाची स्पष्ट झाल्याने जनमनांतील याविषयीची भवति -- न -- भवतीचा कोलाहल शान्त होईल. यांत प्रामुख्याने दिसून येणारी गोष्ट ही की, राज्ययंत्रांतील सूत्रचालकांनी यासंबंधीच्या मतमतान्तरांचा योग्य तो विचार करून ठामपणे निर्णय घेऊन ठेवला होता आणि वेळ येतांच तो निश्चयाने प्रकट केला; तसेंच त्यामध्ये एक राजनीतीला अत्यावश्यक अशी सुसंगति आहे. ती अशी की, नित्याच्या न्यायनिवाडयांचा मार्ग सरकारानें या कामांत अगदी रीतसर चालू दिला. त्या मध्ये कोणतीच ढवळाढवळ केली नाही. सामान्य आरोपींना जे बचावाचे मार्ग आणि न्यायशोधनाचे क्रम उपलब्ध असतात ते सर्व महात्मा गांधीसारख्या सर्वश्रेष्ठ राष्ट्रीय पुढाऱ्याच्या खुनी आरोपींना मोकळे होते आणि ते सर्व मार्ग नि क्रम यथासांग संपले. मग लहानमोठ्या प्रत्यक्ष शिक्षा अंमलात आणण्याचा पुढचा कार्यभागहि तसाच सरळपणे होऊं देण्याचें राज्यसूत्रचालकांनी ठरविलें यांत वैषम्य कोणालाहि दाखविता यावयाचें नाही.

## हे राज्याचे अपराधी

ज्यांना याहून कांही वेगळें व्हावें असें वाटत होतें त्यांनीच खरोखर विसंगति किंवा वैषम्य ही या अखेरच्या पायरीला इष्ट मानलीं असें उलट म्हणावें लागेल. गांधीजी झाले तरी राज्याचे एक नागरिक होते. त्यांचा खून झाल्यवर खून करणारे अरोपी हे गांधी -- विरोधी नसून, सरकार - विरोधी झाले. वैध अपराधशास्त्रात सार्वजनिक अपराध आणि वैय-क्तीक अपराध असे दोन स्पष्ट विभाग आहेत. सध्याच्या प्रचलित दंड विधानामध्ये, केवळ भारतांतच नव्हे, तर इतर सुधारलेल्या देशांतहि मनु-ष्यहत्या हा अपराध मुख्यत. राज्याविरुद्ध म्हणून मानला जातो. न्याया-लयीन कागद पत्राच्या मथळयावर कांही 'गांधीजीविरुद्ध गोडसेप्रभृति आरोपी' असा मथळा नव्हता. "सरकारविरुद्ध गोडसेप्रभृति आरोपी" अस मथळा होता. कांही मागासलेल्या देशांतील न्यायपद्धतीमध्यें खुनी ठरलेल्या मनुष्याला झालेलें देहान्त शासन खून झालेल्या मनुष्याच्या वार-सांना वा आप्तांना स्वहस्तें वाटेल त्या मार्गाने करण्यांस मोकळीक देण्यांत येते. पण आजच्या न्यायशासनाने तशी वैयक्तीक बदल्याची कल्पना मागे टाकली आहे. मनुष्यहत्या हा अपराध राज्याचा आहे. त्याचें शोधन आणि निराकरण ही दोन्ही कामें राज्याचीं आहेत, कोणा व्यक्तीचीं नव्हेत.

## सर्वमान्य दंडविधान

न्यायालयीन उल्लेखांत "श्री. मोहनदास करमचंद गांधी या नांवाची व्यक्ति 'महात्मा' म्हणून लौकिक दृष्टया प्रसिद्ध असलेली" असें वर्णन आले तें सामान्य लोकांना विचित्र भासेल. पण 'मनुष्यहत्या' हेंच स्वरूप न्यायालय जाणते. तशी हत्त्या करण्याने राज्याचा अपराध होतो; कारण मनुष्यजीविताचें रक्षण करणें ही राज्याची प्राथमिक कर्तव्यता असते. यांत शिक्षा कडक वा सौम्य करण्याचीं कारणेंहि, केवळ मनुष्यता दृष्टीपुढे ठेवून तेवढीं मानलेलीं आहेत. या कारणांमध्ये आत्मरक्षण करण्याची आवश्यकता किंवा क्षोभाचें प्रबळ आणि तात्कालिक कारण यांचा अंतर्भाव होते. तशी कारणें या खुनामध्ये कोणतीच नाहीत. तसेच, न्यायालयाच्या कक्षेपलीकडे पडणारी दया बुध्दि आवश्यक वाटली तर ती न्यायाधीशच सूचित करतात.

पण असली मामुली दयाबुध्दि देखील या खटल्याच्या निर्णयामध्ये गोडसे--आपटे यांच्या फांशीच्या संबंधांत न्यायाधिशांनी सूचित केलेली नाही. म्हणजे आजच्या शासननीतीमध्ये सरळपणे गोडसे – आपटे यांना फांशी न देणें म्हणजे माफी देणें हें कोठेंच बसत नाही. ही शासननीति आज सुधारलेल्या देशांतहि मान्य आणि प्रचलित आहे.

## खोट्या भावनेचे खंडन

असें असतां, अमेरिकेंतील दौऱ्यामध्ये भारताच्या पंतप्रधानांना यासंबंधी शंका विचारण्यांत आली ती कां? शंकेला उत्तर देतांना पं. नेहरू म्हणाले, " काल देखील माझ्याकडे कांही लोकांनी याविषयी पत्रे धाडलेली आहेत. " या उल्लेखावरून पूर्वीं पासून अशीं अनेक पत्रें त्यांच्याकडे आलीं असलीं पाहिजेत हें उघड होते. आरोपींचे आप्तेष्ट ऋणानुबंधी, स्नेही इत्यादि लोकांना आरोपी वांचविता आले तर वाचवावे असें केवळ वैयक्तिक कारणांनीं शेवटपर्यंत वाटत असते, यांत कांही नवल नाही. तसेंच सामान्य हळुवार मनाच्या माणसांना कोणास केवळ फांशींच नव्हे तर बंदीवासाची शिक्षा रीतसरपणे झाली तरीहि वाईट वाटतें. या भोंगळया दयाबुध्दीला अपराधी आणि शिक्षा ही तेवढी समोर दिसते; पण त्याचा अपराध व त्यापासून झालेली हानी ही मात्र तिच्या दृष्टीआड असते. ज्यांची चोरी झाली त्याच्या मनाला किती यातना झाल्या असतील. ज्याला आरोपीने जखमी केलें त्याला किती वेदना सोसाव्या लागल्या असतील याचा विचार त्यांच्या भावनेपुढे उरत नाही. ज्यूरीमधल्या सामान्य माणसाना, पुराव्याने अटळ ठरलेला निर्णय द्यावा लागतो. पण तो अपराधीपणाचा असेल तर त्यांना उगीचच खिन्नता वाटत असते. वस्तुतः त्यांच्या निर्णयाच्या पूर्वी केलेल्या प्रत्यक्ष गोष्टीमुळे अपराध्यानेच शिक्षा आपल्यावर ओढवून घेतलेली असते. फांशी जाणाऱ्या माणसाचें अनिच्छेनें येणारें मरण लोकांना द्रव उत्पन्न करतें. पण ज्याची हत्या या फांशीं जाणाऱ्याने केली त्याची त्यानें पूर्वी हीच अवस्था केली नव्हती काय ? ही आत्मौपम्य बुद्धि ठेवून समाजांत एकाने दुसऱ्याचा घात करूं नये, केल्यास तें न सुचलेलें आत्मौपम्य पुढे कायदाच त्याला प्रात्यक्षिकाने दाखवितो!

## गांधीजींच्या थोरपणाचा विचार

महात्मा गांधी हे मोठे म्हणजे थोर पुरुष होते आणि देशाचे पुढारी होते, या गोष्टीमुळें तर गोडसे आपटे यांच्या देहान्त शिक्षा अमलांत येणें हें अधिकच आवश्यक ठरतें. माणसाच्या हातीं एकाला अनेक वेळां फांशीं देण्याचें नाही. मोठा मान दाखविण्यास जसें १०८ किंवा १००८ 'श्री' असें लिहितात तसें गोडसे-आपटे यांच्या फांशींचा उल्लेख करतांना '१००८ फांशीं' असा कोणी वाटल्यास उल्लेख करावा. पण गांधींसारख्या थोर पुढाऱ्याचा खून करणाराला फाशीं द्यावयाचें नाही तर मग सामान्य माणसांच्या खुन्यांना फांशीं देण्यास तरी काय समर्थन उरणार? अमेरिकेत दिलेल्या उत्तरांत पं. नेहरूंनी हाच विचार स्पष्टपणें मांडला आहे; आणि श्री. मश्रूवाला यांच्या लेंखातहि सरकारची बाजू मांडतांना तोच प्रामुख्यानें दिला आहे.

नथूरामला हुतात्मा मानणारे काही लोक आहेत असें मश्रूवाला म्हणतात तें सत्य आहे. ते थोडे असोत वा पुष्कळ असोत, लहान असोत वा मोठे असोत; पण त्यांच्याहि दृष्टीने हें हौतात्म्य नथूराम फांशीं गेल्यानेंच सार्थ होणार आहे. हें कृत्य केल्यानें फांशी होईल हें जाणूनहि, म्हणजे तो धोका पत्करूनहि, नथूरामनें आपल्या समजुतीनुसार देशाच्या व लोकांच्या हितासाठीं गांधींचा खून केला, अशी या हौतात्म्यवादी लोकांची समजूत. मग त्यांच्या मानीव हौतात्म्यांत देखील त्यांच्याच विचारसरणीने पाहतां फांशीची माफी झाल्यास कांहीच अर्थ राहणार नाही. हौतात्म्यवादी असूनहि माफी इच्छिणारे कोणी असतील असें आम्हांस वाटत नाही; कारण तशी त्यांनीं इच्छा करणें म्हणजे एकाच वेळीं पोळी पोटांत जावी आणि ताटांतहि तीच उरावी, अशा इंग्रजी म्हणीप्रमाणें अप्रयोजक अपेक्षा करणें ठरेल. असलें वर्तन अजाण व रडक्या मुलांना फार तर स्वाभाविक आहे, प्रौढांना नाहीं!

राहता राहिलें गांधीजींच्या निस्सीम व निरपवादी अहिंसेच्या आणि दयाबुद्धीच्या तत्त्वाचे अनुयायी किंवा निदान भोक्ते असलेले लोक. सर्व ठिकाणच्या गांधीपंथीय आश्रमांनी गांधींच्या खुन्यांना फांशी देऊं नये असें मत सरकारला कळविलें आहे; कारण या आश्रमांतून अशाच अनुयायांचा भरणा आहे. स्वत: गांधी असते तर त्यांनी या अपराध्यांना क्षमा केली असती

हाँच काय तो त्यांचा एकमेव कोटीक्रम किंवा आधारभूत विचार. अमेरिकेंत प्रश्न विचारणारांच्या मनांतहि हाच विचार असेल तो अमान्य करतां येत नाहीं.

## "सुक्ष्मा गतिर्हि धर्मस्य"

" धर्मांची गती सूक्ष्म असते " या वचनाची या वेळीं आठवण होते. गांधीजींनी क्षमा केली असती इतकेंच नव्हे तर इतरांच्या अशाच खुनांच्या संबंधांत स्वतः गांधींनी अशीच क्षमा पुरस्कारलीहि होती. 'गांधीजींची हत्या करणारालाही क्षमा करा ' हें म्हणतांना या निस्सीम गांधीभक्तांनां केवढा वैयक्तिक दुःखवेग आवरावा लागत असेल आणि सामान्य मनुष्य-स्वभावाला बधन घालावें लागत असेल याची सहज कल्पना करतां येईल. ते माफी करण्याची गोष्ट बोलत आहेत ती खऱ्या तत्त्वनिष्ठेनें बोलत आहेत व या तत्त्वनिष्ठेचा गौरव करावा तेवढा थोडा आहे; आजचे राज्याधि-कारीहि ही तत्त्वनिष्ठा दुरून गौरवतील, पण राज्यव्यवहारामध्ये ती तत्त्व-निष्ठा चालविणें हें आज आणि केव्हांहि अशक्य आणि अनिष्ट आहे. गोडसे–आपटेच्या फांशींच्या शिक्षा कायम ठेवून ते स्पष्टपणें हेंच सांगत आहेत. पंतप्रधान वा गव्हर्नर जनरल यांची गांधीभक्ती मोठी आहे, पण त्यांची आजची राज्यव्यवहारांतील रोखठोक कर्तव्यबुद्धि तितकीच किंवा त्याहूनहि अधिक मोठी आहे, म्हणून गांधीजींनी जे केलें असतें त्यांच्या प्रभावानें गादी-वर आलेल्या आणि भक्तिपूर्वक गांधीनामोच्चारानें चालणाऱ्या राज्याला करणें शक्य नाही. त्या राज्याला 'राज्यत्व खरेंखुरें टिकवावयाचें असेल तर आपल्या कारभाराचा ' सत्यअहिंसाश्रम ' त्याला कधीहि करतां येणार नाहीं. या राज्यनिर्णयाला केवढें तरी ऐतिहासिक आणि जागतिक महत्त्व आहे. म गांधींचें तत्त्व गांधींच्याच बाबतींत व नित्य गांधीनामोच्चारानेंच चाललेल्या राज्याला चालविणें इष्ट नाहीं व शक्य नाही असें म्हणणें आज अटळ होत आहे ही अत्यंत अर्थपुर्ण, विचारणीय व बोधप्रद घटना आहे. पंडित नेहरू हे सरळ बोलणारे असल्यामुळें त्यांना कोणी आणखी छेडल्यास तेहि वरील प्रणाणे स्पष्टीकरण केल्याविना राहणार नाहींत.

## ऐतिहासिक महत्त्वाचा निर्णय

गांधीजी आपल्या मरणापूर्वी सार्वजनिक संबंधांत नौखालीमधील अप-

राध्यांना जी क्षमाशीलता दाखवीत होते ती मोठी असेल किंवा असामान्यहि असेल, पण ती आजच्या भारतीय राज्याला गांधींच्या हत्येसंबंधांत देखील विहित व आचरणीय नाहीं, हा एका मोठ्या वैचारिक आणि सनातन समस्येचा निर्णय, गांधीजींच्या खुनी तरुणांच्या फांसावरील मरणानें लागणार आहे. तो भावी जागतिक तत्त्वचर्चेत आणि नीतिचर्चेत महत्त्वाचा म्हणून वारंवार उल्लेखिला जाणार आहे. शुद्धतत्त्वें व्यवहार सापेक्षतेनें मानतां येतील तेवढींच मानावी लागतील, एरवी सोडावीं लागतात हा त्याचा निष्कर्ष होय.

नथूराम हा नियतीचा केवळ एक हस्तक होता, या म्हणण्यानेहि कांहीं खरी सुटका होत नाही, कारण, 'यथा यक्षस्तथा बलिः' या न्यायानें फाशीं देणारे व ती अंमलात आणणारे हे दोघेहि त्याच नियतीचे प्रतिहस्तक म्हणून मानतां येतील; कारण सर्वच नियतीच्या अधीन आहेत म्हणून नियतिवादहि माफीचे समर्थन करण्यास लंगडा पडतो. 'मी जर दया दाखविली नाही तर मी तिची अपेक्षा उलट कां करावी ?' ही नथूरामची उक्तीहि बिनतोडच आहे. 'जशास तसें' या तत्त्वाचा योग्य अर्थानें गांधीखुनाच्या बाबतीतहि राज्यव्यवहार घडला म्हणजे तें तत्त्व निरपवादच झालें असे म्हणावें लागेल.

नथूरामनें कांही स्वतःच्या खासगी वैरासाठी गांधींना मारलें नाही, देशहितासंबंधाच्या विशिष्ट विचारसरणीमुळे त्यानें हें कृत्य केलें हें खरें; पण नेहरू–राजाजी हेहि कांही आज वैयक्तिकसूडबद्धीनें त्यांना फांशीं देण्याचें ठरवीत नाहींत. राज्याच्या रक्षणाची कर्तव्यता आपल्या मतीप्रमाणें चालविण्यासाठींच ते न्यायालयांचा निर्णय जशाचा तसा अमलांत आणण्याचें ठरवींत आहेत. नथूरामला माफी झाल्यानें गांधीजींचे निस्सीम क्षमाबुद्धीचें तत्त्व उजळ झालें असतें आणि असली क्षमाबुद्धि चालवून देशाची हानि करूं नये हा नथूरामच्या मतप्रणालींतील एक भाग पराजित झाला असता. नथूराम फाशीं गेल्यानें याच्या उलट प्रकार होईल. हा विलक्षण विरोधी पेच स्वराज्यापुढें पहिल्या पावलीच उभा रहावा ही घटना बोधक होय. या पेचाची अनेक स्वकीयांच्या मनाविरुद्ध राज्यानें केलेली सोडवणूक ही मात्र खऱ्या, स्थायी व योग्य राजनीतीला पोषक अशी होत आहे, हे फांशीच्या शिक्षा

अटळ ठेवण्याच्या निर्णयावरून दिसून येतें. फांशीं अटळ ठरण्यापूर्वी हे विचार इतक्या स्पष्टपणानें मांडले असते तर, अनेक हळुवार मनाच्या माणसांना उगीचच वाईट वाटलें असतें. 'अहो, दोन जीव वांचत असलें तर तुमचें काय वेचते? तुम्ही होऊन कशाला कठोरपणा सुचवितां?' असें त्यांनी म्हटलें असते. आतां फांशीं अटळ झाल्यामुळें आमच्या लिहिण्यानें कांही वाईट होण्याचा दूरचाहि संबंध राहिला नाही ! म्हणून आजच्या घटकेला मांडतां येईल तितक्या स्पष्टपणें, नीतिधर्म आणि राजनीति यांच्या दृष्टीनें आजच्या फांशीं-निर्णयाचें महत्त्व या लेखांत मांडलें आहे.

—केसरी दि. ४-११-१९४९

———

## देहान्त शासनाचे राष्ट्रीय बळी

वृत्तपत्रकर्त्याला एका दिवसापुरतें भविष्यवादी व्हावे लागतें, किंवा कालाच्या पुढें एक दिवस मनाने धावावे लागते, तों लिहीत असतो त्या दिवशी घडलेल्या घटनांना 'काल झाल्या' असे म्हणतो आणि दुसऱ्या दिवशीं होणाऱ्या घटनांना 'आज' होणार असें म्हणतो. त्या आवश्यकते-नुसार लिहावयाचें म्हणजे आज दि. १५ नोव्हेंबरला सकाळीं आठ वाजतां जगद्विख्यात महात्मा गांधीजींचे खुनी नथूराम विनायक गोडसे आणि नारा-यण दत्तात्रय आपटे हें पंजाबांतील अंबाला येथील तुरुंगांत फांशी जाणार. अनेक वाचकांच्या हाती हा अंक पडण्याच्या सुमारास आणि इतर अने-कांच्या हाती हा अंक पडण्याच्या पूर्वीच ही दुर्दैवी घटना होऊनहि जाणार. या घटनेचें हें दुर्दैव स्वयंभू नव्हे. १९४८ च्या ३० जानेवारीला सायंकाळी भारताच्या राजधानींत बहुसंख्य जनतेने राष्ट्रपिता म्हणून पूजिलेल्या राष्ट्र-पुरुषाचा-महात्मा गांधीजींचा-पिस्तुलाच्या साह्याने खून झाला, या मूळ दुर्दैवी घटनेचा, न्यायालयांचें डोंगर ओलांडून निघालेला, हा प्रतिध्वनि होय. अने-कांच्या मनांत या दोन्ही घटना आज जोडीने उभ्या राहतील.

### राष्ट्रीय नियतीचे तांडव

आणखी थोडा विचार करणारांच्या चित्तामध्यें या दोन्ही ध्वनि-प्रतिध्वनींचा मूळ निर्माता आघात येईल. तो आघात म्हणजे दि. ३ जून

१९४७ ला राष्ट्रीय नेत्यांनी मान्य केलेली आणि १५ ऑगस्ट १९४७ पासून भयानक दुष्कृत्यांच्या साथीने कृतीत उतरलेली देशाची चिरफाड-आततायी लोकांच्या आसुरी हट्टापुढें हताश होऊन सज्जनांनी दुःखाने होऊ दिलेली चिरफाड. सुरुंग उडून मोठा निनाद होतो आणि एकसंधि खडकाला वेडे-वाकडे तडे ताडकन् जातात; व सर्वांना कानठळचा बसतात, त्यासारख्या देशाच्या फाळणीने उत्पन्न झालेल्या त्या मूळ महाध्वनीच्या प्रतिध्वनीचा दूरान्वित प्रतिध्वनि मूकपणानेंच अंबाल्याच्या बंदिगृहांतील आजच्या प्रातः-काळच्या वायुलहरीसवें उठणार नि राष्ट्रीय नियतीच्या गेल्या अडीच वर्षां-तील प्राणघेऊ ताडवाची स्मृति पुनः एकदा मनाला खिन्न आणि सुन्न करणार.

राष्ट्रपित्याचा प्रार्थनास्थळी भीषणतेने बळी घेण्याची कारवाई या दोघां तरुणानी केली आणि लक्षावधी लोकांच्या अंतःकरणांत घरें पाडली लक्षावधि लोकांना अनावर क्रोध, उद्वेग नि तिरस्कार उत्पन्न झाला आणि ज्याच्या त्याच्या प्रकृतीप्रमाणे तो शब्दांत नि कृतींत उमटला. या राष्ट्रीय दुःखप्रसंगाचें निमित्त करून काहींनी जातीय विद्वेषाचें थैमान घातलें. पण तेवढ्या निमित्ताने लक्षावधि सात्त्विक नि पापभीरु लोकांचा दुःखावेग कोणी दृष्टीआड करूं नये. तसें करण्यानें या जातीय अत्याचाराचीच एक लहानशी प्रतिकृति केल्यासारखे होईल. सामान्य जनतेंत उत्पन्न झालेल्या भयानक विमनस्क आणि हताश वृत्तीमुळेंच उपद्- व्यापी लोकांना रान मोकळें झालें काय बोलवें तें लोकांना कळेना, काय करावें हें समजेना. कांहीहि बोलून आणि करून झालेली घटना कांही बदलत नाहीं, म्हणून ही हताशता उत्पन्न झाली.

राष्ट्रनेतेहि किंचित्काल गडबडलें, पण हळूहळू योग्य संयम आणि गंभीर कर्तव्यता त्यांनी अंगीकारली. त्यांच्या उदाहरणाने आणि कालगतीने लोकहि क्रमश. स्थिरस्थावर झाले. गांधीहत्येचा अभियोग रीतसर उभा झाला तेव्हां अनेक भरमसाट कल्पनांतरंगांचा संकोच लोकांना करावा लागला. निकालामुळें तो संकोच आणखी एक पायरीने पुढे गेला. गोडसे—आपटे यांच्या देहान्त प्रायश्चित्ताने या राष्ट्रीय अपराधाची निष्कृति होऊन त्या-विषयीच्या जनमनांतल्या शेवटच्या उर्वरित शल्याच्या वेदना आतां थंडा-

वतील. फाळणीच्या राष्ट्रीय आपत्तीच्या या त्रिपद आक्रमणाची स्मृति मात्र लोकांत, देशाच्या पीठिकेंत आणि जागतिक इतिहासांत नित्याचीच राहणार. फाळणी आणि गांधीहत्या यांच्या मागोमाग त्यासाठीं दोघांना घडलेले देहांन्त प्रायश्चित्त हेंहि अनुषंगानें त्या ऐतिहासिक उल्लेखांतच जमा होणार.

## साध्या माणुसकीचा एक विचार

बंदिवासांत असलेल्या आणि चोऱ्यामाऱ्या नित्य करून सराईतपणाची 'काळी टोपी' मिळवलेल्या सामान्य बंद्यांमध्येहि माणुसकीचें काहीं सर्वमान्य रूढ आचारविचार उरतातच. एकादे दिवशीं सकाळी कोणी फांशीं दिला असला म्हणजे त्या दिवशीचें जेवण हे बंदी सोडतात. जेवण न करणें हा देखील बंदिगृह नियमामध्यें अपराधच समजला जातो. पण सर्वमान्य अलिखित रूढीप्रमाणें या दिवशीचें जेवण न घेणें हे अधिकारी लोकहि क्षम्य मानतात; एवढेंच नव्हें तर, तेहि भारतीय दयाशील संस्कृतीचे असल्यास, ते स्वतःहि घरचें जेवण घेत नाहीत. एरवी रखरखीत आणि भयग्रस्त अशा बंदिग्रहाच्या वातावरणांत फांशींच्या दिवशीं सकाळी एकप्रकारचें माणुसकीचें मार्दवयुक्त वारें संचरतें. मग फांशीची खोली कशी असते, फांशी जाणाऱ्याच्या अंतिम आवडीनिवडी कशा पुरवतात, सकाळी खोली उघडल्यापासून फांशीबंद्याचे काय काय 'सोहाळे होतात, याची घोगऱ्या स्वरांत जाणत्यांकडून नवशिक्यांना समजावणी व चर्चा दबून दबून चालू राहते. त्यांत सत्याबरोबर निरुपद्रवी असत्याचे किंवा अतिशयोक्तीचे कांहीं अंश विखुरलेले असतात. धीट मुलें सामान्य मुलांना जशा भुताच्या गोष्टी सांगण्यांत स्वारस्यानें रमतात, तसेंच फटक्याच्या आणि फांशीच्या शिक्षा कशा दिल्या जातात यांची भीषण वर्णनें ज्यांच्या संग्रही असतात त्या बंद्यांना, इतरांनी 'आयाई' म्हणून कानांवर हात ठेवीपर्यंत तीं वर्णनें पोचली म्हणजे कृतकृत्यता वाटते.

## गोडसे-आपटे यांचे पूर्वायुष्य

गोडसे-आपटे हे कोणी निर्ढावलेले समाजकंटक वा सराईत मारेकरी नव्हत. सार्वजनिक चळवळींत आपापल्या मतानुसार उत्साहानें भाग घेणाऱ्या आणि त्यासाठीं जिवापाड श्रम करणाऱ्या तरुणांपैकी ते होते. अशांना सामान्यतः सर्वच लोकांची सहानुभूति आणि आदर या गोष्टी प्राप्त होतात. त्यांच्या-

मध्यें कांहीं एकांतिक मते,कांहीं अप्रमाण छांदिष्टपणा,कांहीं अप्रयोजक उत्सा-
हातिरेक या गोष्टी दिसल्या तरीहि तटस्थ आणि वयस्क लोकांमध्यें त्याविषयीं
कौतुकाची भावना कांहीं काल तरी असतेच. त्यांच्या प्राथमिक चुका किंवा
अननुभवाच्या ठेचा देखील सामान्यत: लोक क्षम्य समजतात. अशा प्रकारची
सहानुभूति गोडसे–आपटे या तरुणांनीं मिळवलेली होती. 'हिंदु–राष्ट्र' या
पत्राचीं कांहीं अतिरेकी धोरणें नापसंत असणाऱ्या लोकांनाहि विपरीत
आर्थिक परिस्थितीमध्यें या पत्रासाठी त्यांनी चालविलेली धडपड कौतुका-
स्पद वाटे. अल्पसंख्य पक्षामध्यें संख्याबलानें मिळण्याच्या विजयाची दुर्मिळता
असल्यामुळें स्वाभाविकपणें आत्यंतिक बोलणाऱ्याना चटकन् प्रामुख्य मिळतें.
महत्त्वाकांक्षी लोकांना त्या अल्पसंख्य पक्षांत मिळवण्यासारखें यश असें तेव-
ढेंच असतें. या पक्षांत पराकोटीला जाण्याची एक प्रकारे स्पर्धाच लागते.
तडजोड, मर्यादा किंवा समयोचित तारतम्य सुचविणारे लोक या पक्षांत
मागें पडतात, आणि आत्यंतिकांच्या पक्षांतर्गत विजयप्राप्तीचें केवळ
'साधन' म्हणून ते उरतात. वैराण वाळवंटांत पक्षरूपी वृक्ष वाळून
शुष्क नि कृश काष्ठाप्रमाणें एकाकी उरला तरी चालेल, पण तो
'कडवा' असला पाहिजे याविषयीं दक्ष रांहणें हेंच खरें धैर्याचें लक्षण
मानलें जातें. हें सर्व अर्थात् अभावितपणें होत असतें. म्हणून त्यांचें वरील
प्रकारचें स्पष्ट वर्णन केलें तर अर्थात् ते कोणास फारसें रुचत नाहीं.

## फाळणीच्या आघाताचा परिणाम

या स्वाभाविक आत्यंतिक प्रवृत्तीला देशाच्या भयानक फाळणीनें
'खाद्य' पुरवलें. फाळणीच्या दिशेने पावलें टाकणाऱ्या पण तोंडानें मात्र
"आम्ही फाळणी पत्करणार नाहीं" असा विश्वास देणाऱ्या पक्षाला
प्रचंड बहुमत मिळून लोकांच्या डोक्यावर फाळणीची आपत्ति कोसळल्याने
संवेदनाशील मनांमध्ये प्रचंड खडबळ माजली. या काळामध्ये गोडसे–आपटे
हे एकाद्या समंधाने झपाटल्याप्रमाणे अस्वस्थ आणि विचारमग्न असत.
मतप्रचार, मतदारांचें आराधन, निवडणुकी, सामुदायिक सभा, ठराव,
निदर्शनें या सर्व मामुली गोष्टींत त्यांना 'रस' वाटेनासा झाला. वृद्ध
पुढाऱ्यांनी या गोष्टींत वाटल्यास मन घालावें पण तरुणांनी त्याच मिळ-
मिळीत गोष्टीत रमावें काय ? देशाच्या भलतीकडे चाललेल्या गतीला आव-

रण्यास त्यांना कांही विहंगम मार्ग सुचूं नयेत काय ? असे विचार त्यांच्या डोक्यांत सुरू झाले होते. दि. ३ जुलै १९४७ ला फाळणीच्या निषेधार्थ हरताळ बराच यशस्वी झाला. त्या दिवशीं सायंकाळीं पुण्यास भरलेल्या प्रचंड सभेंत पं. नथूराम गोडसे यांनी स्पष्टपणे आपलें हें असमाधान प्रकट केलें होतें. फाळणीनें व्यक्तिशः त्यांची लाभ वा हानि कांहीच झालेली न्हती. परंतु 'परदुःख शीतल' मानून स्वस्थ बसण्याची त्यांची वृत्ति नव्हती. पाकिस्तानांतील भीषण अत्याचार आणि निर्वासितांच्या हालअपेष्टा यांच्या वार्ता कानीं आदळल्याने त्यांचा आत्मा तडफडत होता. त्यामुळे तरुणांनी मामुली सभा निदर्शनांच्या सुलभ पण निरर्थक मार्गातून डोकें काढून, वृद्ध पुढाऱ्यांवर त्या गोष्टी सोपवून देऊन, वेगळा कांही 'तारुण्यसदृश' मार्ग शोधावा असें त्यांनी प्रतिपादिलें. त्या सभेंत ते शेवटपर्यंत हरताळाच्या यशस्वीपणाला तुच्छ मानून अलिप्तपणे वावरत होते. बोलण्याचा त्यांचा विचारहि नव्हता. नथूराम गोडसे यांनी बोलावें असा आग्रह श्रोत्यांनी केला म्हणून ते उभे राहिले. या भाषणांतील त्यांचा निराशाजनक नि गूढगुंजनात्मक सूर पाहून कित्येकांना आश्चर्य वाटलें. नेहमीच्या आवेशाच्या जागीं त्या भाषणांत निराळीच खोल विचारमग्नता दिसत होती.

## धोक्याच्या उपेक्षित पूर्वसूचना

त्यानंतर जयप्रकाश नारायण यांच्या स. प. विद्यालयाच्या पटांगणांत झालेल्या भाषणाला उत्तर देण्यासाठी झालेल्या श्रीशिवाजी मंदिरांतील भाषणांत त्यांच्या बोलण्यांत असाच वेगळा सूर दिसला. त्यावरूनच श्री. बाळूकाका कानिटकर यांनी ना. बाळासाहेब खेर यांना रजिस्टर पत्र धाडून काँग्रेस पुढाऱ्यांच्या जिवाला धोका असल्याचें व त्याविषयी सरकारी व्यवस्था अधिक करणें आवश्यक असल्याचें कळविलें होतें ! गोडसे हे या भाषणांतून जिनाच्या कारवाईला बळी पडणाऱ्या आपल्या पुढाऱ्यासंबंधी त्वेष व्यक्त करीत. "गांधीजी १२५ वर्षे जगूं म्हणतात–होय जगतील, पण त्याना कोणी जगूं देईल तर", अशा अर्थाचें एक वाक्य त्या भाषणात होतें ! बाळूकाकांनी केलेल्या अनुमानाला अशा कांही वाक्यांचाच आधार असला पाहिजे. ना. खेराना या पत्रावरून त्याची गंभीरपणे दखल घेण्यासारखें कांही वाटलें नसेल तर त्यांना फारसा दोष देतां येत नाही. भयानक घटना प्रत्यक्ष

होऊन गेल्यावर या पूर्वसूचनांमध्ये जी गंभीरता मागाहून दिसते ती आगाउ कोणाच्याच फारशी लक्षांत येत नाही. दुसरें असें की, एकेरीवर येणाऱ्या आत्यंतिक विरोधकांना शांत करून आपल्या प्रभावाने त्यांस आपल्याकडे वळवून घेण्याचें गांधीजीचें सामर्थ्य अद्भूत होतें. त्यावर अनेक अनुभवांनी सर्वच लहानमोठ्या लोकांत अटळ श्रद्धा निर्माण झालेली होती. ती श्रद्धा केवळ गांधीभक्तांतच नसून गांधींच्या विरोधकातहि बद्धमूल होती.

## पश्चातबुद्धींचे शहाणपण

महात्मा गांधीच्या हत्येनंतर जे अत्याचार झाले त्यांना विचारीं जनतेलाहि प्रतिबंध करतां आला नाही. कारण गांधी-हत्येच्या भयानक मानसिक आघाताने प्रत्येकाला आपले विचार आवरणे हेंच कठीण होऊन बसलें. स्वतःच्या मनाला आवरून धरण्याच्या प्रयत्नांतच व्यग्र असल्यामुळे इतरांना आवरण्याचें सुचणें किंवा कृतींत उतरणें या दोन्ही गोष्टी अवघड झाल्या; हताशपणे जें जें होईल तें तें पहात लोक बसले. अशीच अवस्था देश-विच्छेदनाच्या आघातानंतर विचारी लोकांची झाली होती. आत्यंतिक बोलणारे कांही तरुण बोलल्याप्रमाणे प्रत्यक्ष करतील आणि करूं गेल्यास ते यशस्वी होतील या दोन्ही गोष्टी त्या वेळेला असंभाव्य वाटण्यासारख्या होत्या. अनिष्ट गोष्ट होऊन गेल्यावर मग उलटया क्रमाने विचार करून नामदार खेर स्वस्थ कां बसले, मुरारजींनी कां आळस केला, दिल्लीचे पोलीस इतके भोंगळ कसे ठरले इत्यादि पश्चात्बुद्धीचें शहाणपण सुचणें सोपे असतें. जी गोष्ट सरकारी बाजूने झाली तीच गोष्ट कांही प्रमाणांत गोडसे यांच्या गूढ विचाराशीं विसंवादी असणाऱ्या मंडळींचीहि झाली असेल त्यांनाहि फाळणी आणि त्यानंतरचे अत्याचार याविषयी इतर अनेकांकडून व्यक्त होत असणाऱ्या संतापाप्रमाणेच गोडसे यांचा मनक्षोभहि कालांतराने आपोआप कमी होईल असें वाटलें असल्यास नवल नाही.

गांधीहत्येच्या अपराधाबद्दल गोडसे-आपटे यांच्या प्राणांचा बळी, दीर्घकालीन खटल्याचा मनावरील ताण, अनेक निरपराधी लोकांची जीविताची आणि वित्ताची हानि, अनेकांची स्थानबद्धता आणि त्यायोगे झालेले त्यांच्या कुटुंबांचे निष्कारण हाल अशा अनेक गोष्टींनी भरमाप प्रायश्चित्त-आता होऊन चुकलें आहे. या प्रायश्चित्त-सत्राची गोडसे-आपटे

यांच्या फांशीने पूर्णाहुति झाली असें समजावयास पाहिजे. गांधीजींच्या ऐवजी दुसरा कोणी पुढारी असता तरी अपराध्यांना यापेक्षां कांही मोठें प्रायश्चित्त मिळालें असतें असें वाटत नाही. खुनी माणसाला जमावाने जागच्या जागीं मारमारून ठार केलें असतें, तें झालें नाही, असा एक अहिंसक गांधीजींचा संबंध म्हणून टळलेला प्रकार सांगण्यांत येतो. पण तो प्रभाव अहिंसेचा नसून लोकतंत्र आणि कायद्याने चालणाऱ्या आधुनिक राज्यपद्धतीच्या शिस्तीचा तो एक भाग आहे. इंग्लंडमध्ये ओड्वायरचा खून करणारा उधमसिंग याला इंग्लंडच्या नागरिकांनी तेथेच प्रायश्चित्त दिलें असें झालें नाहीं. सारांश, गांधीहत्येच्या भयानक कृत्याची शक्य तेवढया मोठया प्रायश्चित्ताने आता निष्कृति झालेली आहे. अहिंसात्मक सात्त्विक माणसांची तर सोडाच, पण क्वचित् कोठे रानटी सूडबुद्धि असलेल्या माणसांचीही वैरज्वाला आता शमली पाहिजे. वैरे जशी मरणान्त असतात, तसेंच अपराधनिर्मित क्षोभ हे प्रायश्चित्तान्त असावयास पाहिजेत. म्हणून गोडसे-आपटे यांच्यासंबंधात अप्रमाण भावनावशतेने आजवर दाखविलेली निंदकवृत्ति ही देखील आता योग्य विचाराने दुरुस्त व्हावयास हवी.

## सहानुभूतीची अपेक्षा

देव आणि सैतान, ख्रिस्त आणि ख्रिस्तांतक हे जसे नैतिक दृष्ट्या परस्परविरोधी मानले जातात तसेच आपल्याकडे राम आणि रावण हे मानले जातात. तशी उपमा श्री. मश्रुवाला यांनीहि दुर्दैवाने उच्चारली. पण खऱ्या विचारानें ही उपमा आता अनुल्लेखानें संपविली पाहिजे. गोडसे-आपटे आणि विशेषतः गोडसे हे त्यागी आणि ध्येयनिष्ठ तरुण होते. गोडसे यांचे आयुष्य हें अन्न वस्त्र आणि निवास यांच्या संबंधांत कमीत कमी परिग्रह ठेवूनच चालले होते. कोणत्याहि ऋतूंत मनगटापर्यंत लांब बाह्यांचा सदरा गोडसे यांच्या अंगांत कोणी पाहिला नसेंल, सर्वदा एकच कोपरीं त्यांच्या अंगांत असावयाची. अनेकांच्या आग्रहास न जुमानतां संसारात पडण्याचा पाश त्यानी निग्रहानें टाळला 'मी आपले स्वतःचे जीवित वेगळ्या ध्येयासाठी चालवीत आहे' हें त्यांनी अनेंकदा स्पष्ट केलें होतें, ' हिंदु राष्ट्र 'पत्र काढल्या पासून अहोरात्र अडचणी आणि धावपळ यांच्या पाठशिवणीच्या खेळाने त्यांचे आयुष्य ग्रस्त होतें. रामदास गांधीशीं त्यांच्या झालेल्या पत्र

व्यवहारांत त्यांचीं जीं शालीनता व दुसऱ्याचे विचार ऐकून घेण्याचीं वृत्ति दिसलीं ती अपवादात्मक नव्हतीं. गांधीवधानंतर गांधींप्रेमाने वेडे झालेल्या लोकांबद्दल योग्य मर्यादेत जशीं सहानुभूति वाटली तशींच देशविच्छेदनामुळे वेडचा झालेल्या गोडसे यांच्यासारख्या देशप्रेम्यांच्या वतींने उलट सहानुभूतिचीं अपेक्षा करणें चुकीचें आहे काय ?

## नैतिक न्यायबुद्धि ठेवा

गांधीजी हे चारित्र्यसंपन्न खरे, पण नथूराम यांना धोपट व्यत्त्यास-कल्पनेने चारित्र्यहीन म्हणणें योग्य नव्हे. आपल्या अपराधाबद्दल प्राणांचे मोल दिल्यानंतर तरी नथूराम यांच्याविषयी नैतिक अन्याय करण्याचें आपण सोडलें पाहिजे. गांधीजी मोठे अहिसक तर नथूराम हे मोठे क्रूर असेहि द्वैत मांडणें चुकीचे. तसेंच गांधी हे सत्यनिष्ठ तर नथूराम हा निर्ढावलेला, सत्य कोळून प्यालेला खोटाडचा असें मानणें हें नैतिकदृष्टचा असत्यच होईल. समकालीन अनेक कार्यकर्त्यांशीं नथूराम गोडसे यांची तुलना केली तर, त्याग, साधी राहाणी, विलासविन्मुखता, ब्रम्हचर्य, अंगीकृत कार्यापुढे स्वत्व विसरून जाण्याची सिद्धता या गुणांमध्यें त्यांच्या तोडीचे कार्यकर्ते हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच सापडतील ! पं. नथूराम गोडसे यांच्या अपेक्षेप्रमाणें दूरचा इतिहास त्यांना काय न्याय देईल ते देवो. त्याचें आज आकलन करणें दुरापास्त आणि अव्यवहार्यहि आहे. नथूराम यांची अपेक्षा सार्वजनिकदृष्ट्या आपल्या मताला न्याय मिळेल अशी होती. व्यक्तीला बरें वाईट ठरवून होणारा न्याय-अन्याय याची त्यांना कांहीच क्षिती नव्हती. पण त्यांची अपेक्षा असो वा नसो; केवळ आपलें वैचारिक तारतम्य नीट राखण्याच्या दृष्टीने श्री. गोडसे यांच्यासबंधी बोलल्या जाणाऱ्या भाषेंत आतापासूनच सुधारणा व्हावयास पाहिजे. श्री. आपटे यांचा जीवनक्रम श्री. गोडसे यांच्याइतका त्यागाचा नसला तरी ध्येयनिष्ठा व सार्वजनिक कामांतील कष्टांची सिद्धता हे त्यांचे गुण अमान्य करतां येणार नाहींत. तसेंच गोडसे यांच्या कृत्यास साहाय्यभूत होण्यापेक्षा जिव्हाळचाचा मित्र म्हणून त्यांच्याबरोबर राहण्याचें कर्तव्य, भयंकर धोक्याचें असलें तरीं, आपटे यांनीं पत्करलें हीं एक विशेष गोष्ट दृष्टींआड करण्यासारखी नाहीं. मित्राचें मरणान्त पाठीराखेंपण करणें याला जर कांहीं मूल्य असेल तर

त्याचें पुरेपूर माप न्यायतः आपटे यांच्या पदरांत टाकणें अपरिहार्य आहे. खंडित झालेल्या दुर्दैवी हिंदुराष्ट्रासाठीं 'हिंदुराष्ट्र' वृत्तपत्राचे हे दोघे सह-कारी चालक शेवटीं आपल्या प्राणांचीं जोड-आहुती देऊन जीवितांतून अंतर्धान पावले.

पिंजऱ्यांत सांपडलेल्या वाघावर बायकापोरानी खडे मारण्यांत जसें शौर्य नाही, तसेंच गळ्यापर्यंत स्वार्थपरायणतेंत बुडालेल्यांनीं गोडसे-आपटे हीं नावें निघतांच त्यांच्यांसंबंधी कांहीहि अभद्र बोलणें हें आतां उचित नाही, सैतानाला सुद्धा योग्य मापाने त्याचें श्रेय त्याला दिले पाहिजे (गिव्ह धी डेव्हिल हिज ड्यू ). अशा न्यायाने पाहिले तरीहि गोडसे-आपटे यांच्या संबंधाने योग्य वैयक्तिक न्यायबुद्धी समाजांत दिसावी अशी आम्ही अपेक्षा करतो.

## संगति-विसंगति

दया-क्षमा शांतीचे असें अद्भुतरम्य धडे गांधीजीवनामुळे जगाला शिकविण्याची पात्रता आपल्यांत आली आहे असें अनेक लोक मानीत होते. पण आजचें दृश्य त्याच्या अगदी उलट दिसत आहे. आज गांधी हत्या करणारांना क्षमा करण्याविषयी अनेकशः संदेश परदेशांतून इकडे येत असून, ते मनावर न घेण्याइतकें आपलें सरकार घट्ट मनाचें आहे याचा सुखदुःख-संमिश्र अनुभव आपण घेत आहोत.

फाशीची शिक्षा म्हणजे ' जशास तसें ' या तत्वाचा राजमान्य आणि पद्धतशीर व्यवहार होय. गांधीजींच्या तत्वनिष्ठेशी हा व्यवहार सर्वस्वी विसं-गत नि विरोधी असा आहे, हें असंख्य आधारांवरून सिद्ध करतां येईल. गांधी जींचीं ही अव्यवहारीं क्षमाबुद्धी अपवाद म्हणून पाळण्याचा सर्वोत्कट प्रसंग गांधिहत्येचा होता. राज्यकर्त्यांना तो तसा मानतां आला असता; पण तो देखील त्यांनी मानला नाहीं, यामुळें गांधींतत्त्वपट राज्य-व्यवहारांतून काय-मचा गुंडाळला गेला, आणि रोखठोक व्यवहारी दंडक चालू झाला असें दिसतें. मात्र तो कठोर दंडक सर्वत्र सारखा पाळला जावा अशीं आमची अपेक्षा आहे; कारण, सतत शुद्ध गांधी तत्त्वानुसार नियमित आचरण पुर-वलें किंवा नियमितपणें चालणारा नित्याचा प्रखर व्यवहारीपणाहि पुरवला; पण सोयीस्कररीत्यां कधी गांधीतत्त्व तर कधी कठोर व्यवहार असा दुटप्पी-

पणा चालविणें हें मात्र अतिशय वाईट. तो दुटप्पीपणा पूर्वी दिसला त्या-
वेळीं आम्हीं त्याची बोचक विसंगति वारंवार दाखविलीं आहे. पुढेहि तसें
झाल्यास ती दाखवावीं लागेलच! कारण असलीं विसंगति म्हणजे 'लवचिका-
पुढे धोंडा नि ताठरापुढे गोंडा' असला गडबडगुंडा होतो. अशा प्रकारची
बोचक विसंगति सरकारने यापुढे टाळलीं तरच आम्हीं दाखविलेली 'बोधक
संगति' सार्थ ठरणार आहे.

—केसरी दि. १५–११–१९४९

—— ——

# न्याय, नीति, आणि समजुती

केसरीवरील जामिनकीच्या संबंधातील अपिलाचे समग्र निकालपत्र उशीरा हाती आले. या अधिकृत निकालपत्रावरून, केसरीने गोडसे आपटे याच्या संबंधाने लिहिलेला अग्रलेख आणि त्यावर सरकारी वक्रदृष्टि फिरण्याच्या आधीच कॉंग्रेसी पत्रानी विकृत दृष्टिने केलेला टीकेचा भडिमार या गोष्टीची आणि तदनुषंगाने इतर पुढच्या आणि मागच्या अनेक गोष्टीची स्मृति जागृत होते. या सर्व प्रकरणावर कॉंग्रेसनिष्ठ पत्रांनी या निकालानंतर तरी पडदा टाकला असता तर बरे झाले असते. पण केसरीला हा अनुकूल निकाल मिळाल्यावरहि न्यायालयाच्या काटेकोर दृष्टीने केसरी सुटला असला तरी तो खरा दोषीच होता असें लिहिण्यास कांही वृत्तपत्रें धजावलीच. केसरीचा अग्रलेख प्रकट झाला तेव्हा तर या लेखाच्या अत्यंत समतोल भाषेकडे आणि उच्च भूमिकेकडे लक्ष न देता, त्यांतून हवे ते अनर्थ अनुमानाने वा शुद्ध दडपेगिरीने अनेक कॉंग्रेसी पत्रानी काढले आणि रंगविलें होतें.

कायदेशीर अर्थाचा विचार क्षणभर गौण मानला आणि सामान्य सार्वजनिक सद्भाव नि नीति यांचाच विचार केला तर केसरीचा लेख दोषी

होता असे म्हणण्याचा कांहीं लोकांचा हट्टाग्रह अद्याप उरला आहे याचें वाईट वाटते. या लोकांनी वरिष्ठ न्यायालयांचें निकालपत्र काळजीपूर्वक वाचल्यास त्यांच्या या हट्टाग्रहाला कांहींच आधार नाही हें समजावयास हवें. एक पायरी पुढें जाऊन आमचें म्हणणें असेंही आहे की, कदाचित् कायद्याच्या काटेकोर दृष्टीने हा अग्रलेख आक्षेपार्ह ठरला असता तरीहि तेवढयावरून तो सार्वजनीक नीति आणि सद्भाव याच्या दृष्टीने वाईट वा चुकीचा होता असें धोपटपणाचे अनुमान करणे अयोग्य ठरलें असतें. सार्वजनिक न्यायनीति रक्षणाणाच्या दृष्टीनें आक्षेपार्ह तर नव्हताच पण त्या नीतीचें योग्य स्वरूपांत पालन करणारा होता असें आमचें आजहि म्हणणें आहे.

## सामान्य सुबुद्धतेची दृष्टी

हा लेख प्रकट झाला त्यावेळीं कोणास आपलें पूर्वग्रह त्यांत दिसून खेद वाटला असेल तर निदान आतां दीर्घकालानतर सिंहावलोकनाने त्यांचा फेरविचार त्यांनी करावा. तो करतांना वरिष्ठ न्यायालयाने या लेखाच्या एकंदर धोरणाविषयी आणि हेतूविषयी जी निश्चित अनुमाने केली आहेत ती ध्यानांत ध्यावी. ती अनुमाने केवळ कायद्याच्या दृष्टीने केलेली नसून सामान्य वाचकांच्या मनांत उत्पन्न होणाऱ्या परिणामाच्या दृष्टीने केलेली आहेत. न्यायाधिशांनी या आक्षेपित लेखाचा हेतु काय आहे हें ठरविले. तें सामान्य सुबुद्ध मानवी बुद्धीने ठरविलें. तें विवेचन सामान्य सुबुद्ध माणसास समजण्यासारखे आहे. त्याला कायद्याच्या ज्ञानाची आवश्यकता नाहीं. लेखकाला त्या लेखांत काय म्हणावयाचें आहे याचा निर्णय प्रथम न्यायालयानें केला आणि मग तें म्हणणें कांयद्याच्या दोष—कक्षेत पडत नाही असा निर्णय दिला.

ते म्हणणें कायद्याच्या पेचांत सांपडत नसलें तरी सार्वजनिक नीतीच्या व्यापक विचाराने ते आक्षपार्ह मानावें असें कांहीचें म्हणणे दिसतें. कांही विशिष्ट घटनांनी उत्पन्न झालेल्या पूर्वग्रहाच्या चाकोरींतून त्यांनी हा सार्वजनिक नीतीचा विचार केला असें आम्हांस त्यांना सांगावयाचें आहें. पूर्वी त्यांना ते पटत नसले तरी न्यायालयाचें अधिकृत आणि सविस्तर निर्णयपत्र वाचल्यानंतर तरीं त्यांना तें थोडेसें पटेल अशी आम्ही आशा बाळगतों.

महात्मा गांधींची नृशंस हत्या झाली त्यावेळीं ज्या भरमसाट देशव्यापी कटाच्या आणि हालचालीच्या वार्ता अनेक वृत्तपत्रांनी प्रकटविल्या त्या सर्व न्यायालयांतील अभियोगाच्या निकालानंतर टिकल्या नाहींत, किंबहूना तो सर्वच काल्पनिक डोलारा उलथापालथा झाला, त्याचप्रमाणे " देहान्त शासनाचे राष्ट्रीय बळी "हा लेख प्रकट झाल्यावर पूर्वग्रहाने त्यांतून जे भलतें भलते अर्थ किंवा अनर्थ कित्येकांनी काढले त्यांना आतां वरिष्ठ न्यायालयाच्या स्पष्ट निकालाने संक्षेप मिळाला पाहिजे.

## समतोलपणाचा आपमतलबी उपयोग

प्रासंगिक विकृत आणि अप्रमाण पूर्वग्रहाना ' काल ' हा पुष्कळांशी ताळ्यावर आणीत असतो. पुष्कळ मानसिक तेढीचा बोचकपण कालाच्या प्रवाहाने साफ केला जातो या मानसिक सफाईच्या क्रमामध्ये मुंबईच्या वरिष्ठ न्यायालयाच्या निकालपत्राने शेवटचा रंधा मारला जावा अशी आमची इच्छा आहे. महात्मा गांधी आणि गोडसे–आपटे या विशिष्ट व्यक्ति आणि राष्ट्रपुरुषाच्या भयानक हत्येचें हे विशिष्ट उदाहरण क्षणभर बाजूस ठेवून " सार्वजनिक संसारांत आततायी कृत्यें करणाऱ्या भावनावश नि अपराधी व्यक्तींनी तद्विषयक कायदेशीर शिक्षा भोगल्यावर त्यांच्यासंबंधाने विचारी लोकांनी कोणती दृष्टि ठेवावी ? " असा सामान्य प्रश्न आमच्या त्यावेळच्या टीकाकारांनीं व इतरांनीहि आपल्या मनाला करावा. समतोलपणा हा सद्‌-गुण कांही बाबतीतच चालवावयाचा आणि कांही विशिष्ट बाबतीत त्याचा मागमूसहि चालू द्यावयाचा नाही ही कांही सार्वजनीक नीति नव्हे किंवा माणुसकीहि नव्हे. सार्वजनिक व्यवहारांत माणुसकीची मूल्यें बिघडूं किंवा घसरूं न देण्याविषयीं कटाक्षाने- यत्न करणाऱ्या महात्मा गांधीच्या भक्तांनी तरी हे आतां ओळखावे.

कायदा आणि न्यायनीति यांची वर्तुळें नेहमी समव्याप्त नसतात म्हणजे कित्येक गोष्टी कायदेशीर ठरल्या तरी त्या सार्वजनिक नीतीला पोषक असतातच असें नाही. तसेंच उलट कायद्याने आक्षेपार्ह ठरणाऱ्या गोष्टी या सार्वजनिक न्यायनीतीच्या दृष्टीने निर्दोषी किंवा चांगल्याहि असूं शकतात. आमचा लेख केवळ कायद्यांतून सुटला एकढ्यावरच आमचें समाधान नाही. सार्वजनिक न्यायनीतीच्या दृष्टीनेहि त्या लेखांत योग्य तो

समतोलपणा होता असें आमचें म्हणणे आहे. या लेखाच्या आधीच्या अंकांत 'फांशी निर्णयाची बोधक संगति' हा लेख आलेला होता. त्याचाहि विचार वरिष्ठ न्यायालयाने करावा अशी न्यायालयास विनंतीहि करण्यांत आली होती. आवश्यक झालें तर त्याचा विचार नंतर करूं असें न्यायालयाने म्हटलें होतें. पण पुढील चर्चेत ती आवश्यकताच उत्पन्न झाली नाही हें वेगळे. सार्वजनिक नीतीच्या विचारांत या मागच्या लेखाचाहि परामर्ष घेणें अपरिहार्य आहे. लेखांक (१) आणि (२) असें त्यांना क्रमांक दिले नव्हते हें खरें. पण समतोलपणाच्या दृष्टीने फांशीच्यापूर्वी जें लिहिणें आवश्यक होतें ते सर्व आम्ही कोणाच्याहि रागालोभाची क्षिती न बाळगतां यापूर्वींच्या लेखांत लिहिले होते. फांशी गेल्यानंतर त्याच समतोलपणाच्या दृष्टीनें जें लिहिणें आवश्य होतें तें आम्ही नंतरच्या लेखांत लिहिले.

## एकांतिकतेने केलेले दोषारोप

क्रमाने आलेल्या या दोन लेखांचा मेळ घालणे कित्येक आत्यंतिक आणि कोत्या बुद्धीच्या लोकांना जड गेलें. कित्येकाना तर पहिला लेख म्हणजे आम्हांला अचानक अनपेक्षितपणे झालेली उपरती होय असें वाटलें. अत्यंतिक विचार करणाऱ्या दोन्ही टोकाच्या लोकांनी त्यावेळी आमच्यावर दोषारोप केले. दुसरा लेख प्रकट झाल्यानंतर "पहिल्या लेखातील सुबुद्धी उलटी फिरली" असेहि कित्येकांनी म्हटलें. पण हे सर्व अपेक्षाभंग त्यांच्या एकांगीं दृष्टीकोनामुळें उत्पन्न झाले होते. सार्वजनिक न्यायनीतीची एकच आणि अखंड सरळ बुद्धि आमच्या मने आम्ही या दोन्ही लेखांत सारखीच चालविलेली आहे. अपराध्याला केलेली शिक्षा योग्य आहे असें अनेकपरीनें म्हटल्यानंतर आणि त्या शिक्षेचें भरमाप समर्थन केल्यानंतर पुढे अपराध आणि शिक्षा यांची वजावट करून तद्व्यतिरिक्त अपराध्याच्या इतर आयुष्यासंबंधाने योग्य तें गुणग्रहण करण्यास जे लोक चोरी किंवा संकोच उत्पन्न करतात त्यांची सार्वजनिक नीतिमत्तेची कल्पना आम्हांस हिणकस वाटतें. इतकेच नव्हे तर, गांधीजींनी स्वत: जी माणुसकीची मूल्यें प्रस्थापित करण्याचा यत्न केला, त्यांच्याशींहि ती अगदी विसंगत दिसते.

क्रॉमवेलची राज्यक्रांति उलटी फिरून स्टुअर्ट राजे पुन्हां इंग्लंडच्या गादीवर आल्यानंतर त्यांनी क्रॉमवेलचें प्रेत उकरून काढून त्याला पुन्हा

फांशी दिलें ! ही गोष्ट सार्वजनिक नीतीच्या दृष्टीने योग्य झाली काय ? अशाच प्रकरचा आत्यंतिक खुनशीपणा गोडसे-आपटे फांशी गेल्यानंतरहि त्यांच्यासबंधाने समाजाने चालवावा असें काही गांधीभक्त मानीत होतें. पण ही वृत्ति त्यांच्या गांधीभक्तीवर काळें फांसणारी आहे. गांधी म्हणजे राम आणि गोडसे-आपटे म्हणजे रावण ही श्री. मश्रूवाला यांची उपमा आत्यंतिक म्हणून सोडून द्यावी असें आम्ही म्हटलें होते. ती उपमा सार्वकालिक म्हणून वज्रलेप मानली तरीहि असें विचारतां येईल की, रावणाच्या अपराधाबद्दल रणागणावरील मृत्यूचे शासन त्याला मिळाल्यानंतर श्रीरामचंद्रांनी उद्‌गार काढले की, 'मरणान्तानि वैराणि निर्वृत्तं नः प्रयोजनम् ।। क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ।' बिभीषणाला उद्देशून रामचंद्राने हे उद्‌गार काढले आहेत. रावणाच्या मरणानंतर त्याच्यासंबंधीहि तुझ्याइतकाच माझ्या मनात बंधुभाव आहे, असे म्हणणाऱ्या रामचंद्राचें उदाहरण रामराज्याची वेळी-अवेळी घोषणा करणारांनी ध्यानात घ्यावयास नको होतें काय ?

## कायद्यापलीकडे जाणारें तारतम्य

आम्ही उल्लेखिलेल्या दोन लेखांपैकी एका लेखावर एक वर्ग रुष्ट झाला तर दुसऱ्या लेखावर दुसराच एक वर्ग रुष्ट झाला. यावरूनच त्या दोहोंतहि आम्ही राखलेला अखंड समतोलपणा स्पष्ट होतो. या लेखांचा विषय आता गतगोष्टींत जमा झालेला असला तरी सार्वजनिक जीवनांतील माणुसकी आणि कृतज्ञता याचे प्रश्न मात्र नित्याचे आहेत सध्याच्या मुद्रणकानूंच्या दृष्टीने खुनी माणसाची स्तुति, खुनाशी संबद्ध अशा रीतीनें केली तरच आक्षेपार्ह ठरते, असा कायदेशीर निर्णय केसरीनें मिळवला नि तो अपूर्व असाच आहे पुढील निर्णयासाठी दाखल्यासारखे उपयोगी पडणारे निर्णय संग्रहीत करण्यात येतात त्यात या निर्णयाचा अंतर्भाव होईल हें निःसंशय; पण सार्वजनिक नीतीची दृष्टि इतकी कांटेकोर रहावी असें आमचें मत नाही. खून करणें हे चांगले असे दाखविण्याइतकी स्तुती असेल तरच ती नैतिकदृष्ट्या चुकीची समजावी अशी आमची कायद्यापलीकडील दृष्टि आहे. खून करून पळून जाणाऱ्यापेक्षा सरळ आरक्षकापुढें जाऊन

एखाद्यानें आपण होऊन आपलें कृत्य मान्य केलें आणि खुनाचें हत्यारहि आपण होऊनच पोलिसांच्या स्वाधीन केलें तर फांशीनंतर त्याच्या त्या विशिष्ट वर्तनासंबंधानें कांहीं अंशीं आदर उत्पन्न होतो. हा आदर व्यक्त करणें हें त्या खुनाच्या कृत्याशीं संबद्ध असलें तरी केवळ तेवढयानें खुनाची प्रवृत्ति प्रशंसिली जात नाहीं असें आमचें म्हणणें आहे. अब्दुल रशीद खुनी हल्ला करून जीव घेऊन पळत सुटला, तर खड्गबहादुरसिंग हा हिरालालवर प्राण-घातक हल्ला केल्यानंतर आपण होऊन पोलिसांच्या स्वाधीन झाला. आणि अपराधाबद्दल असेल ती शिक्षा भोगण्याची सिद्धता त्यानें व्यक्त केली. या दोन प्रकारांतील जें तारतम्य मानवी मनाला कळतें तें व्यक्त करण्याची चोरी होणें हें मानवतेला धरून आहे काय ? आमचा लेख कायद्याच्या कक्षेंतून सुटला असला तरी सार्वजनिक नीतीच्या दृष्टीनें कांही लोकांनी दोषी ठरविला ही गोष्ट आम्हांस अद्याप चूक वाटते. या लोकांनी सार्वजनिक नीतीविषयक चुकीची दृष्टि यापुढें शक्य तितकी दुरुस्त करावी असे आम्हांस वाटतें. ही दृष्टि दुरुस्त होणें हा तात्कालिक प्रश्न नसून नित्याचा वादाचा विषय आहे. तो नसता तर या संपलेल्या प्रकरणावरचा पडदा हलविण्याचें आम्हांस कांही प्रयोजन नव्हतें.

## अप्रमाण निंदेवर उतारा

न्यायालयापुढे आलेल्या लेखामधील दोन वाक्यें अशी निघाली कीं त्यातींल अपराध्याची स्तुति ही अपराधाशी संबद्ध आहे. सर्व लेखांच्या संदर्भा-तून तोडून ही वाक्यें वेगळीं काढलीं तर आक्षेपार्ह दिसतात, पण एकंदर लेखाच्या संदर्भात वाचलीं तर ती आक्षेपार्ह ठरत नाहीत असें न्यायालयानें ठरविलें. न्यायालयानें लागोपाठ आलेले दोन अग्रलेख वाचण्याचे मनात आणले असते तर हा आक्षेपार्हपणा याहूनही कमी झाला असता. तसेच मश्रूवाला यांच्यासारख्या प्रसिद्ध लेखकांनी गोडसे-आपटे आणि गांधीजी यांच्या संबंधांत विशिष्ट पौराणिक उपमा रूढ करण्याचा यत्न केला होता. त्या यत्नाचा अप्रयोजकपणा दाखवण्याचा या अक्षेपित अग्रलेखाचा एक उद्देश होता. यांत अपराध्यांची स्तुति असलीच तर ती एका अप्रमाण निंदेवर इष्ट उतारा म्हणून होती. या गोष्टीकडे न्यायालयाचे विशेष लक्ष वेधलें गेलें नाहीं किंवा लेखाची सुटका करण्यास इतर चांगलीं कारणें असल्यामुळें या आणखी एका कारणाकडे विशेष लक्ष पुरविलें गेलें नाही.

पण लौकिकदृष्टया विचार करतांना श्री. मश्रूवाला यांनीं विशिष्ट रीतीनें हा वाद चालू केला होता ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. श्री. मश्रूवाला यांचा 'हरिजन' मधील या संबंधाचा लेख अनेक प्रसिद्ध वृत्तपत्रांनी उद्धृत केला होता. केसरीनें प्रथम श्री. मश्रूवाला यांच्या विचारसरणीचा टीकात्मक परामर्ष दोन अग्रलेखांत घेतला होता. त्याचे मागोमाग 'फांशी निर्णयाची बोधक संगति' आणि 'देहान्त शासनाचे राष्ट्रीय बळी' हे अग्रलेख क्रमानें आले. या चारहि अग्रलेखांचा विषय एकच होता. केसरीच्या असंख्य आस्थेवाईक वाचकांनी हे चार लेख एकमेकांशी संबद्ध म्हणूनच तशा बुद्धीनें वाचले होते. कायद्याची काटेकोर दृष्टि सोडून लौकिक नीतीची सामान्य दृष्टि पत्करली तर चारहि लेखांचा संकलितरीत्या हेतु नि परिणाम यांचा विचार केला पाहिजे.

गोडसे-आपटे हे गांधीजींची भीषण हत्या करून फांशी न जाते आणि कोठल्या तरी अपघातानें मृत्यु पावले असते तर त्यांच्या सार्वजनिक जीवन-क्रमासंबंधीं गौरवपर उल्लेख त्यांच्या राजकीय प्रतिपक्षीयांनी देखील केले असते. महात्मा गांधीच्या खुनाचें त्यांनी जे दुष्कृत्य शेवटीं केलें त्यासाठीं फांशीची शिक्षा त्यांनीं भोगली. गांधीजीच्या क्षमाशील तत्त्वज्ञानाकडे लक्ष देऊन या फांशीची माफी करावी असें पुष्कळांनी म्हटलें. आपटे याला गोडसेइतके महत्त्व नसल्यामुळे त्याला फांशी न दिले तरी चालेल असें मश्रुवाला यांनीहि सुचविले होते. पण आपलें स्वराज्यांतील राज्ययंत्र हें विशिष्ठ शिस्तीने सर्वत्र सारखेंच कडक असले पाहिजे. तसें न ठेवलें तर राज्यांतील लोकांच्या जीवितरक्षणाचें कार्य नीट चालणार नाही, अशा विचाराने सरकारने फांशी निर्णय कायम केला. त्यावेळीं केसरीने या फाशी–निर्णयाचें समर्थन केलें. माफीची अपेक्षा उत्कटतेने करणाऱ्या कित्येकांना या लेखाने वाईट वाटलें व त्यांनी आम्हांस तसें कळविलेहि, पण सरकारनें एकदा निर्णय केल्यांनंतर त्या निर्णयामागील विचारसरणी आम्हांस ज्या प्रकारें समर्थनीय वाटली त्या सर्व प्रकारांनी आम्ही त्या निर्णयाचें समर्थन केले होते. त्यावेळीं गोडसे–आपटे यांच्या कृत्याचा भयानकपणाहि आम्ही यथायोग्यपणे दर्शविला होता.

## पूर्वग्रहदूषित विभागणी

हे दोघे फाशी जाणार त्या दिवशी अनेक गांवांतून सरकारनें विशेष रक्षणव्यवस्था ठेवली असल्याची वार्ता त्यावेळी प्रसिद्ध झाली होती. यावरून या दिवशीं लोकांचा उलट सुलट मनःक्षोभ होणार हे सरकारालाहि उमगलें होतें हें स्पष्ट दिसलें. सरकारचा हा परिस्थितीसंबंधाचा अंदाज संयुक्तिक आणि इतरांनाहि भासणारा होता. ही परिस्थिति लक्षांत घेऊन दोनहि बाजूंच्या आत्यंतिक विचार करणाऱ्याना मागे योग्य भूमिकेवर खेचण्याचें काम आम्हीं या दोन अग्रलेखांनी केले. असें करण्यांत वृत्तपत्रकार या नात्यानें आपल्याकडे येणारे कर्तव्य योग्य रीतीनें पार पाडावें एवढीच आमची बुद्धि होती. कायदेशीरपणाचा प्रश्न बाजूला ठेवला तरी सार्वजनिक नीतीच्या दृष्टीनें या दोन लेखांत काय चुकले याविषयी आम्ही अनेकांशी चर्चा केली म्हणजे पहिल्या किंवा दुसऱ्या लेखावर रुष्ट असलेल्या उभयविध लोकांशी चर्चा केली. त्यांत सामान्यतः आम्हास असें दिसलें की, त्या त्या लेखाचा कांहीं भाग केवळ वरपांगीपणानें आम्ही लिहिला आणि कांही भाग खऱ्या मनानें लिहिला अशी विभागणी बहुधा प्रत्येकाने आपापल्या पूर्वग्रहाप्रमाणें उलटसुलट केली होती. पूर्वग्रहाने अशी विभागणी करून वृत्तपत्रांतील लेख वाचावयाचे ठरविल्यास कोणताच लेख बहुधा आक्षेपांतून सुटणार नाहीं. विशेषतः संमिश्र भावना उद्दीपित करणारे प्रसंग असतात त्या वेळीं हा पूर्वग्रहाचा धोका अधिकच असतो. या चर्चेत सर्वांना आमचें उत्तर असें की, न्यायालयांत किंवा निःपक्षपाती माणसापुढें या लेखांची पूर्वग्रहदुष्ट अशी चिरफाड होणार नाही अशी आमची खात्री आहे.

वरिष्ठ न्यायालयाच्या निकालानें आमच्या या मनोमन निश्चितीला दुजोराच मिळत आहे. गांधीजीसारख्या साधुपुरुषाच्या खुनी माणसाला फांशी द्यावे कीं नाही असा एका बाजूनें नैतिक पेच होता. तसेंच थोडेसे गोडसे-आपटे यांच्या पूर्वायुष्यांत काहीं चांगलें झाले असेल तर त्यासंबंधानें योग्य तें गुणग्रहण त्यांना फांशी दिल्यावर करावे की नाही हाहि नैतिक पेचप्रसंग होता. श्री. मश्रूवाला यांच्यासारख्या निर्भीड लेखकानें या विषयाला तोंड पाडलें, हें एकंदरीनें बरे झालें असें आम्हास वाटलें हे अवघड विषय विशेष जबाबदारीनेंच हाताळावयास लागतात. म्हणून श्री. मश्रूवाला यांनी जितक्या जबाबदारीनें त्याचें विवेचन केले तितक्याच जबाबदारीनें

आम्हीहि सार्वजनिक नीतीच्या मर्यादा संभाळून आणि तोलून—मोजून लिहिलें होतें. " सूडबुद्धि नको, सूडबुद्धि नको " असे उद्‌गार कांहीं विशिष्ट संबंधांत कांहीं जणांकडून उच्चारले जातात, स्वतः गांधीजींनी तर या सूडरहितपणाची अनेक बाबतींत पराकाष्ठा केली. स्वामी श्रद्धानंदाचा खून करणाऱ्या अबदुल रशीदला " भाई अबदुल रशीद " हें संबोधणें आणि मोपल्यांना " शूर मोपले " म्हणून आवाहन करणें हीं धाडसें त्यांच्यासारखे महात्मेच करूं शकतात. पण गांधीजींच्या अनुयायांनी गोडसे—आपटे फांशी गेल्यावर स्वतः त्यांच्यासंबंधानें न्यायबुद्धीनें कांहीं चांगलें म्हणणें तर सोडाच, पण इतरांनी योग्य मर्यादेंत तसें केलें असतां भडकून उखडून जावें हें त्यांना फारसें शोभणारें नाहीं. कारण या त्यांच्या भडकण्यावरून असें अनुमान निघते कीं, " सूडबुद्धि नको " या नियमाचें पालन एकांगीपणानें इतकेंच नव्हें तर केवळ एकेरीपणें होत आहे. " माझ्या मनांत ज्यांच्या संबंधानें ओलावा आहे त्यांच्याच पुरती काय ती सूडबुद्धि नको " असाच शेवटीं गांधींभक्तांच्या वर्तनांतून निष्कर्ष निघतो. ' भाई अबदुल रशीद आणि शूर मोपले ' हे शब्द अत्यंत क्षोभाच्या काळांतहि उच्चारतां आले. उलट गोडसे–आपटे यांचें खुनाचें दुष्कृत्य घडून त्यांच्या मरणोत्तर त्यांच्या पूर्वायुष्यासंबंधी दोन योग्य शब्द लिहिण्यासहि चोरी व्हावी ही गोष्ट सार्वजनिक नीतिमत्तेस आणि गांधीजींनी उंचावलेल्या मानवी मूल्यांस पोषक आहे काय ? आमचे आक्षेपित लेख प्रकट झाल्यानंतर त्यांच्यावर अत्यंत गैरलागूपणानें अद्वातद्वा आणि शेवटीं धमकावणींच्या कोटीपर्यंत पोचणारे लिखाण ज्यांनीं त्यावेळीं लिहिलें त्यांनी या प्रश्नाचा विचार अवश्य केला पाहिजे.

## कायदा सरळ आणि शुद्ध करा

प्रेस ॲक्टच्या कलम ४ पैकी पोटकलम १ ब या कलमाचा अर्थ शाब्दिक नि कडक रीत्या लावणें शक्य होतें. पण मुंबईच्या वरिष्ठ न्यायालयाने त्याचा अर्थ लावतांना सामान्य व्यवहारी तारतम्य चालविलें. आक्षेपित लेख वाचतांना एकाद्या वाक्याचा अर्थ एकंदर संदर्भाला धरून लावला पाहिजे हें जसें ठरलेलें आहे तसेच कायद्याच्या कलमाचा अर्थ लावतांना कायद्याचा एकंदर उद्देश आणि मागचेपुढचें संदर्भ ध्यानीं घ्यावे हें तत्त्वहि न्यायव्यवहारांत प्रतिष्ठित झालेलें आहे. कलम ४ पोटकलम ' १–अ ' हें अशा अर्थाचें आहे की, खून किंवा अत्याचारी कृत्यें यांची प्रशंसा

केल्यास तीं आक्षेपार्ह ठरतात. याच्या पुढचे 'ब' हे कलम खुनी अत्याचारी मनुष्याची प्रशंसा आक्षेपार्ह ठरविते. या 'ब' कलमातील हेतु असा असला पाहिजे की जेथे मनुष्याची स्तुति ही पर्यायाने त्या कृत्याची स्तुति होईल; आणि घातक कृत्याना त्यायोगे प्रोत्साहन मिळेल तेथे ही खुनी अत्याचारी मनुष्याची स्तुति बेकायदेशीर ठरावी. मात्र या कलमाची शब्दयोजना इतकी मोघम आणि व्यापक आहे की, न्या. छगलांनी आपल्या निर्णयपत्रांत उदाहरणार्थ घेतलेली खुनी चित्रकाराच्या चित्रकलेची प्रशंसा देखील त्यायोगे आक्षेपार्ह ठरेल; पण तसा या कलमाचा उद्देश असणें शक्य नाही, हे तत्पूर्वीच्या कलम ४-१ अ वरून अनुमान निघते. केसरीसंबंधीच्या निकालाने हें अनुमान आता पक्के झाले हे चांगले झाले; पण परक्या सरकारने केलेले कायदे वापरतांना स्वराज्यांतील स्वकीय सरकारने हे तारतम्य स्वतःच चालविले असतें तर वरिष्ठ न्यायालयाला जे अनुमान सुचले ते सरकालाहि सुचलें असतें. वृत्तपत्रांकडून जामीन घेण्याचे अधिकार सरकारला या कायद्याने दिले आहेत; पण ते अधिकार चालवितांनाच मुळांत अधिकाऱ्यांनी अधिक शहाणपणा वापरावयास हवा; न्यायालयाकडून त्याचे धडे घेण्याची पाळी यावी हें केव्हाहि गौणच होय ! न्यायालयाच्या दक्षतेमुळे केसरीची मुक्तता झाली एवढ्यावर पूर्ण समाधान न मानतां या प्रेस ॲक्टाच्या कलमातच तशी दुरुस्ती व्हावी असें आम्हास म्हणावेसें वाटतें. तसेंच अत्याचारी कृत्याशीं संबद्ध असलेली कोणतीहि प्रशसा आक्षेपार्ह ठरावी हेहि आम्हांस अयोग्य वाटतें, त्या स्तुतीमुळे अत्याचारप्रवर्तन वा उत्तेजन होत असेल तरच ती स्तुति आक्षेपार्ह ठरावी, म्हणून कलम ४-१ ब यामध्ये "खून वा अत्याचारी गुन्हे यांना उत्तेजन मिळेल अशा प्रकारे केलेली खुनी अत्याचारी मनुष्याची स्तुति आक्षेपार्ह ठरेल" अशी नवी शब्दयोजना घातली गेली पाहिजे. वेळोवेळीं मिळणाऱ्या न्यायालयाच्या निकालानुसार कायद्याच्या शब्दयोजनेंत लगोलग दुरुस्ती करण्याची तत्परता स्वकीय सरकारने स्वराज्यांत दाखवावी हें अपेक्षित आहे. केसरीची सुटका निरुंद फटींतून झाली असें आज म्हणण्याला जागा आहे; पण वरील प्रकारे दुरुस्ती होऊन कायदाच सरळ नि शुद्ध केल्यास केसरीला तेवढेंहि दूषण देण्यास अवकाश मिळणार नाही.

—केसरी दि. १-८-१९५०

# आजकालची बोधक जुळणी

प्राचीन कालांत भारतांमध्ये दैववाद का बोकाळला याविषयीं कोडें पडतें. पण वर्तमानाच्या प्रकाशानें इतिहास कधी कधीं उजळतो म्हणतात; त्या रीतीने मनांत नसताहि दैववादाचें पोषण करण्याची आपत्ति कशी निर्माण होते याच्या संबंधाने एक नवाच उद्‌बोधक अनुभव आज भारतामध्यें येत आहे. प्रत्येक गोष्टीसंबंधानें दैववाद पुढें आणणाऱ्या आपल्या पूर्वजासंबंधानें सखेदाश्चर्य वाटे तें या अनुभवानें आतां पुन. संशोधून पाहण्याची वेळ आली आहे. अनेक प्रसंगांतून दैवाच्या अटळपणासंबंधी विश्वास दाखविणारीं वचनें इतिहासपुराणांतून आढळलीं म्हणजे आपल्याला कसेसें वाटतें. ती भावना आता फेरविचाराने पुष्कळ सौम्य होण्याचा संभव आहे.

सध्या आपणहि एका विलक्षण पेचांत सांपडल्यामुळे कळत न कळत पण क्रमश: अधिक दैववादी होत चाललो आहोंत. असाच पेच तंतोतंत आपल्या पूर्वजांना पडला असेल असें आम्हास म्हणावयाचें नाही. दुसरें कोणते तरी पेच त्यांना पडले असतील. पण पेचांत सापडण्याने खराखोटा दैववाद कसा पत्करावा लागतो याचें आजचें एक उदाहरण समजलें म्हणजे पूर्वी अशाच इतर पेचामुळे दैववादी बनलेल्या आपल्या पूर्वजासंबधी सहानुभूति वाटेल. आपण त्याच्यासंबंधाने अज्ञानामुळे आजवर अन्याय करीत होतों असें वाटेल.

## वेड्या आईचे लाड

आजच्या पेंचप्रसंगाचें वर्णन एका घरगुती दृष्टांताने समजावून देण्यासारखे आहे. आई आणि लाडका मुलगा यांचें विनोदी चित्रण कथाकादंबऱ्यातून आणि नाटकप्रहसनांमधून केलेलें असतेंच. अशा आईपुढे मुलाचे दोष सांगून कांही उपयोग होत नाही. त्या दोषकथनानेच ती रागावते. म्हणून तिऱ्हाईत लोक दुरून विनोद करतात; आईजवळ मुलाची खोटी प्रशंसा केली तरी ती तिला खरीच कशी वाटते आणि ती प्रशंसा एकदम मान्य करूनच न थांबतां तीत ती स्वतः आणखी भर कशी घालते इ. गोष्टी पाहून पोटांतलें हसू पोटांतच दाबण्याच्या पोटगुदगुल्या लोक अनुभवीत असतात. पण हें त्रयस्थाचें झालें त्यांना त्या मुलांच्या हिताची काळजी नसते म्हणून आईचे लाड थांबवण्याची निकड त्यांना भासत नाही.

ती ज्यांना भासते त्या हितचिंतकांना मात्र मोठा पेच पडतो. मुलाला वाईट म्हणण्याचें टाळून त्याला सुधारण्यासारखी कांही योजना तर झाली पाहिजे असें या हितचिंतकांना वाटत असतें जर कां चुकून या मुलाला वाईट म्हटलें तर आई रागावून या सुचविलेल्या योजना पत्करणार नाही. यामुळे हितचिंतकांना मोठा पेच उत्पन्न होतो. मुलगा नापास झाला तर तो आपल्या आळसाने आणि उडाणटप्पूपणामुळे झाला किंवा मंद बुद्धीमुळें झाला असें म्हणण्याची सोय नसते! तसें म्हटलें की सर्वच कारभार आटोपला! मग उलट त्या मुलाचें वर्तनच कसें ठीक आहे हें सिद्ध करण्याच्या भरीस पडून आई सुधारणाविन्मुख होणार हें ठरलेलेंच.

## आडवळणाची आपत्ति

तेव्हा हितचिंतकांना आपल्या प्रतिपादनात वळसे घेणें प्राप्त होतें. मुलगा चांगला, बुद्धि तरतरीत, अभ्यासाची काळजी करणारा पण दैवयोगाने इतर अडचणी आल्या म्हणून नापास झाला; आता या दैवाच्या अपघाती गोष्टींत सुधारणा केली पाहिजे, अशा आडवळणी भाषेंतच भावी सुधारणांच्या योजनांची मांडणी करणे प्राप्त होतें. त्या मुलावर टीका करण्याचें टाळून या 'विधायक सूचना' कराव्या लागतात. मग शाळा बदला, घरीं शिक्षक ठेवा, मुलाची मनःस्थिति उल्हासित राखण्यासाठी

उद्यानाची लावणी करा. इत्यादि आनुषंगिक गोष्टी सांगाव्या लागतात. कारण त्या मुलाच्या व्यक्तिगत अवगुणांची चर्चा सोडून त्याच्या भोवतालच्या परिस्थितीच्या गुणावगुणांची पाहणी करणें प्राप्त होतें. परिस्थितिनिष्ठतेचें पांघरूण घेऊन ज्या सुधारणा सुचवाव्या त्या सुधारणा कृतीत येण्याइतका उल्हास राहण्यासाठी मधून मधून "मुलगा परीक्षेंत घसरला हें अपघाती नि आश्चर्यकारक दुर्दैवच होय," अशा उत्तेजक कल्पनांचीं पुटें द्यावीं लागतात. मुलालाच जर का वाईट म्हटलें तर पुढचें बोलणें विधायक स्वरूपाचें असलें तरी "विध्वंसक" परिणामाचें होंणार हें ठरलेलें. कारण मुलाला वाईट म्हणणारा मनुष्य पुढे काय बोलतो हें ऐकावयाचेंच नाहीं, आणि क्वचित ऐकलें तरी ते चुकीचेंच असलें पाहिजे असा पूर्वग्रह ठेवूनच ऐकावयाचें, अशी लाड करणाऱ्या आईची ठाम प्रवृति असते.

## जनतामातेचे लाडके चिरंजीव

आता असाच दैववाद मांडल्याविना या देशाच्या राजकारणांत उपयुक्त असा शद्बच बोलावयाची सोय उरली नाही! आजच्या राज्यकारभाराला म्हणजे आमच्या संमतीने सत्तारूढ झालेल्या राज्ययंत्राला योग्य दिशा दाखवावयाची तर ती जनतारुपी आईचें सत्तारूढ पक्षासंबंधाचें आंधळें प्रेम न दुखवतां दाखवगें अवश्य होतें. अर्थात पूर्वी झालेल्या गोष्टी या पक्षाच्या मूर्खपणानें झाल्या असें म्हटलें तर ते म्हणणें मनावरच घेतलें जाणार नाही. म्हणून झाल्या गेल्या गोष्टी दैवयोगाने झाल्या. इंग्रज वाईट, अमेरिकन भांडवलवाले वाईट, पाकिस्तानी मुसलमान वाईट, हिंदुसभावाले लोक वाईट म्हणून पूर्व बगालवर संकटे आलीं, असें म्हटलें तरच पुढील सुधारणांच्या सूचना ऐकल्या जाण्याचा संभव, एरवी त्या फुकट जाणार अशी भीति. आजच्या हिंदुस्थानांतील नागमोडी मनुष्य स्वभावाला वळसे घालण्याला जर असा खोटा दैववाद पत्करावा लागतो तर पूर्वीहि असल्याच नागमोडी प्रवृतींना वळसा घालण्याच्या अनेक अज्ञात आपत्ति आपल्या पूर्वजांवर आल्या असल्या पाहिजेत. आपत्ति आल्या असतां त्या ज्यांच्या मूर्खपणाने आल्या तेच सत्ताधारी किंवा समाजाचे आदर्श आहेत असें पूर्वीहि अनेक परीनी घडलें असेल. म्हणून पूर्वजांनाहि दैववादाचा आडपडदा पुष्कळ वेळा घ्यावा लागला असला पाहिजे.

## कलिकल्पनेची उत्पत्ति

उदाहरणार्थं कलियुगाची कल्पना घ्या. कलियुग आहे म्हणून अमुक अमुक गोष्टी व्हावयाच्याच, असें म्हणण्याची प्रथा पडली. जे जे वाईट डोळयासमोर दिसले तें ते कलीच्या प्रभावाने घडणारे आणि म्हणून स्वाभाविक होय असें पुराणांतरी संकलितरीत्या सांगण्यांत आले. अनेक संतानीहि ह्या पौराणिक कल्पनांचा अनुवाद केला. कारण ज्यांच्या योगाने कलियुग आलें, ते लोकच असे प्रबळ किंवा सत्ताधारी असावेत की त्यांना वाईट म्हणण्याची सोय नसावी. त्याना वाईट म्हणून जर समाजाचे दोष दाखवले तर समाज ते ऐकावयासहि सिद्ध होणार नाही अशी भीति या पुरातन लेखकांना आणि कवींना वाटत असावी. म्हणून त्यांनी कलियुग ही एक सोयीची टोपली निर्माण केली. कलीमुळे दोष घडतात असे म्हटले म्हणजे अनेक मोठ्या सत्ताधाऱ्याची आणि त्यांच्यावर पुष्ट झालेल्या बिल्लराची अवकृपा होण्याचा संभव टळतो लोकहि त्या वेळी केव्हा तरी असे वेडे झाले असावे की, आपल्या प्रेमपात्र बनलेल्या उच्च -- पदस्थाना दोष देण्यांत आला तर त्या दूषकाचे पुढचे बोलणे ऐकूनच घ्यावयाचे नाही. अशा अडचणींत दोष - निवारण कसे व्हावयाचे? तेव्हा दोषाची कारणीभूत म्हणून एक काल्पनिक काळी मूर्ति उत्पन्न करण्यात आली आणि तिचे नांव कलि.

## संतांवरील प्रसंग

" कलौ कर्ता विलिप्यते " म्हणजे कलियुगामध्ये वाईट गोष्ट करणारा हा स्वतःपुरताच दोषी राहतो. परंपरेने त्या पापाचे धनी इतरांना करतां येत नाही असा नियम सांगण्यांत आला. परंपरेने कार्यकारणभाव दाखवून सामाजिक दृष्टया या पापाला अमुक लोक कारण आहेत असें स्पष्ट म्हणणें आजच्याप्रमाणे त्यावेळीहि अतिशय धोक्याचें झालेलें असावे. प्राप्त परिस्थितीचे मूळ दोष नाहीसे करणे हें दुरापास्त झाल्यामुळे किंवा ते स्पष्ट बोलण्याची सोय न उरल्यामुळे कलियुग म्हणून स्वस्थ राहावे आणि हरिभजन करावें असा मार्ग महाराष्ट्रीय संतानी सांगितला. त्यावेळी त्यांना त्यावेळचे मुसलमानी राज्य हें सर्व दोषाचे मूळ आहे आणि दिवसेंदिवस हे

दोष वाढतच जाणार आहेत हें स्पष्ट दिसत असलें पाहिजे. मात्र त्या गोष्टीची विशेष वाच्यता करण्यात काही अर्थ नसून उलट धोका मात्र होता. नामदेवांनी एका अभंगांत म्हटले आहे की,

" राजेभ्रष्ट यवन झाले । ठायी ठायी दोष घडले । मग याहि अवतार घतले । कलिदोष हरावया ॥

## कलंकी अवताराची आशा

यामध्ये यवनराज्यामुळ कलियुग प्राप्त झाले असें सांगण्याचा हेतु स्पष्ट दिसतो. पण या कलियुगाचा शेवटहि कल्कि अवताराने होणार या पुराणातरीच्या कथेचा आधार लोकांना धीर देण्यासाठी संतानी घेतला असला पाहिजे. दशावतार -- वर्णनाच्या अभंगात नामदेवांनी कलंकी अवताराचे वर्णन पुढील प्रमाणे केले आहे --

कलीचीये अंती होणार कलंकी ।
मारील म्लेछ की घोडयावरी ॥
फिरून धर्माची उभारील गुढी ।
कृतयुग -- प्रौढी करी तोची ॥
तोवरी साधन हरिनाम – कीर्ति ।
संतांची संगति नामा म्हणे ॥

यवन – राज्याचे त्या वेळचे कलियुग एखादा हिंदु क्षत्रिय राजा प्रबळ होऊन नाहीसें करील, आणि पुन: हिंदूचें न्यायी आणि उदार राज्य स्थापन होईल अशी आशा या अभंगांत व्यक्त झाली आहे. किबहुना नामदेवांना शिवाजी महाराजांच्या अवताराचें स्वप्नच पडले असे या अभंगांवरून वाटतें.

## लोकशाहीच्या कलियुगांतील कलंकी

सध्या आपल्यामागे असलें परचक्र नाही. पण स्वयंनिर्मित असें स्वचक्रच आपल्या मागे लागले आहे. तें नाहीसें होण्यास अवताराची वाट पाहण्याची आवश्यकता खरोखर नाही. लोकसत्तेच्या व्यवहारांत फेरनिवडणुकीचा समय हीच कलंकी अवताराच्या आराधनेची वेळ आहे. संतांना जितकी दूरची आशा दाखवावी लागली तितकें दूर जाण्याची आपत्ति सध्या

आपल्यावर नाही. स्वचक्र नाहीसें करणें हें आपल्याच हाती आहे. त्या वेळे-पर्यंत मात्र दम धरला पाहिजे. तोंवर जगण्याचे साधन म्हणजे सरकारचे हात सबळ करण्याचें घोष करणें इत्यादि. कारण आपण मत, करांचा पैसा, सर्व सत्ता, सैनिक, सपूर्ण नोकरशाही आणि राज्याची सर्व सामुग्री हीं ज्यांच्या हाती दिली त्यांचे हात आता आपण कसे सबळ करावयाचे म्हणजे आणखी कोणतें बळ त्यांत घालावयाचें हें समजणें फार कठीण आहे.

निवडणूक हेंच लोकशाहीतील कलियुग नष्ट करणाऱ्या कलंकी अव-ताराच्या आराधनेचे स्थान आहे, त्यावेळी जे लोक जागरूक राहणार नाहींत ते कलियुगाचा दुसरा फेरा अंगावर घेतील.

—केसरी दि. २४-३-१९५०

# दीर्घ सूचनांचा परिचय

**दीर्घ सूचना आधी कळे। सावधपणें तर्क प्रबळे।**
**जाणजाणोनि निवळे। यथा योग्य॥**

पूर्व बंगालमधील हिंदूची हकालपट्टी थांबविणें शक्य नाही. ती कशी सोसावयाची याचाच विचार मुख्यतः "सरकारी पातळीवरचें यापुढील संभवनीय कर्तृत्व" खाऊन टाकील. पन्नास हजारांच्या वर लोक इकडे आले आहेत. त्यांच्या व्यवस्थेसाठी पुष्कळच गोष्टी कराव्या लागतील. झालेलीं हत्याकांडें, लूट, धर्मांतर नि स्त्रियांची विटंबना यांचें काय होणार ? ब्रिटिश राजवटीपासून सीमाप्रांतांत नि पूर्व बंगाल्यांत या गोष्टी होत होत्याच. या इतिहासाच्या अंधाऱ्या गुहेंत पंजाब, सिंध इत्यादि ठिकाणच्या विटंबना दोन वर्षांपूर्वी टाकल्या गेल्या, त्यांत थोडीशी भर पडेल; ती किती ? किती भर पडते याची मोजणी अंधाऱ्या गुहेंत होत असते काय ?

निर्वासितांची व्यवस्था केवढी तरी धोंडेसारखी आमच्या राज्याच्या अंगावर येऊन पडणार आहे. त्यांत त्यांना जिवापाड श्रम होतील आणि त्याचेंच आता आपल्याकडून कोडकौतुक चालू होईल. "झालें ते, झालें

भूतकाळावर पडदा टाका, आपल्याला भविष्यकाळ बनवावयाचा आहे. भूत-काळाकडे पाहून आणि आपल्या देशापुरतें पाहून मनें कुढीं आणि संकुचित करूं नका. विस्तीर्ण भविष्यकालाकडे आणि देशाबाहेर पसरलेल्या विस्तीर्ण मानवी समाजाकडे पाहून मनें मोठीं करा " इत्यादि उपदेशाचे घुटके सम-वेतच दिले जातील. किंचित् असमाधान, अनुरूप अंगविक्षेपाने झाडून टाकून, त्या धवल शब्दप्रवाहांत समाधानी बहुसंख्य भारतीय अवगाहन करतील, हें ठरलेलेंच आहे.

## विफलतेचीं उंची समर्थनें

मग या वेळीं कांही कडक बोलून काय होणार ? हाताच्या बोटावर मोजण्याइतके तुरळक हिंदुसभेचे प्रवक्ते राहवत नाही म्हणून कांहीतरी बोलतील. त्याचाहि उपयोग फार आहे. माशा शिकल्या म्हणजे त्याचा अनुयोगी परिणाम होत नाहीं. पण प्रतियोगी परिणाम फारच उपयुक्त होतो. जी कृति होणारच नव्हती ती कां झाली नाही याला निमित्त म्हणून बोट दाखविण्यासाठी माशांना फार उपयुक्तपणे शिकण्याची खोड आहे. ती मंदकृतीसाठी निमित्त म्हणून राजकर्त्यांच्या पथ्यावर पडते. हिंदुसभावादी लोकांच्या बोलण्याचा उपयोग माशा शिकल्याप्रमाणे करण्यास पुण्यास हळूंच प्रारंभ करण्यांत आला आहे. त्याला इतरत्र दुजोरा मिळाल्यास त्याची वाढ होण्याचा संभव नाही असें नाहीं. मग हिंदुसभेच्या लोकांच्या आत्यंतिक भाषेमुळे हा भयानक प्रसंग ओढवला हा खोटा कार्यकारणभाव परिपाठानें या देशांत सहज रूढ होऊन जाईल !

नंतर आसाममधील घुसलेल्या पांच लक्ष पीडकांची हकालपट्टी करूं पाहणाऱ्या भारतीय विधीची कांही चिंतनशील पण उपद्रवी लोकांना स्मृति होईल. वर्ष सहामहिन्यांनी ते याविषयी प्रश्न विचारतील. त्यांना सांगण्यांत येईल तें असें की, " विधीने सत्ता हातीं आली खरी, पण अनेक व्याव-हारिक अडचणी आणि संकटें आली. वस्तुस्थितीचा चिवटपणा नंतर सम-जून आला. त्यायोगे केवळ कांही थोडया शेकडयांनीच हे पीडक घालवतां आले. पण इतर पुन: हजारांनी आल्यामुळे, सख्येच्या दृष्टीने फलित थोडें-फार उलटें झालें हें खरें. " हें उत्तर जो कोणी 'पंडित' देईल त्याने केलेली व्यावहारिक दृष्टीची मार्मिक फोड सर्वत्र प्रशंसिली जाईल. वृत्तपत्रांचे स्तंभ विफलतेच्या उची समर्थनाने बरबटून जातील.

यानंतर आसाम आधी खावयाचा का हिंदुस्थानांत उपद्रव चालू करावयाचा हें पाकिस्तानी लोकच ठरवतील. कारण बुद्धिबल-पटावरील आक्रमक खेळीं आता सतत त्यांच्या हाती आहे. कदाचित् सोयीचें झाल्यास ते दोन्ही गोष्टी सुरूं करतील. ही अडचण असह्य झाली म्हणजे त्या परिस्थितींत आसाम पाकिस्तानाकडे देण्याचा पोक्तपणे निर्णय होईल. तो निर्णय घेण्यांत अचूक, समर्पक नि अपरिहार्य व्यवहारबुद्धि होती, असें जे कोणी 'पंडित' त्यावेळीं सांगतील त्यांचें या देशांत मुक्तकंठ समर्थन होईल. मग ओघाओघाने हिंदुस्थानांत पाकिस्तान्यांचे असंतोष प्रकट होऊं लागतील. त्यांची युक्तिवादाने समजावणी करण्यास वृत्तपत्रांचे स्तंभच्या स्तंभ ओतले जातील. मध्येच थोडे अधिक रागवून बोलण्याच्या स्वभावामुळे मुठभर हिंदुसभावादी कडक बोलतील, त्यांचा माशी शिकल्याप्रमाणे निमित्त पुरवण्याइतका अचूक उपयोगहि केला जाईल.

".पाकिस्तान होणार हे अटळ आहें, भारतीय कृतीनेंच तें असें अटळ होत आहे" असे १९३९-४० मध्यें बोलणारांची जी संभावना झाली ती आजहि वरील क्रमप्राप्त पण 'अभद्र' बोलणारांची होणार. ही अभद्र भविष्यें उच्चारणारांचे क्षुद्रत्व लोकांच्या दृष्टिपुढे मांडून "ही संकटे येणार नाहीत असा धीर धरा' म्हणणारें आशावादी लोक या देशांत उदात्त आणि शूर ठरतील. लोकप्रवृत्तिच तशी आहे. सरळ अनुमानाने प्राप्त होणाऱ्या संकटापेक्षाहि किंचित् अधिक गृहीत धरून याची कांही पर्वयोजना करावी, असे बोलणारे लोक या देशात 'भित्रे' म्हणून बहूमताने त्याज्य समजले जातात.

## विधायक सुचनांच्या भोक्त्यांसाठी

या देशांतील अत्यंत तुरळक अशा या भित्र्या लोकांसाठीं आम्ही हे सांगत आहोत. बहुसंख्य शूरातो हें मनावर घेऊं नये. त्यांचें शूरत्वाचे जे परिपाठ चालू आहेत, ते सुखैनैव चालू ठेवावेत भित्रेपणामुळें आम्ही १९४० मध्यें असें म्हटले होतें की, 'पूर्वी आपण जातीय निर्णयाविरुद्ध परिषदा भरविल्या, आता पाकिस्तान विरोधी परिषदा भरवितो त्याहि तितक्याच

व्यर्थ असून हिंदु ज्या मार्गाने चाललें आहेत त्या मार्गांने पुढें भारतावर येऊं पाहणाऱ्या इस्लामी साम्राज्याविरुद्ध, उघडपणे वा गुप्तपणे पण व्यर्थच, परिषदा भरविणें प्राप्त होईल.' स्वाभाविक अनुमाने करण्याच्या या भित्रे-पणानेच आज आम्हास काय वाटते तें आज कांही विधायक स्वरूपांत मांडणार आहों. या देशांतील बहुसंख्य शूर लोकांनी अर्थातच तिकडे पाहुं नये.

ही विधायक योजना अशी. जगांत अद्यापि बाहेरच्या लोकांना घेणारे असें कांही मोकळे प्रदेश उरले आहेत. काही दक्षिण अमेरिकेत आहेत, कांही आफ्रिकेत आहे, हे अर्थात् थोडे आहेत, पण जे आहेत त्यांच्यावर भारतीयांनी दृष्टि ठेवावी. उदारणार्थ, श्री. खानखोजे हे मेक्सिकोमध्यें राहिले आणि अद्यापि राहूं शकतील असे असतां भारत स्वतंत्र झाला म्हणून ते सहपरिवार इकडे वास्तव्य करण्यास येऊं इच्छितात. त्याना आणि त्यांच्यासारख्या इतर लोकांनाहि असें सांगावेसे वाटते कीं, त्यांनी तिकडेच रोवलेले पाऊल सोडं नये. ते उलट व्यापक करण्याचा विचार करावा.

## दूरच्या संभवाचा विचार

याचा अर्थ असा की, इकडून अधिक भारतीय लोक तिकडे वस्तीला न्यावे, त्यायोगे आपल्या संस्कृतीचे अंश जगांत निरनिराळया ठिकाणीं पेर-लेले राहतील. यांतील 'भित्रेपणा' उघड आहे. तो असा की, आपल्या देशांतच भारतीय संस्कृतीचे लोक हे नको असणारे परके ठरण्याचा केव्हांना केव्हां तरी संभव आहे. आणि इस्रेल देशाबाहेरच इस्रेल लोकांची वस्ती थोडी थोडी पांगली होती तशी भारतीय संस्कृतीची धुगधुगी भारता बाहेर कोठे तरी तगवून ठेवावयाची पाळी भारतीयांच्या स्वमौर्ख्यार्जित पुण्याईने येण्याचा दूरचा तरी संभव आहे.

हा श्रीशिवाजीमहाराजांइतका 'भित्रे' पणा होईल असा आधार घेण्यास अवकाश आहे. श्रीशिवाजीमहाराजांनी तंजावरकडील राज्याचा आपला वडिलार्जित विभाग सोडला नाही. तिकडे आपला एक पाय रोव-लेला होता तो काढला नाही, उलट तितका दृढ केला. पुढे औरंगजेबाच्या सैन्याने दक्षिणेकडे तळ ठोकून दक्षिण देश व्यापला असतां तंजावरकडे रोव-

लेल्या पावलाचा उपयोग झाला. कठिण समय येण्यापूर्वीच त्या समयीं कामाला येण्यासाठीं योजना केलेली असावी. चांगल्याची आशा कधीच सोडूं नये. पण वाइटांत वाइटाची सिद्धता करण्याचेंहि सोडूं नये. अशा सावधानपणाचा हा अंतिम विचार आहे.

## इतिहासावरून वंशविचार

तो विचार सुज्ञांना ध्यानीं घ्यावासा वाटेल. इतरांनाहि तो उपयुक्त नाही असें नाही. कारण त्या विचाराला "पराभूत" मनोवृत्ति आणि नैराश्यमय कुकल्पना इ. शेलकीं विशेषणें देऊन "उगाच भलती चिंता करणारे लोक हे किती क्षुद्र असतात आणि आपण किती उभारीचे आणि लोकांचा धीर राखणारे आहोंत" इत्यादि वक्तृत्व करून प्रवाह पतितांचे उथळ फड जिंकण्यास आणि तरून जाण्यास शूरांना हें चांगलेंच साधन मिळेल. असावधपणा हाच जेथे आनंद आहे तेथे दीर्घ सूचना आधी सांगणें हा वेडेपणाच होय. त्यायोगे आम्हास वेळींच धोक्याची सूचना देऊन ठेवल्याचें कर्तव्य केल्याने समाधान लाभेल. उलट शूरांना आपल्या अपराजित मनोवृत्तीचें उज्वल स्वरूप दाखवण्यास ही आमची पराभूतपणाची पार्श्वभूमिका लाभेल.

आणखीहि एक दीर्घ सूचना आमच्या मनांत आहे. भारतावर आक्रमकांची एकामागून एक अशीं दहांच्या वर आक्रमणें झाल्याची गझनी आणि घोरी या उपपदांच्या भेदाने दोन महंमदांची उदाहरणें ठळक आहेत. याशिवाय इतर आक्रमकांची उदाहरणेंहि आहेत. हा सर्व इतिहास वाचीत असतांना ज्यांच्यावर आक्रमण होत होतें त्या लोकांची अनुभवाने कांही वेगळी सिद्धता किंवा योजना केव्हाहि झालेली इतिहासावरून दिसत नाहीं. हाच भारतीय ऐतिहासिक स्वभाव आणि त्याला कारणीभूत होणारे मूळ अवगुण आजहि भारतांत भरपूर आहेत. यावरून आज दिसणारा भारतीय स्वभाव हा वंश आणि रक्त यांच्यामधून आलेला आहे असें स्पष्ट दिसतें.

## वंशसंग्रहाची कल्पना

व्यक्तीला रक्तक्षय झाला म्हणजे दुसऱ्या व्यक्तींकडून सदृश रक्ताची भर करण्याची व्यवस्था शास्त्रीय पद्धतीने होते. यांत कोणी कांही कमीपणा मानीत नाहीत. पूर्वी हिंदुस्थानांतील मोगल सम्राट आपलें सैन्य कांही ठराविक कालखंडानतर बदलीत असत. कांही वर्षांत उष्ण प्रदेशांत राहिलेले

लोक मंदावतात, ते काढून अफगाणिस्तानांतून पहाडी लोक आणून सैन्यांत भरावयाचा त्यांचा क्रम चालू असे. या नव्या भरतींने जून्यांनी कांही कमीपणा मानलेला नव्हता आणि मानला असता तरी सम्राटांनी राज्यरक्षणाच्या महान् आवश्यकतेसाठी हा संभाव्य असंतोष पत्करला असता.

जें सैन्याचें तेंच अल्प प्रमाणांत एकंदर राष्ट्राचेंहि आहे. पूर्वीच्या सम्राटांनीं अनेक ठिकाणचे ' कारागिरांचे गट आणून त्यांच्या कुटुंबांची आणि वंशांची वस्ती राजधानी लगत केल्याची उदाहरणें आहेत. ही सर्व प्रस्तावना वाचून कोणाला अशी भिती वाटेल की, " आम्ही कांही परके म्हणजे अभारतीय लोक येथें आणून एक नवा उपद्रवच अंगावर घेण्याचें सुचवणार आहोंत की काय ? " पण तसें नाही. वंशामध्ये नवीन रक्त कसें आणावयाचें आणि वंशाचा गुणसंचय कसा वाढवावयाचा याच्या वरील उपद्रवाव्यतिरिक्त कांही सुरक्षित अशा योजना आहेत.

## जुन्या प्रयोगाची आवृत्ति

येथपर्यंत कल्पनांची धाव ज्यांची जाईल त्यांना आमच्या सूचनेचें पुढील धोरण समजेल. इतरांना तें आताच स्पष्ट सांगण्यांत अर्थ नाही. त्यांच्या कल्पनेंवरील ताण या संदिग्धतेपुरताच आवरलेला बरा. भारतबाह्य वंश ख-या अर्थानें भारतीय करावयाची सोय सध्याच्या राज्यघटनेत केलेली नाही; आणि तशी सोय करणेंहि सध्याच्या भारतीयांच्या असावध प्रवृत्तींकडे लक्ष देतां धोक्याचेंच ठरेल. आमच्या मनांत अनादि कालापासून चालत आलेली, अभारतीय वंश भारतीय करून टाकण्याची एक सनातन पद्धति आहे. याच पद्धतीने शकहूणादि लोक भारतीय संस्कृतीनें पचवून आत्मसात् केले. ती चालविण्याची सोय सध्या फार तुरळक आणि दुरापास्तहि आहे. तरी देखील सर्व उपायांचा विचार करताना हाहि एक अल्पसा संभवनीय मार्ग साधला तर सोडूं नये असें आमचें मत आहे.

विशेषतः परदेशांत ठिकठिकाणीं मोकळ्या जागा असतील तेंथे भारतीयत्वाचा पाय रोवलेला रहावा अशी जी वर आम्ही सूचना केली आहे ती आणि ही वंशसंग्रहाची सूचना सजोडरीत्या कृतींत आणण्यासारखी आहे निरनिराळे वंश पचविण्याची भारतीयांची शक्ति इतिहासकालांत बरींच वर्षे चालली होती हें पं. नेहरूंना देखील पटल्याचें त्यांच्या एका भाषणावरून दिसतें. या प्रवृत्तीची पुनः योग्य आणि सुरक्षित मार्गानें वाढ करणें अवश्य आहे.

—केसरी दि. १७-३-१९५०

# असहायते ! तुझें नांव 'भारत'

कलकत्ता ही भारताची जुनी राजधानी आणि दिल्ली ही नवी राजधानी. या दोन राजधान्यांमध्ये आमच्या महामंत्र्यांच्या येरझाऱ्या चालू आहेत. या धावपळीबरोबर त्यांच्या मनाचीहि विशिष्ट कक्षेंत धावपळ उडालेली दिसते. कलकत्त्याच्या दुसऱ्या भेटीनंतर त्यांनी भारतीय संसदेमध्ये पुनः एकदां मोठें भाषण केलें. पण याहि भाषणांत पूर्वीप्रमाणे वस्तुस्थितीचें वर्णन आणि एका अंगाला परिस्थिति नि दुसऱ्या अंगाला स्वतःस घालून, घेतलेलीं नसतीं मानसिक बंधनें, यांच्या उलटसुलट पेचांमध्ये पूर्वींप्रमाणेच चक्राकार पण निष्फळ परिभ्रमणाव्यतिरिक्त दुसरे कांहीहि नवें नव्हतें !

## आशा संपली

पाकिस्तान जें जें काय करील तें तें असहायपणे पहावें, ऐकावें आणि सोसावें; तसेंच आलेल्या आपदग्रस्तांची पुरी व्यवस्था कशीबशी लावावी, याव्यतिरिक्त, या पुढेहि पं. नेहरू यांच्या आणखी कांही फेऱ्या कलकत्त्यास झाल्या तरी, कांही निष्पन्न होण्यासारखे नाही. परकी राजवटींतील लोकांची असहायता जितकी खेदकारक होती तितकीच आपलें राज्य असूनहि आतां झाले ी आहे हे लोकांनी उमजावें, आणि यांतून बाहेर पडण्याचा लोकशा-

हीचा क्रममार्ग कोणता याचा विचार मनाशीं करून ठेवावा. कारण त्वरेनें सरकारी पातळीवर परिस्थितीला कलाटणी देणारे असे कांही घडेल अशी आशा करणें व्यर्थ होय. सरकारचे हात सबळ करून किंवा सरकारी हाताला कोटयवधि लोकांचे हात लावून ही आपत्ति आता सोशीत सोशीत कशी निभवावयाची एवढाच प्रश्न उरला आहे.

## अपुला आपण वैरी

लोकशाही म्हणजे लोकांना बहुमतानें चांगले करण्याची सत्ता जशी असते, तशी बहुमताने ऐतिहासिक खोडयांत राष्ट्राला घालून अनेक पिढयाचे शाप मिळविण्यासारखी आपत्ति ओढवून घेण्याचीहि सत्ता असते ! ती आपत्ति आता आपल्या हाताने राष्ट्राने ओढवून घेतलेली आहे. मूळ चूक कोठें झाली हें ओळखण्याची आणि तेथपासून ती उलगडावयास पाहिजे असा निश्चय करण्याची पात्रता या राष्ट्राच्या अंगीं असेल तरच त्याचा तरणोपाय आहे, एरवी तें घसरत जाणार हें निश्चित समजावें. "आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः" किंवा 'अपुला आपण वैरी' हे वचन व्यक्तीइतकेंच राष्ट्राच्या संबंधांतहि लागू पडणारे आहे; मग ते राष्ट्र परतंत्र असो वा स्वतंत्र असो.

## समाधानी तटस्थता

पं. नेहरू यांनी समाधानाची म्हणून एक गोष्ट अशी सांगितली की,

"गेले दोन आठवडे पूर्व बंगालमध्ये मोठा हानीचा प्रसंग असा घडला नाही. कांही वर्तमानपत्रांनी मागेच झालेल्या वार्ता आता दिल्या-मुळे जणूं काय त्या गेल्या दोन आठवडयांत घडल्या असा भ्रम होतो." जणूं काय दोन आठवडयांपूर्वीच्या गोष्टी आता ढुंकूनहि न पाहण्यासारख्या त्याज्य झाल्या ! खरें असें आहे की, पूर्व बंगाल्यांत जे घोर हत्याकांडाचे प्रसंग घडले त्यांची वार्ता सरकारने दिली नाही नि अधिकृत वृत्तसंस्थांनाहि प्रकट करूं दिली नाही. शेवटीं आलेल्या निर्वासितांकडून माहिती जमा करून व पडताळे घेऊन वृत्तपत्रांनी ही हत्याकांडें लोकांपुढें मांडलीं; एरवी तीं कधीच लोकांपुढें आली नसती. असें असतां पं. नेहरू यांनीच पुनः मागाहून नि उशीरा प्रसिद्ध होणाऱ्या या वृत्तपत्रांतील वार्तांवर नाकें

मुरडावीं हें त्यांस मुळीच शोभणारें नाही. बरें, गेल्या दोन आठवड्यांत मोठी कापाकापी झाली नाही याला पं. नेहरू यांचे कोणतेहि कागदी घोडे कारणीभूत झालेले नाहीत. त्यांनी स्वतःहि आपल्या भाषणांत तसा दावा केला नाहीं. मग दोन आठवडे काही विशेष घडले नाही हे सांगणें म्हणजे आता आपोआप पूर ओसरला आहे किवा ज्वालामुखीचा वाहणारा लाव्हा रस थांबला आहे इतकाच त्याचा अर्थ निघतो. पुढें असले घोर प्रसंग येणार नाहींत अशी आशाहि पडितजीनी व्यक्त केली नाही. आता झाल्या गोष्टींना दोन आठवडे होऊन गेले असे कमरेवर हात ठेवून सांगणाऱ्या तटस्थाहून वेगळी अशी पंडितजीची भूमिका दिसत नाही. ज्या पाकिस्तानी लोकांनी दोन आठवड्यांपूर्वीचे पूर्व बंगालमधील भयानक प्रसंग योजनापूर्वक निर्माण केले त्यांच्याच योजनेंत मध्यंतरी असंख्य पळून जाणाऱ्यांची पद्धतशीर लूट करण्यासाठी थाबावें असा कार्यक्रम ठरला असावा. तो क्रम आतां पार पडत आहे, इतकाच त्याचा निष्कर्ष. असल्या भयानक घटना, राष्ट्राच्या हाडामांसाच्या आणि रक्ताच्या बांधवांवर कोसळल्यावर त्यावर परिणामकारक आणि प्रतिबंधक अशी उपाययोजना न करतां, दोन आठवडे जाऊन देऊन " अलीकडें विशेष कांही घडले नाही " एवढेंच काय तें राष्ट्राला समाधान सांगण्यास प्रधानमंत्र्याने उभे रहावे, हे दृश्य दुर्दैवी भारताव्यतिरिक्त जगात इतरत्र आढळेल असें आम्हांस वाटत नाही.

## लुटारूंच्या सोयीसाठीं

बरें, जे आता जीव घरून इकडे पळून येत आहेत त्यांना इतके दिवस मुळीच बंदी होती ती आता राहिली नसून वाटेत चार ठिकाणी अप्रतिष्ठा सोसून कसेबसे हे लोक येतात याचीहि कहाणी पंडितजीनी तितक्याच असहायपणे सांगितली. समाधानाची गोष्ट इतकीच कीं, अगदी एका वस्त्रानिशी माणसें येण्याचें दि. १८ पासून बंद होऊन आता कांही सामानसुमान घऊन लोक येऊं लागले आहेत; पण त्यातहि पैसाअडका मात्र लुबाडलेला आहेच! पूर्वीं त्यांना प्रथम जकातीचे अधिकारी, नंतर पोलीस, नंतर अन्सार दल आणि शेवटीं पेंढाऱ्यांसारखे मोकाट गुंड असे चौघे क्रमाने लुटीत असत. सध्यां जो फरक पडला तोहि नेहरूंच्या काही कृतीने वा कागदी घोड्यानें

पडला असे तेहि म्हणत नाहीत. ' आजवर केलेल्या लुटीची व्यवस्था लावण्यांत लुटारू व्यग्र असल्यानें ही लूट मंदावली ' एवढेंच या फरकाचे संभाव्य कारण दिसते मोठें प्रसंग घडले नाहीत या सांगण्यांतच छोटे घडत आहेत हें उघड दिसतें आणि तशा वार्ताहि आहेत. भाषणाच्या शेवटी पंडितजींनी सांगून टाकलें की, ' पाकिस्तानांतल्या हिंदु लोकांना आम्ही कांहीहि संरक्षण देऊं शकत नाही; दिलें तर तें पाकिस्तानच देऊं शकेल ! " अर्थात् पुढें मोठें प्रसंग घडविणें त्यांना सोईचे वाटलें तर तेहि तितक्यांच सुलभतेने घडतील !

## प्रवाहपतितांची वृत्ति

ज्या वेळीं पूर्व बंगाल्यांत हे प्रकरण सुरू झालें त्यावेळीं पं. नेहरू पाकिस्तानाकडून युद्धबंदीच्या घोषणेवर स्वाक्षरी मिळविण्याचा पत्रद्वारा यत्न करीत होते. हा पत्रव्यवहार चालू असतांच तो या नव्या प्रकारणाने स्थगित होऊन चालू प्रकरणांत काय करावे या संबंधी नेहरूंनी सारखा पत्रविनिमय चालू केला. तोहि अद्यापि तितकाच व्यर्थपणे आणि अनिर्णीतपणे चालू आहे. समजा, त्यांतून काही निघालेंच तरी ते पाकिस्तानच्या बाजूने कृतीत यईल आणि पाळलें जाईल याची शाश्वती काय ? असा एका सभासदाने प्रश्न विचारला. तेव्हां पं. नेहरू म्हणाले की, " भारत आणि पाकिस्तान यांमध्ये ठरलेले संकेत पाकिस्तानाकडून पाळले जातील याविषयी मीं कांहीच निश्चिति देऊं शकत नाही. " यापुढील त्यांचे वाक्य मोठें आश्चर्यकारक आहे. ते म्हणाले कीं, " ज्या वेळेला या पत्रोपत्री वाटाघाटीची कल्पना आम्ही मनांत आणली त्यावेळी यांतून निश्चितपणे पाळलें जाण्यासारखें कांही निघावें हा विचारच आमच्या डोक्यांत नव्हता. " या वाक्यांत दिसून येणाऱ्या वृत्तीला " प्रवाहपतितपणा " हा शब्द देखील अपुरा आहे; " डोळे मिटून प्रवाहपतितपणा " असा थोडासा लांबट शब्द त्या वृत्तीला अन्वर्थक होईल. लोकसंख्येच्या अदलाबदलीचा उपाय अनिष्ठ, इतकेंच नव्हे तर अव्यवहार्य आहे असें नेहरूंना अद्यापि वाटतें. दोन्ही सरकारांनी तसा निश्चय केला आणि लोकसंख्येच्या अदलाबदलीसाठी सर्व सोयी केल्या तरी ५।६ वर्षे त्याला लागतील. शिवाय मध्यंतरी कांही प्रसंग घडले तर हा वेळ

लांबेल. दोन्ही सरकारांचें संगनमतहि त्यासंबंधांत हार्दिक होणार नाही. याप्रमाणे अनेक अडचणी सांगून शेवटी पंडितजी म्हणाले कीं, " आम्ही सध्या जाणाराला जाऊं देतो आणि येणाराला येऊं देऊं देतो. " त्यांना अडचणी असतील काय त्या वाहतुकीच्या ! त्याहि दूर करण्याची विशेष योजना सरकार करील हेंहि सांगण्याची आवश्यकता पंडितजीना वाटली नाही.

## थोडेसें गणित

"आवजाव घर तुमारा " अशा पद्धतीने उभय दिशांचे प्रवाह चालले आहेत, तसें ते चालू देऊन जे इकडे आले त्यांना साहाय्यहि करूं आणि पुढे परिस्थतीने अपरिहार्य होईल तसें करीत जाऊं. असेच शेवटीं पंडितजीनी उद्गार काढले " असहायते, तुझे नाव भारत " असें हॅम्लेटच्या भाषेमध्ये म्हणणें एवढेंच यावर उरले आहे. आपल्या मातेचा, द्वितीय संबंधाची घाई करण्याचा, चंचलपणा पाहून हॅम्लेट म्हणाला की, " चंचलते ! तुझे नांव स्त्री. " हा संदर्भ ज्यांना माहीत नाही त्याना एवढयावरून या अग्रलेखाच्या मथळयाचा अर्थ समजेल. लोकसंख्येच्या अदलाबदलीचा प्रश्न हा गणिताचा प्रश्न आहे अशी पंडितजींनी प्रस्तावना केली. म्हणून थोडेसें गणित सांगणें अप्रस्तुत होणार नाही तेंहि पंडितजीच्या भाषणाच्या आधारेच आम्ही सांगत आहों. दीड लक्ष हिंदु पूर्व बंगाल्यांतून कलकत्त्यांकडे आले. आणि एक लक्ष मुसलमान पूर्वबंगाल्यात गेले. सध्या रोज सुमारे ५ ते १० हजार हिंदु इकडे येतात आणि ५ ते ७ हजार मुसलमान इकडून तिकडे जातात. एका दिवशी १४ हजार हिंदु आले आणि १० हजार मुसलमान गेले असा हा दुहेरी प्रवाह स्वेच्छेने चालू आहे. परिस्थितीचा दाब दोहोंकडूनहि प्रवाह ढकलीत आहे गेल्या दोन वर्षांत पूर्व बंगालमधून पश्चिम बंगाल्यांत सुमारे १६ लक्ष लोक आले. उलट इकडून पाकिस्तानात किती गेले याचा नेहरूंना पत्ता नाही. पण ते पुष्कळच कमी गेले असावेत असा त्यांचा अंदाज.

## शेवटीं शून्यलब्धि

पंडितजीचा ' गणित ' शब्दाचा अर्थ नुसती ' गणति ' असा होतो. ही गणतीहि सर्व ठिकाणी कसोशीने केल्याचें दिसत नाही. म्हणजे योजना

तर नाहीच पण पहाणीहि धड नाही. मग प्रत्येक वेळी ताळा करण्याची गोष्ट तर दूरच राहिली ! आपोआप जर लोकसंख्येची अदलाबदल चालू आहे, ती थांबवतां येत नाही, तर निदान तिला भारताच्या बाजूने कांही पूर्वयोजना आणि पद्धत लावून देतां आली असती. पण येथें, जे होईल तें होऊं द्यावें, अंगावर येऊन पडेल तेवढेच कसेंबसे निवारावें; मध्यंतरी विफल पत्रामागून पत्रे नि आवेदनामागून आवेदनें पाकिस्तानाकडे धाडावींत आणि लोकांपुढे मोठमोठी तत्त्वें सांगून ' झालें तें झालें, गेलें तें गेलें, गमावलें तें सोसा. आणि उरले तें गोड करुन घ्या 'अशा प्रकारचीं दीर्घ भाषणें करावीं असें चालू आहे. त्याला गणितच म्हणावयाचें तर तें केवळ शून्यलब्धि गणित होय!

## उशीरा होणारे साक्षात्कार

सरकारने काय केले असेल तर सर्व प्रकारे ही लोकसंख्येची हालचाल थांबवण्याचा यत्न केला. तरीहि या यत्नाला न जुमानता शेकडोंनी आणि हजारोंनी लोक येतच होते. अलीकडे हा प्रवाह कमी कमी होत आल्यामुळे तो थांबला असें क्षणभर सरकारला वाटले. " पण गेल्या दोन महिन्यांतील प्रकारांमुळे इतके दिवस पोटात जी सारखी भीति वाटत होती ती दत्त म्हणून समोर उभी राहिली, " असे उद्गार नेहरूंनी काढले. पोटांत दोन वर्षे सारखी भीति वाटत असताना ती प्रत्यक्षात येईपर्यंत पोटातच ठेवण्या-साठी आणि अगाऊ योजना काहीहि न करण्यासाठी दुर्दैवी भारतांतील पुढारी आणि महामंत्री नेमले जातात! ही गोष्ट जगात कोठे आढळा-वयाची नाही, इतकेंच नव्हे तर क्षुद्रांत क्षुद्र राष्ट्राच्या कल्पनेतहि याव-याची नाही. सिंधमधून यापूर्वी असाच प्रवाह चालू होता. आता सिंधमध्ये कांही हरिजनांव्यतिरिक्त कोणीच हिंदु उरले नाहीत. हें सर्व सांगून पंडितजी म्हणतात की, " आम्हाला यामुळे फार दुःख झाले. ते इतके लोक आपल्या स्थानावरुन हाकलले गेले एवढ्यासाठीच केवळ नव्हे, तर ज्या शक्तींना शमविण्यासाठी आम्ही यत्न करीत होतों आणि ज्यासाठी आम्ही फाळणी आणि तिचे परिणामहि पत्करले त्या शक्ती अद्यापि वावरतच आहेत असें आम्हांस कळू लागण्यास आरंभ झाल्यामुळे आम्हांस विशेष दुःख झालें.

एकूण सरतेशेवटीं एकाएकी आम्हांला साक्षात्कार घडला की, आम्ही फार भयंकर मूल्य दिलें." सिंधमधून ही हकालपट्टी वर्ष -- दीडवर्ष चालू असता, आज थांबेल, उद्या थांबेल अशी नुसती चालढकल होते आणि हिंदु नष्टांश झाले म्हणजे शेवटीं " भयानक मूल्य " दिल्याचा म्हणजे हानि झाल्याचा साक्षात्कार होतो. तसेंच थांबा थांबा म्हणून सांगत असतांना देखील दोन वर्षात १३ लक्ष लोक पूर्व बंगाल्यांतून इकडे येतात; पण शेवटपर्यंत यांचें 'थांबा थांबा' म्हणणें चालूंच असते; आगाऊ योजना कांही होत नाही!

पूर्व-पश्चिम पाकिस्तानाकडून हिंदूंना निःशेष करण्याची योजनापूर्वक कृति दोन वर्षे सतत चालू असतां इकडे आमची मात्र केवळ धक्का येईल तसें ढकललें जाण्याची प्रथा सतत चालू आहे. याच कालखंडांत इकडे काश्मीर-च्या संबंधांत सुरक्षासमितींत नित्य होणारी वंचना, सीमांवर सर्वत्र नि सतत होणारी आक्रमणें, एफेन्डीचें काश्मिरांतून जडजवाहिरासह पलायन, लायक-अल्लीनें पोराबाळांसह हातावर दिलेली तुरी, काळाबाजारवाल्यांपुढें नित्य शरणागति, भारतात पाकिस्तानी हेरांचा सुळसुळाट, अधिक धान्याच्या ऐवजीं अधिक व्याख्यानें आणि दौरे पिकविणारी नीति, आसामांतील रस्त्यांवर-दोन कोटींचा व्यर्थ गेलेला खर्च, केव्हांतरी खर्चाच्या सबबीवर गुंडाळल्या जाणाऱ्या नकाशांची उघडझांप इत्यादि सर्व विफलतेच्या कहाण्या चालू आहेत. या परिवारांत पूर्व-पश्चिम पाकिस्तानांतील हकालपट्टीचें चित्र मांडलें म्हणजे भारताच्या सर्वांगीण असहायतेचें यथार्थ दर्शन घडतें; मात्र जो डोळे उघडून पाहील त्याला. ते उघडायचे नाहींत असा निश्चय जर बहुसंख्य भारतीय चालवणार असतील तर त्यांचे तेंच वैरी असें म्हणावें लागेल.

## हातीं असून होत नाहीं

**ही रडकथा सांगणारे महामंत्री हे कांही कोणी हातपाय बांधून ठेवलेले बंदी या काळांत नव्हते. वाटेल तितकें द्रव्य, वाटेल तिकडे फेकावें असें त्यांचें सामर्थ्य होतें, सैन्य पदरीं होतें, सर्व कांहीं होतें; पण हीं साधनें प्रभावीपणें हाताळावीं असें मन नसून त्या साधनांचा एक प्रकारें लज्जास्पद भारच मानणारें हळुवार अंतःकरण होतें. मग साधनें असूनहि काय उपयोग ?** या संबंधांत तुकाराम महाराजांचा एक

अभंग मोठा मार्मिक आहे. त्यांत तें म्हणतात :—

ढाल तलवारे गुंतले हे कर। म्हणे मी झुंझार
कैसा झुंजों ॥१॥

पेटी पडदळे सिले टोप ओझें। हें तों झालें दुजें
मरणमूळ ॥२॥

बैसविलें मला येणें अश्वावरी। धावूं पळूं तरी
कसा आतां ॥३॥

असोनि उपाय म्हणें हे अपाय। म्हणें हाय हाय
काय करूं ॥४॥

तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म। मूर्ख नेणें वर्म
संतचरण ॥५॥

तुकारामबोवांची ही वक्रोक्ति फारच मार्मिक आहे. लढाईची सर्व सामुग्री देऊन रडतराऊ घोड्यावर बसवला तरी त्याला मानसिक अनुकूलता नसल्यास त्या साधनांचा त्याला भार कसा होतो हें तुकारामबुवांनी फार मार्मिकपणें दर्शविलें आहे. या वक्रोक्तींतून आपण सुटूं असें :कोणी समजूं नये. ढाल तलवारीनें हात अडकून बसलें, आतां काय करूं ? असें म्हणणारा जर एकपटीनें हास्यास्पद असला तर ही ढालतलवार देऊन त्याला घोड्यावर चढवणारे हे शतपटीनें हास्यास्पद होत. सिंधमधील हरिजनांव्यतिरिक्त बाकी हिंदूंची हकालपट्टी झाल्यावर मग नेहरूंना साक्षात्कारानें काय उमगलें हें वर त्यांच्याच शब्दांत दिलें आहे. हा साक्षात्कार इतक्या विलंबानें होणें यांत हास्यास्पदता आहे. पण तो तरी नेहरूंना शेवटीं झाला. आपली चुकीची आकांक्षा विफल झाल्याचें त्यांच्या ध्यानांत आलें. पण पं. नेहरूंना मंत्रीपदाच्या व पुढारीपणाच्या गादीवर बसवण्याचा प्रमाद मात्र केव्हांहि लक्षांत न घेण्याचा राष्ट्राचा मेणचटपणा पाहिला म्हणजे नेहरूंचा मेणचटपणा कांहींच नाही असें वाटूं लागतें.

केसरी दि. २१-३-५०

---

